नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ पुरस्कृत )

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## दिवाळी विशेषांक १९८९

अंक २५१ / आक्टोबर – डिसेंबर १९८९

## आत्मभानाचे दिवस

कुसुमाग्रज, माधव मनोहर, भा. रा. भागवत, शंकरराव खरात, म श्री दीक्षित दादूमिया, ज्योत्स्ना देवधर, राम शेवाळकर, अरविंद गोखले, डॉ. व दि कुलकर्णी ना. धों. महानोर, आनंद यादव, सुरेश खरे, बाबा कदम, बा. ह. कल्याणकर रमेश मंत्री, रवींद्र पिंगे, सुभाष भेण्डे, पुरुषोत्तम पाटील.

संपादक : शंकर सारडा
संपादक मंडळ : डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव, डॉ. वसंत सावंत, प्रा. चंद्रकुमार नलगे.

वार्षिक वर्गणी– ४० रुपये ( संस्थांसाठी )
या अंकाची किंमत १५ रुपये

मुद्रक–प्रकाशक : राजा फडणीस, कार्यवाह, महाराष्ट्र, साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० फोन – ४४२९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



**ही दीपावली आणि नूतन वर्ष
आमचे सदस्य, ग्रंथप्रेमी रसिक
साहित्यिक, जाहिरातदार आणि ग्राहक
सर्वांना सुखसमृद्धीचे जावो.**

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा
साहित्यिक साहाय्य निधी
दोन लाखावर गोळा झाला

या दिवाळीच्या वेळी
आपणही मदत करा.
पाच लाखांचे उद्दिष्ट गाठायचे आहे.

---

ग. प्र. प्रधान, अध्यक्ष
राजेंद्र बनहट्टी, कार्याध्यक्ष
डॉ. म. वि. गोखले, कोषाध्यक्ष
डॉ. गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, चि. शं. जोशी, कार्यवाह.

---

देणगीला आयकरातून सूट
चेक, ड्राफ्ट, रोख रक्कम महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रोड, पुणे ३० या नावाने आजच पाठवा.

अनुक्रमणिका

# संपादकीय

वाचकमित्रहो,

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा १९८९ चा दिवाळी अंक आपल्या हाती देताना अर्थातच आनंद होत आहे. ही दिवाळी आणि नवे वर्ष आपल्याला सुखसमृद्धीचे जावो, आपल्या कर्तृत्वाला चौफेर वाव देणारे ठरो ही शुभेच्छा.

प्रत्येक कलावंताच्या जीवनात, लेखक कवीच्या जीवनात उमेदवारीचा काळ हा अटळ असतो. आपण कथाकार व्हावे, कादंबरीकार व्हावे, कविता लिहाव्या, नाटक लिहावे, समीक्षात्मक लेखन करावे; चित्रे काढावी, मूर्ती घडवाव्या–अशी इच्छा कधीतरी मनात अंकुरते आणि पुढे ती वाढीला लागते. काहीजणांच्या बाबतीत हा अंकुर अल्पकाळातच कोमेजून जातो. काही जणांची तीव्र इच्छाशक्ती त्यांना पुढे रेटत राहते. अनुकरण, कौतुक, टीका, अवहेलना, नवी आव्हाने, उपेक्षा, प्रसिद्धी कीर्ती, मान्यता अशा विविध स्टेशनांवर कमीअधिक घोटाळत हा प्रवास चालू राहतो वा मध्येच कुठेतरी थांबतो. या प्रवासात असा कुठला तरी क्षण येतो की आपण खरे कथाकार आहोत, कादंबरीकार आहोत, कवी आहोत, नाटककार आहोत; शब्दो आपण खेळवू शकतो, इतरापेक्षा वेगळे असे जे काही आपले जीवनानुभव आहेत ते आपण नेमके पकडू शकतो, त्या त्या वाङ्मयप्रकारातील आंतरिक ताकद आपण प्रकट करू शकतो, याचा स्वतःलाच साक्षात्कार होतो. आपल्या सामर्थ्याची खूणगाठ

स्वतःलाच पटते. हा आत्मभानाचा क्षण वाङ्कालखंड अत्यंत कसोटीचा आणि सामर्थ्यशाली असतो. कलावंत म्हणून स्वतःची असणारी पृथगात्मकता स्पष्ट करणारा असतो. आपल्या वाङ्मयीन शोधयात्रेतील एक महत्त्वाचा टप्पा असतो. आपल्या निर्मितिप्रक्रियेचे रहस्य त्यात प्रकर्षाने सामावलेले असते.

यंदाच्या दिवाळी अंकासाठी मराठीतील नव्याजुन्या साहित्यिकांनी आपल्या या आत्मभानाच्या दिवसांबद्दल लिहावे असे आवाहन आम्ही केले. सुमारे पन्नास मान्यवरांना लिहिले. त्यांपैकी वीस जणांनी सक्रिय प्रतिसाद दिला. (एक लेख अंक तयार झाल्यावर हाती आल्याने मागे राहिला.) या अंकात त्या लेखांचा समावेश केला गेला आहे.

गेल्या दिवाळी अंकात 'माझा वाङ्मयीन ऋणानुबंध' या विषयावरील २२ लेख देण्यात आले होते. त्या अंकाची कल्पना आवडल्याचे अनेकांनी कळवले. अर्थात सर्वच लेख सर्वांनाच आवडावे अशी अपेक्षाही करता येत नाही. ज्याला त्याला आपापल्या रुचीप्रमाणे काही लेख आवडले, काही कमी आवडले; काही नाराज करणारे वाटले डॉ द भि कुलकर्णी यांनी कळवले की 'तुमची कल्पना चांगली होती परंतु काही लेख फार चांगले असले तरी काही सामान्य वाटले. लेखांमध्ये दर्जाच्या दृष्टीने विषमता मोठी जाणवली. लेखकांनी नीट साथ दिली नाही त्याला तुम्ही काय करणार ?'

लेखकांनी साथ दिली नाही असे म्हणता येणार नाही त्याशिवाय अंकच निघाला नसता ज्याने त्याने आपापल्या ताकदीप्रमाणे लिहिले तर त्यात डावे उजवे असणारच. या अंकातील लेखांबाबतही कदाचित हेच निरीक्षण नोंदवावे लागेल. उमेदवारीचा, अनुकरणाचा, चाचपडण्याचा कालखड संपणे, आणि स्वतःच्या पृथगात्म अनुभवाचा, वेगळेपणाचा, शब्दसामर्थ्याचा, स्वतःलाच रोकडा प्रत्यय येणे यामधली जी काही वाटचाल असते, तिचा शोध घेऊन, त्याबद्दल लेखकांनी लिहावे अशी अपेक्षा होती परंतु काही जणांनी आपल्या उमेदवारीच्या काळातील धडपडीवर जास्त भर दिला आहे, काहींनी आपल्या पूर्वकाळातील प्रसिद्धीवर काहींनी पुढच्या जीवनातील यशाचा निर्देश अधिक केला आहे. त्यामुळे या लेखनातही वैचित्र्य आहेच. परंतु तरीही हा आत्मभानाचा शोध बहुतेकांनी अत्यंत प्रांजळपणे विनम्रभावाने घेतलेला आहे,

त्यामुळे निर्मितिप्रक्रियेवर तर प्रकाशाचा झोत पडेलच; त्या त्या काळातील वाङमयीन सांस्कृतिक वातावरणाच्या मंतरलेल्या स्मृतीही जाग्या होतील.

या विषयावर लिहिण्याची विनंती अनेक नव्याजुन्या लेखककर्वीना केली होती. काहींची नकाराची पत्रे आली काहींची होकाराची. 'तुम्ही दिलेल्या मुदतींत लेखन झाले तर धाडेन. मनातून घेतलेय,' 'मंतरलेल्या व सर्जनशील धुंदीच्या कालखंडावर अगत्यपूर्वक लिहिन,' आपण कळवलेला विषय आवडला. मी लिहिण्याच्या दृष्टीने जरून प्रयत्न करतो ' 'कामाचा रेटा आहेच. त्यातून काही जमले तर पाठवतो. पण खात्री नाही ' 'गद्यकाव्यात ह्या कालखंडासंबधी लिहिण्याची कल्पना छान आहे पण तव्येत बरी नाही ' अशी काही पत्रे. हे परवशाचे लोक गळले. कुसुमाग्रजांचा याच विषयावरचा एक लेख मागे वाचला होता. तो मुद्दाम पुनर्मुद्रित केला आहे सविता पारिजात यांचे एक पत्र मला दहा वर्षापूर्वी आले होते. त्याचा वापर केला आहे. इतर सर्व लेखकमित्रांनी आत्मीयतेने सहकार्य दिले. त्या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद

गतवर्षी काही महिला वाचकांची पत्रे आली होती. दिवाळी अंकात एकाही लेखिकेचा लेख का नाही असा सवाल विचारणारी. खरे म्हणजे गेल्या वेळी किमान आठ लेखिकांना पत्रे पाठवली होती. परंतु वाङमयीन ऋणानुबंधावर लिहिण्याचे त्या सर्वांनी टाळले यंदाही दहाबारा लेखिकांना पत्रे लिहिली होती. परंतु एकच लेख मिळाला. पुन्हा मागच्यासारखा सवाल येऊ नये म्हणून हा खुलासा.

## मुख्यमंत्र्यांची स्वागतार्ह घोषणा

मुख्यमंत्री शरद पवार यांची अ. भा मराठी साहित्य महामंडळाच्या प्रतिनिधींनी पुणे मुक्कामी सप्टेंबरमध्ये भेट घेतली. त्यात म. सा. परिषदेचे कार्याध्यक्ष राजेंद्र बनहट्टी, कार्यवाह राजाभाऊ फडणीस हेही होते. मा. शरद पवार यांनी महामंडळ आणि त्याच्या घटक संस्था यांना दरवर्षी प्रत्येकी एक लाख रुपयांचे विनाअट अनुदान देण्याची घोषणा केली. साहित्य संस्थांचा कारभार अधिक व्यापक व सर्वस्पर्शी होण्याच्या दृष्टीने हे अनुदान स्वागतार्ह आहे. मुख्यमंत्र्यांना त्याबद्दल धन्यवाद.

परिषदेपुढे अनेक योजना आहेत. आर्थिक अनुकूलता असली तरच त्यांना गती मिळू शकेल.

## साहित्यिकांची कागदपत्रे जतन करण्याचा उपक्रम

सध्या जागेच्या टंचाईमुळे आपला पत्रव्यवहार, हस्तलिखिते, टिपणे, ग्रंथसंग्रह व्यवस्थित जतन करणे अनेक लेखक कलावंतांना शक्य होत नाही. त्या त्या व्यक्तीच्या अभ्यासाची ही साधने अभ्यासकांना उपलब्ध होत नाहीत. ही साधने पद्धतशीर जतन करण्याची यंत्रणा वा व्यवस्थाही आपल्याकडे नाही. केवळ इतिहासकाळातील कागदपत्रे जतन करण्यासाठी असतात असा आपला गैरसमज आहे. सद्यःकालीन नामवंत व्यक्तींच्या संदर्भातील कागदपत्रेही जतन करण्याची गरज असते याचे महत्त्व आपल्याला अजून उमगलेले नाही असे दुर्दैवाने म्हणावे लागते प्रत्येक विद्यापीठाने व महाविद्यालयाने काही मोजके लेखक कवी निवडून त्यांचे सर्व साहित्य व त्यांची कागदपत्रे सांभाळण्याची जबाबदारी स्वीकारली तरी या दृष्टीने भरीव काम होऊ शकेल.

महाराष्ट्र साहित्य परिषदेने या वर्षापासून या दृष्टीने जमवाजमव करण्याचा निर्णय घेतला आहे.

मराठी साहित्यिकांनी आपल्याजवळचा पत्रव्यवहार, जुनी टिपणे, हस्तलिखिते, छायाचित्रे वगैरे साहित्य परिषदेच्या हवाली करावे. त्यांचे वर्गीकरण करून ती व्यवस्थित जतन करण्याची जबाबदारी परिषद घेईल. त्या त्या व्यक्तीच्या इच्छेप्रमाणे त्याच्या हयातीत वा विशिष्ट कालावधीनंतर ती अभ्यासकांना उपलब्ध करून देण्यात येतील याबाबतचे तपशील अर्थातच संबंधित व्यक्तीशी चर्चा करून ठरवता येतील. तूर्त या योजनेचा व्यावहारिक भाग एवढाच की ज्या लेखकांना आपली कागदपत्रे जागेच्या वा अन्य अडचणीमुळे स्वतःच्या घरी सुरक्षित ठेवणे जमण्यासारखे नसले, त्यांनी ती कागदपत्रे परिषदेकडे द्यावीत. परिषद ती नीट ठेवण्यासाठी व्यवस्था करील.

## पुरस्कारांचे मानकरी

साहित्यसम्राट न चि. केळकर पुरस्काराचा मान यंदा सुप्रसिद्ध विचारवंत द. ग गोडसे याना त्यांच्या 'मस्तानी' पुस्तकाबद्दल मिळाला मस्तानीविषयक मराठी इतिहासात प्रचलित असलेल्या कल्पना कशा चुकीच्या आहेत; हे दाखवण्यासाठी अनेक कागदपत्रांचा हवाला गोडसे यांनी दिला आहे. यंदाच ७६ व्या वर्षात पदार्पण केलेल्या गोडसे यांनी 'या पारितोषिकामुळे मस्तानीची जनमानसातील प्रतिमा नितळ होऊन जोन ऑफ आर्कप्रमाणे ती आदरणीय व्हावी' अशी अपेक्षा व्यक्त केली.



अनुक्रमणिका

मुंबईतील प्रियदर्शनी अॅवार्ड हा विविध भाषातील उत्तम लेखनकृती आणि विविध क्षेत्रातील कर्तृत्ववान व्यक्ती यांना देण्यात येतो. तुंबाडचे खोत,झोंबी या पाठोपाठ यंदा विश्वास पाटील यांच्या पानिपत या महाकाव्यसदृश कादंबरीला हा अकरा हजारांचा पुरस्कार मिळाला आहे.

सध्या तरुण वर्गात वोकाळलेले मादक द्रव्यांचे सेवन कमी व्हावे म्हणून मुक्तांगणद्वारे प्रयत्नशील असलेल्या डॉ. अनिल अवचट यांनाही प्रियदर्शनी अॅकॅडमीने यंदा पारितोषिक देऊन गौरविले 'गर्द 'वरील डॉ. अनिल अवचट यांचे पुस्तकही उद्बोधक आहे.

वाडा चिरेबंदी, आत्मकथा, पार्टी, होळी वगैरे प्रायोगिक आणि नव्या जाणिवांनी समृद्ध नाटकांचे कर्ते महेश एलकुंचवार यांना संगीत नाटक अका– दमीने १९८९ चा पुरस्कार जाहीर केला आहे. एलकुंचवार हे नागपूर महा– विद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक असून ९ ऑक्टोबर ८९ रोजी पन्नासाव्या वर्षात त्यांनी पदार्पण केले.

## जानेवारी – फेब्रुवारी १९९० अंक

## वाचकांसाठी स्पर्धा

पुणे येथे २० ते ३० जानेवारी १९९० च्या दरम्यान अ. भा. मराठी साहित्य संमेलन भरणार आहे. त्या निमित्ताने पत्रिकेचा खास अंक निघणार आहे. या अंकात १९८९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण व लक्षवेधक पुस्त- कांची समालोचने देण्यावर भर राहील. त्यासाठी नामवंत समीक्षकांचे आम्ही सहकार्य घेणार आहोतच. शिवाय जागरुक वाचकांनाही सहभागी करून घेणार आहोत आपल्याला लक्षणीय वाटलेल्या ( ८९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या ) कोण- त्याही पुस्तकाचे समालोचन वहीची ६-७ पृष्ठे एवढ्या मर्यादित पाठवावे. त्यातील निवडक समालोचने पत्रिकेत प्रसिद्ध करण्यात येतील. निवडलेल्या दहा समालो– चनांना प्रत्येकी २५ रुपयांचे पारितोषिकही देण्यात येईल. पत्रिकेच्या वाचकांनी या उपक्रमात भाग घेऊन, आपल्याला विशेष वाटलेल्या पुस्तकांवर लिहून पाठवावे. डिसेंबरच्या तिसऱ्या आठवड्याच्या आत ही समालोचने आमच्या कार्यालयात पोचणे आवश्यक आहे. निवडलेल्या पुस्तकांबाबत लेखक, प्रकाशक पृष्ठे, किंमत वगैरे तपशील अवश्य द्यावा.

## कॉ. डांगे — ९१ व्या वर्षात पदार्पण

ज्येष्ठ कामगार नेते कॉ. श्रीपाद अमृत डांगे यांनी ९१ व्या वर्षात नुकतेच पदार्पण केले त्यांचा भव्य सत्कार राष्ट्रपती आर वेंकटरमण यांच्या हस्ते २५ ऑक्टोबरला मुंबईत होणार आहे. त्या निमित्ताने कामगार व सामाजिक अभ्यास अकादमीची स्थापना करण्यात येणार असून, पन्नास लाखांचा निधी उभारण्यात येणार आहे. कॉ. डांगे हे कामगार नेते व भारतातील कम्युनिस्ट चळवळीचे अग्रगण्य नेते म्हणून आजच्या पिढ्यांना ज्ञात आहेत; परंतु एक ग्रंथकार व साक्षेपी टीकाकार म्हणूनही एक काळ त्यांनी गाजवलेला होता. आजही त्यांचे वाचन अद्ययावत आहे आणि वक्तृत्व खणखणीत आहे. साहित्याचे मार्क्सवादाच्या भूमिकेतून त्यांनी केलेले विश्लेषण हे स्तिमित करणारे असे ; आणि त्यांच्या युक्तिवादाचा प्रभाव मनातून दूर सारणे अवघड असे. कॉ. डांगे यांचे भावी जीवन सुखाचे जावो आणि आत्तापर्यंतच्या चळवळीच्या घवडग्यात वेळेअभावी राहून गेलेले लेखनकार्य मार्गी लागो अशी या निमित्ताने प्रार्थना।

## नरुभाऊ लिमये—८१ व्या वर्षात पदार्पण

सुप्रसिद्ध सव्यसाची पत्रकार, दै. प्रकाश, दै लोकशक्ती, साप्ताहिक गतिमान यांचे संपादक व स्वातंत्र्य सैनिक नरुभाऊ लिमये हे दिनांक ८ नोव्हेंबर १९८९ रोजी ८० वे वर्ष पूर्ण करून ८१ व्या वर्षात पदार्पण करीत आहे. परखड शैलीदार लेखन आणि अखंड उत्साह यामुळे नरुभाऊंनी मराठी पत्रसृष्टीवर आपला ठसा उमटवला ५ नोव्हेंबर रोजी पुणे येथे मुख्यमंत्री शरदराव पवार, अच्युतराव पटवर्धन, शंतनुराव किर्लोस्कर यांच्या उपस्थितीत सत्कार व त्यांच्या आत्मचरित्राचे प्रकाशन होणार आहे आमच्या हार्दिक शुभेच्छा !

## कवी बावुलनाथ — ८१

विनायक शामराव काळे उर्फ कवी बावुलनाथ यांनीही नुकतेच ८१ व्या वर्षात पदार्पण केले. गेली पन्नास वर्षे निरपेक्षवृद्धीने काव्यलेखन करणाऱ्या या कवीचे कौतुक व्हावे तेवढे झाले नाही. दसऱ्याला त्यांचा विनोदलहरी हा निवडक कवितांचा संग्रह प्रसिद्ध झाला आहे, त्यात थोडथोडक्या नव्हे तर १७१ विनोदी विडंबनात्मक, उपहासात्मक आणि अजब अशा कवितांचा— अन् तोही छंदोबद्ध कवितांचा समावेश आहे. 'जगावेगळी कविता माझी । विडंबनात्मक उपहासाची। हास्यरसाची करूनी कमाल। उडवूनी देतो धूमधमाल!' असे ते आपल्या

कवितेचे वर्णन करतात. समीक्षकांनी टीकेचा फटका मारला. तरी 'नसे फटाका हा पण लटका, नकळत तुम्हां देईल चटका' असा इशाराही ही कविता देते. बाबुलनाथ यांनी सुबोध कुमारसंभव महाकाव्याचे १७ सर्ग लिहिले आहेत. रसराज जगन्नाथ, स्वामी रामतीर्थ ही खंडकाव्ये लिहिली आहेत. शिवाय एक डझन लहानमोठे कवितासंग्रह. कवितेवर नितांत प्रेम करणाऱ्या कवी काळे यांना यशकीर्ती लाभो हीच इच्छा.

## पु. आ. चित्रे — नाबाद ७५

'अभिरुची' हे मासिक गेली ४५ वर्षे मधला १५ वर्षांचा कालखंड वगळता नियमितपणे चालू आहे. पु. ल. देशपांडे, म वि. राजाध्यक्ष प्रभृतींच्या पहिल्या-वहिल्या प्रतिभाशाली प्रयत्नांची दखल घेणारे हे वाङमयीन नियतकालिक. पु. आ चित्रे यांनी १९४३ ते ५१ पर्यंत ते चालवले. नंतर पुन्हा १९६६ पासून त्याचे पुनरुज्जीवन केले. तरुण होतकरू लेखककवींची प्रतिभा हेरण्याचा त्यांचा प्रयत्न जारीच राहिला. वादग्रस्त विषयांवरील खास अंक हे वैशिष्ट्यही अभिरुचीने आर्थिक अडचण पाचवीलाच पूजलेली असली तरी कायम टिकवले. इतर वाङ्मयीन नियतकालिकांना संस्थात्मक अधिष्ठान आहे तसे अभिरुचीला नाही तरी ते चालू राहिले यामागे चित्र्यांची जिद्द आहे पु. आ. चित्रे यांनी दिनांक ७ ऑक्टोबर ८९ रोजी ७५ वर्षे पूर्ण करून ७६ व्या वर्षात पदार्पण केले. त्या निमित्ताने त्यांचा सत्कार करावा म्हणून एक समिती स्थापन झाली आहे निधिसंकलन करून अभिरुचीचे प्रकाशन सातत्याने होत रहावे अशी व्यवस्था करण्याचा त्यांचा मनोदय आहे

## डॉ. म. वि. गोखले यांचा सत्कार

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कोषाध्यक्ष डॉ. म. वि. गोखले यांचा नोव्हेंबर ८९ मध्ये षष्ट्यब्दिपूर्तीनिमित्त सत्कार करण्यासाठी समिती स्थापन झाली आहे. व्यासंगी समीक्षक व अभ्यासक, अनेक ग्रंथांचे कर्ते आणि एक निरलस सेवाभावी कार्यकर्ते म्हणून त्यांचा लौकिक आहे. सर्वांची अंतरे राजी राखून सौहार्दाने काम करण्यात त्यांचा हातखंडा आहे. परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित यांची विश्वस्तपदावर नियुक्ती झाल्यावर डॉ. गोखले यांना कोषाध्यक्षपदाची जबाबदारी स्वीकारण्याची विनंती केली तेव्हा अन्य कामांचा बाऊ न करता आत्मीयतेने त्यांनी संमती दिली. भावी काळात डॉ. गोखले यांच्या कर्तृत्वाला नवनवी क्षितिजे लाभोत हीच इच्छा.

## डॉ. वसंत स. जोशी - साठाव्या वर्षात पदार्पण

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे माजी संपादक व कार्यकारिणी सदस्य डॉ. वसंत स. जोशी यांनी ऑक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यात साठाव्या वर्षात पदार्पण केले. संत एकनाथांच्या साहित्यावर त्यांनी लिहिलेल्या प्रबंधाला शिवाजी विद्यापीठाने पीएच. डी. दिली. शिवाजी विद्यापीठाचे ते पहिले पीएच. डी. महानुभाव संत, मुक्तेश्वरकृत रामायण, संशोधन साधना, वगैरे दहा पुस्तके त्यांच्या नावावर आहेत. साहित्य परिषदेतर्फे प्रसिद्ध झालेल्या 'भाषा व साहित्य: संशोधन'चे तीन खंड हे त्यांच्याच कल्पकतेचे व परिश्रमाचे फळ होय. वाईच्या किसन वीर महाविद्यालयात मराठीचे विभाग प्रमुख म्हणून दीर्घकाळ ते काम करीत आहेत. अनेक संशोधन प्रकल्प त्यांच्या मनात घोळत आहेत. त्यांना आमच्या शुभेच्छा.

## बाबुराव अर्नाळकर

शालेय वयात वाचनाची गोडी माझ्यासारख्यांना लागली ती सानेगुरुजी, नाथमाधव यांच्या साहित्याने. त्याचप्रमाणे बाबुराव अर्नाळकर यांच्या रहस्य-कथांनीही जलद वाचनाची सवय वाढवण्यात मोलाची कामगिरी केली. रहस्य-कथा हा तसा मुळातच घटनाप्रधान रंजक प्रकार अर्नाळकरांनी तो इतक्या आकर्षकपणे हाताळला की त्याला मोठा वाचकवर्ग लाभला. महिन्याला पाचपाच रहस्यकथामालांचा व्याप त्यांनी समर्थपणे दीर्घकाळ सांभाळला. अर्नाळकरांना अमाप लोकप्रियता लाभली, गिनेस बुकमध्ये ११०० रहस्यकथांचे लेखक म्हणून त्यांची नोंद झाली. परंतु यातून आर्थिक प्राप्ती मात्र बेताचीच झाली. त्यांचे दोन कर्तेसवर्ते पुत्रही निधन पावले आज अर्नाळकरांचे वय ८५ आहे आणि ते मुंबईला गोरेगावच्या पांडुरंगवाडीत अत्यंत आपल्या वृद्ध पत्नी इंदिराबाई-समवेत विपन्न अवस्थेत आज दिवस कंठत आहेत. डोळे अधू असल्याने एकूणच हालात भर पडलेली आहे. मराठीतील या सर्वश्रेष्ठ रहस्यकथाकाराने असंख्य मराठी वाचकांना अमाप आनंद दिला आहे. या वार्धक्यात त्यांना सहाय्य करणे आपले कर्तव्य आहे. महाराष्ट्र शासनाने तसेच परिषदेनेही यात पुढाकार घ्यावा.

## महामंडळ

अ. भा. साहित्य महामंडळाचे कार्यालय सध्या पुण्यास महाराष्ट्र साहित्य परिषदेत आले असून, विविध कामांना वेग आला आहे. मा. मुख्यमंत्री शरद पवार

यांची सप्टेंबरमध्ये महामंडळाच्या व घटक संस्थांच्या प्रतिनिधींनी घेतलेली भेट उपयुक्त ठरली. साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीची प्रक्रिया सुरू झाली असून डॉ. यू. म पठाण, प्रा. गंगाधर पानतावणे, नारायण सुर्वे व रमेश मंत्री हे उमेदवार आहेत. २० ऑक्टोबरला मतपत्रिका रवाना झाल्या असून २० नोव्हेंबर ही मतपत्रिका मिळण्याची अंतिम मुदत आहे. निर्वाचन अधिकारी म्हणून निवृत्त न्यायाधीश प्रतापराव बेहरे हे जबाबदारी सांभाळीत आहेत. महामंडळाचे अध्यक्ष राजेंद्र बनहट्टी, कोषाध्यक्ष राजा फडणीस, कार्यवाह डॉ. जोगळेकर या सर्वांनी महामंडळाच्या कामात नवे चैतन्य आणले आहे. पुण्यातील आगामी साहित्य संमेलनाच्या कार्यक्रमाची आखणीही होत आली आहे. हे समेलन संस्मरणीय होईल यात शंका नाही.

जागतिक मराठी परिषदेत मराठीच्या अगतिकतेची जशी चर्चा झाली तशीच मराठी माणसाच्या विश्वव्यापी मुलुखगिरीचीही प्रचीती आली. ना. शरद पवार यांनी मराठी भाषेच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने पुण्यात एक बैठक सप्टेंबरमध्ये घेऊन लेखक–पत्रकार वगैरेंचे विचार समजावून घेतले. या विचारमंथनातून काही ठोस निर्णय बाहेर पडावे ही अपेक्षा आहे.

मराठी भाषेच्या व साहित्याच्या अभिवृद्धीच्या दृष्टीने ही दिवाळी आणि आणि आगामी वर्ष फलदायी ठरो हीच प्रार्थना. दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा.

शंकर सारडा
संपादक



अनुक्रमणिका

# श्रद्धांजली

## डॉ. विद्याधर पुंडलिक

श्री. ज. जोशी, ग. वा. बेहेरे, वि. शं. पारगावकर यांच्या पाठोपाठ या वर्षी विद्याधर पुंडलिक हेही न परतीच्या वाटेवर निघून गेले. दि. ९ ऑक्टोबर १९८९ रोजी पुणे येथे कंपवाताच्या झटक्याने त्यांचे आकस्मिक निधन झाले ते ६५ वर्षांचे होते. पोपटी चौकट, टेकडीवरचं पीस, माळ, देवचाफा, वेलवुट्टी इत्यादी कथासंग्रह, आवडलेली माणसं (व्यक्तिचित्रे), शाश्वताचे रंग (आस्वादक समीक्षालेख), चाफुला (एकांकिका), माता द्रौपदी, चार्वाक (नाटके) वगैरे त्यांचे मोजके पण गुणसंपन्न लेखन चोखंदळ वाचकांच्या मनाचा कब्जा घेणारे आहे. कॅ. गो. गं. लिमये पारितोषिक (माळ या कथेला) व सोविएत लँड नेहरू पुरस्कार ('चक्र'ला) त्यांना लाभला होता. चिंतनशील वृत्तीने ते मानवी समस्यांच्या व संबंधांच्या मुळाशी जाण्याचा प्रयत्न करीत; त्यातील गुंतागुंतीचे व व्यामिश्रतेचे व्यापक भान ठेवत. सोपी उत्तरे आणि भडक चित्रण यांचा मोह त्यांना कधी पडला नाही. वाङ्मयाकडे आणि जीवनाकडे ते गांभीर्याने पाहात; आणि आपल्या गांभीर्याची चेष्टा करण्यात स्वतःही पुढाकार घेत. वर्षाकाठी अडीच कथांचा हिशेब ते गंमतीने सांगत; आणि मिस्किलपणे फिरक्या घेणाऱ्यांना गप्प करीत. चर्चासत्रात व परिसंवादात ते जेव्हा भाग घेत तेव्हा आपल्या सुस्पष्ट परखड मतांनी ते चर्चेची गाडी नेमकी रुळावर आणत.

अश्विन या गुणी पुत्राच्या अपघाती निधनामुळे (१९८०) पुंडलिकांना जबरदस्त धक्का बसला. अल्सरमुळे ते काही काळ पीडित होते. गेली दोन वर्षे कंपवाताने (पार्किन्सन्स डिसिझने) त्यांना त्रस्त केले होते. गतवर्षी पत्रिकेच्या दिवाळी अंकाचा विषय निघाला तेव्हा त्यांनी आपण होऊन मी श्री पु. भागवत यांच्यावर लिहितो असे त्या अवस्थेतही म्हटले. परंतु त्यांच्या मानसिक

उत्साहाला शरीराची साथ तितकीशी मिळत नव्हती. त्यामुळे तो लेख अखेर मिळाला नव्हता. मराठीला अनेक संस्मरणीय कथा देणाऱ्या पुंडलिकांची स्मृती दीर्घकाळ होत राहील

## प्रा. मंगळवेढेकर

पुण्याच्या सर परशराम भाऊ महाविद्यालयाचे माजी प्राचार्य आणि इंग्रजीचे नामवंत अभ्यासक प्रा. केशव पंढरीनाथ मंगळवेढेकर यांचे दिनांक १८ सप्टेंबर १९८९ रोजी दीर्घ आजारानंतर निधन झाले. प्रा मंगळवेढेकर हे इंग्लिश साहित्याचे रसिक अभ्यासक आणि उत्कृष्ट विद्यार्थिप्रिय शिक्षक होते. इंग्लिश साहित्याबद्दल मुलांना गोडी वाटेल अशा रंजक शैलीत ते तास घेत. त्यांच्या सौम्य आणि शांत स्वभावामुळे सर्वांना त्यांच्याबद्दल लोभ वाटे. त्यांच्या स्मृतीला अभिवादन.

## ना. अ. पेंडसे

जुन्या पिढीतील एक नामवंत पत्रकार नागेश अनंत तथा अप्पा पेंडसे यांचे श्रीरामपूर येथे वयाच्या ८० व्या वर्षी निधन झाले.

या सर्वांना आमची विनम्र श्रद्धांजली

संपादक



अनुक्रमणिका

# एक अनुभवविश्व उमलतं...

– वि. वा. शिरवाडकर

गावाच्या शिवेवर, नदीच्या पलिकडे, वडापिंपळांच्या मांडवाबाहेर, माळाच्या मृगाजिनावर बसलेले एक लहानसे देऊळ. देवीचे. येथे गावाची वस्तीच नव्हे तर माणसांची वहिवाटही संपलेली होती. देवळाचे बांधकाम फारसे रमणीय नव्हते. एका अंधाऱ्या मकाणावर एक पितळी कळस चढविलेला होता आणि समोर मातीच्या पांढुरक्या भिंतीत कोंडलेले एक आवार होते. गाभाऱ्याच्या जवळपास येताच मूर्तीच्या अंगावरील शेंदराचा विस्तार एखाद्या रक्ताळलेल्या ढगा-सारखा दिसायचा. आणि ते उग्र वटारलेले डोळे. गाभाऱ्यात अडकलेला काळोखाचा तुकडा बाहेरच्या उजेडाकडे संतापून पाहात आहे, असे वाटायचे.

शालेय वयात असलेला कोणी एक या देवीचे दर्शन घेऊन केव्हा केव्हा पलिकडच्या मैदानावर जाऊन बसायचा. दृष्टीच्या अखेरच्या तळा-पर्यंत सारे माळ मैदान हिरव्या पिवळ्या गवताने झाकलेले. इतस्तत: वारूळांचे आणि मातीचे उंचवटे, खुरटलेली झुडुपे आणि खडीचे ढिगारे. पण या रूक्षतेवर मावळतीचा प्रकाश जरतारी रुजाम्यासारखा उलगडलेला असायचा. क्वचित एखादी बैलगाडी दगडाळ रस्त्यावर खडखडत यायची, क्वचित बैलांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज, केव्हा झपाट्याने घराकडे वाटचाल करणाऱ्या एखाद्या किसान–कुटुं-बाची वर्दळ, एरव्ही सारे शांत. कोणी एका एखाद्या उंचवट्यावर आसनस्थ होई आणि (अनेकदा) क्षितिजाच्या रेषेवर दिसणाऱ्या डोंगरांच्या निळ्यापारव्या रांगेवर नजर केंद्रित करी. रांग धरून

उभे राहिलेले बलाढ्य ऐरावत. त्यांतील एकदोन डोंगर कोणाएकास परिचित होते. कुमारदृष्टीला भयभीत करणारे तेथील प्रचंड पहाड आणि डोंगरदरीत माजलेली निर्मानुष जंगले... कल्पनेचा कोष पॅरॅशूटच्या छत्रीसारखा उघडे आणि कोठल्या तरी अनिर्बंध चित्रपटाला सुरुवात होई. अनेक रसांची अनेक भलीबुरी कथानके त्यात विणलेली असत.

पण विशेष आवडते, वारंवार 'वन्समोअर' घेणारे कथानक असे बंडाचे. बंडखोरांच्या छावण्या लपविण्यासाठींच ही दुस्तर जंगले देवाने निर्माण केली असली पाहिजेत. उषःकाल, वीरधवल यासारख्या कादंबऱ्यांची चेतवणी असेल; पण हे बंड प्रकरण बरेच रंगायचे. माणसाला अज्ञात असलेल्या त्या जंगलामध्ये, त्या पहाडांच्या पाठीमागे फौजेची तयारी होत आहे. आधी शंभर, नंतर हजार, नंतर दहा हजार –तूर्त इतकी पुरे. बंड प्रकट झाल्यावर हवी तेवढी लष्कर–भरती करता येईल. प्रत्येक सैनिक घोडा, तलवार, चिलखत यांसह 'रेडिमेड' असायचा. पुरेसा रियाज झाल्यावर एक दिवस ते सैन्य जंगलातून बाहेर पडते आहे. उमद्या घोड्यावर स्वार झालेल्या सैनिकांचा तो कर्दनकाळ जमाव! कचेरीच्या ओटयावर बसून विड्या फुंकणाऱ्या पोलिसांचा त्यांच्यापुढे काय पाड लागणार? प्रथम गाव, नंतर तालुका, नंतर जिल्हा; असा एकेक तळ काबीज करीत जायचा.

वर्गातले सोबती, उनाडकीतील सवंगडी, प्रणयाच्या प्राथमिक प्रयोगात गवसलेल्या बालवल्लभा, घरातील लहानथोर माणसे, मुलांवर मिशी उगारणारे मास्तर आणि दोन धड पाय असूनही तैमूरलंगाप्रमाणे भासणारे हेडमास्तर–सैन्यातील अग्रेसर स्वार पाहून सारेचजण आश्चर्याने बेभान होतील गणितातील बेअब्रूची भरपाईही होईल. जिम्मेदारी भारताची नव्हतीच, फक्त महाराष्ट्राची होती. तेवढे कार्य आटोपेपर्यंत अंधार पडू लागायचा. एवढा बंडाचा पसारा चालणाऱ्या कल्पनेला वारुळातून लवलवणारे साप अथवा झाडावरून खाली लोंबणारे पिशाच्चे उत्पन्न करणे काही कठीण नव्हते. मग त्या थोर कर्तबगारीच्या तंद्रीतच गावाकडचे मार्गक्रमण सुरू व्हायचे. कपड्यांना बरेच 'लांडगे' चिकटलेले असत ते ओरबाडून काढताना मग जमिनीला स्पर्श व्हायचा.

इंग्रजी शाळा. एक शिक्षक वर्गावर येतात. सहा फूट उंचीचे. अस्ताव्यस्त, ओबडधोबड आणि वाचनालयातील ग्रंथाप्रमाणे मळकट वाटणारे. समोर आले म्हणजे गुडघ्यापर्यंत पसरलेले कोटाचे काळे वाळवंट प्रथम ध्यानात यायचे. नंतर आपला रंग विसरून कोटाच्या रंगाशी सोयरीक करू पाहणारे. व्यसन तपकिरीचे. त्यामुळे हातानाकाचा नेहमी झगडा चाललेला. अंगवर्णही सावळाच.

माणसाला शरीराचे धिप्पाड ओझे आवडत नाही. शरीर आणि आत्मा यांत काहीतरी वेबनाव आहे असे वाटावे; पण आयुष्याशी असलेले स्नेहाचे ऋणानुबंध स्वरात येऊन बसले होते. बोलायला लागले की, सरोद–सतारींच्या तारा खर्जामध्ये रुमझुमत आहेत, असा भास व्हायचा. होते वर्गशिक्षक, पण आज आले होते एका दत्तक तासाला. दुसऱ्या विषयशिक्षकाच्या गैरहजेरीत. इतिहास हा हातखंडा विषय होता. इतिहास शिकवीत नसत, इतिहासाच्या ओघात नेऊन उभे करीत. अपेक्षा होती की, एखादे ऐतिहासिक प्रकरण ऐकायला मिळेल; पण घडले ते वेगळेच. डगल्याच्या खिशातून त्यांनी एक पुस्तक काढले आणि ते म्हणाले, आपण आज एक कविता वाचू. कविता? म्हणजे मोरोपंत? वामनपंडित? रामदास? यांतले कोणीच नव्हते. कवी होते तांबे. भास्कर रामचंद्र तांबे. कवींना आडनावे असतात आणि हजेरीपटावर लिहिल्याप्रमाणे त्यांच्या संपूर्ण नावाचा उपयोग केला जातो, हेही नवीन होते. थोडा प्रस्ताव केला आणि नंतर 'नदीच्या शेजारी, गडाच्या खिडारी' ही कविता वाचायला आणि उकलायला सुरवात केली. आधुनिक कविता कोणाएकाला थोडयाफार भेटल्या होत्या; पण त्याही अन्वयार्थाच्या खोडयात अडकविल्या जात. रसापर्यंत पोचण्याची संधीच नव्हती; परंतु आज काही वेगळे घडत होते. कवितेचे सौंदर्य गुलाबपाण्यासारखे अंत:करणावर शिपडले जात होते. सारा सभोवार विरघळत होता आणि जाणवत होता फक्त वारा–नदीच्या काठावर, देवळाच्या गाभाऱ्यात, वडाच्या पारव्यांत हसतनाचत वावरणारा वारा हजार वेळा वारा अंगावर घेतला होता, सुखावह झाला होता; पण तेथे प्रत्यक्ष वारा नसताना केवळ त्याची मनोमन जाणीव जो आल्हाद देत होती, तो अपूर्व होता. वाऱ्याला व्यक्तित्व आले होते. स्वभाव मिळाला होता. एका अपार्थिव आनंदाचे वेढे मनाभोवती वसत होते. कविता म्हणजे केवळ अर्थात्मक विधान नसते, एखाद्या विधानाचे केवळ सालंकृत पद्यमय स्वरूपही नसते, तर एखाद्या अनुभवाच्या गाभ्यापर्यंत आपल्याला घेऊन जाणारी ती एक अलौकिक शक्ती असते, याचा कोणाएकास त्या दिवशी प्रथमत: प्रत्यय आला. मनोराज्यात वेडेवाकडे दौरे काढणाऱ्या स्वैर अनिकेत कल्पनेला एक घरटे मिळाले आणि पुढे ते केवळ कल्पनेपुरतेच मर्यादित राहिले नाही. जीवनाचेच ते आश्रयस्थान बनू लागले

मध्यरात्र उलटून गेलेली. धोंडा आदळून काच फुटावी त्यांप्रमाणे अचानक तो काळोख आणि एकांत झुंडीच्या ऑरडाओरडीने फुटून गेला. क्रोध आणि निराशा यांना जणू एका निखारलेला स्वर फुटला होता. कोणीएक आपल्या जागेवरून ऐकत होता, पहात होता. एरव्ही आपापल्या उद्योगात गुंतलेली

माणसं, संस्कृतीच्या चिरेबंद आवरणात वावरणारी, दुकानदारी करणारी, ओझी वाहणारी, नोकरी करणारी माणसं, बरी माणसं, वाईट माणसं, दरिद्री माणस, सुखवस्तू माणसं, तरुण, पोरसवदा आणि प्रौढही—या सर्वांना काय झालं आहे ? विचारशक्तीच्या चिंधया झाल्याप्रमाणे ही माणसे बेभान होतात, अदृश्य कट्यारी छातीत शिरल्यासारखी आक्रोश करतात. सुखासमाधानाचे बिछाने सोडून, शरीरावर उतरलेली नीज घाणेरड्या पांघरुणाप्रमाणे बाजूला फेकून, घराचे संरक्षक उंबरठे ओलांडून ही माणसे अशी निराधार काळोखात का घुसली आहेत ? त्या लोकांचा आवडता नेता तुरुंगात ओढून नेला होता आणि त्या तुरुंगाजवळचा हा परिसर होता.

साम्राज्यसत्तेविरुद्ध स्वातंत्र्याचा लढा सुरू झाला होता आणि हे रामा-शिवागोविंदा आपल्या रटाळपणाचे कवच फाडून बाहेर उसळले होते. जमावा—पासून दूर असलेला आणि तरीही जमावात गेलेला कोणीएक त्या चळत्या लाटा आपल्या अंगावर घेत होता. एखाद्या लाकडी तराफ्याप्रमाणे त्याची जाणीव त्या तुफानी दर्यावर मुक्तपणे हिंदोळत होती. थोड्या वेळाने पोलिसांची दळे आली. नंतर शिट्ट्या, बुटांचे, लाठ्याकाठ्यांचे आवाज, वेदनेच्या किंकाळ्या, क्रोधाची गर्जिते, अंधारात ओघळणाऱ्या अस्पष्ट आकृती आणि नंतर संपूर्ण सामसूम. रस्त्यावर आत एक अस्पष्ट नाते जडत होते. कवचाच्या आत असलेल्या माणसांशी, माणसाच्या जमावाशी, शरीरता झुगारून आत्मिक रूपात उरण्याच्या माणसाच्या अद्‌भुत शक्तीशी.

असे काही मनातले, काही जनातले, काही कल्पनेतून उतरलेले, काही प्रत्यक्षा-तून उपसलेले, जे काही सभोवती हेलावत होते, त्याला अखेरी काव्याचा प्रवाह सापडला. नाट्यासारखे इतर वाङ्मयप्रकार कोणाएकाला प्रिय होते. अन्य प्रकारात लेखन करण्याचा प्रयत्नही तो करीत होता पण कविता सर्वांत जवळची होती, सर्वांत अधिकही होती. आपल्या व्यक्तित्वाची मूलद्रव्ये कविते-मध्येच प्रवाहित होत आहेत, असे वाटायचे.

कवीच्यापुरता हा शोध कोलंबसाच्या शोधाइतकाच महत्त्वाचा असतो. एक नवीन, खास स्वतःचे खाजगी असे बेट त्याला प्राप्त होते जेथे तो आणि नंदादीपां-प्रमाणे आकाशात उंचावर जळणारे त्याचे प्रिय कवी याशिवाय इतर कोणालाच प्रवेश नसतो. या बेटाचा किनारा म्हणजे अव्यक्त, कोठेही न गवसणाऱ्या सांत्वनाचा आणि आश्वासनाचा किनारा असतो. जेव्हा तो व्यवहारात वावर—ताना दिसतो, तेव्हाही तो या बेटापासून फार दूर गेलेला नसतो, आणि एकटा असतो तेव्हा तर त्या बेटावरतीच त्याचा मुक्काम असतो. त्याच्या साऱ्या

सुखदुःखाच्या,व्यथावेदनांच्या,मनोगतांच्या रेषा या बेटाच्या बंदरात येऊन दाखल होतात वितस्तेच्या तीरावर जहांगिराने कोठे तरी लिहून ठेवलेले आहे म्हणतात की, 'जे आहे, ते सर्व येथेच आहे.' तशीच कविजीवनाच्या आदिपर्वात कवीची अवस्था होते कोणीएक याला अपवाद नव्हता. याचा अर्थ असा नव्हे की, तो कवितेसाठी आणि कवितेमध्ये जगत होता कवितेसाठी जगणे हे 'विशुद्ध कविते'-प्रमाणे एक सशाचे शिंग आहे नसलेले आणि असले तर असायला नको असलेले. कदाचित कोणी कवितेसाठी जगला तर तो चांगली तर नव्हेच, पण साधारण बरी कविताही लिहू शकणार नाही. स्वतःच्या शरीरापासून भोवतालच्या मानुष आणि विमानुष विश्वापर्यंत माणसाचे जीवन पसरलेले असते. त्याच्याशी आपल्या प्रकृतींचे आणि विकृतींचेही संबंध जोडणे, त्यातील सत्त्व आपल्या व्यक्तित्वात शोषून घेणे, त्यातील सुंदरता, कुरूपता, न्याय, अन्याय यांना प्रतिसंवाद देणे, हाच जर 'जगण्या'चा अर्थ असेल तर कवी नुसता जगतच नाही, तर ठराविक कालावधीमध्ये इतरांपेक्षा अधिक जगत असतो. विकृत आसक्तीपासून अविकृत भावविचारापर्यंतचे एक अनुभवविश्व त्याच्या मनोवार उमलते आणि त्याची भावात्मक प्रतिक्रिया झपाटलेल्या लयबद्ध शब्दांत ओतल्याशिवाय त्याला समाधान लाभत नाही.

कोणीएक याच मार्गाने चालला होता. मराठी-इंग्रजीतील काही श्रेष्ठ कवींना आपले प्रकाशदाते करून त्याची कविता चाचपडत होती, ठेचाळत होती आणि स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व शोधीत होती. काहीशा एकटेपणातच. दाद मिळाली तर भरपूर आनंद होई, पण ती मिळवायचा प्रयत्न करण्याचे मनात येत नसे. लग्नाच्या मुलीसारखी कविता कोणासमोर उभी करणे आणि अनुकूल अभि-प्रायासाठी कटोरा पुढे करणे म्हणजे कवितेचा अपमान आहे, असे वाटे. आपण लिहू, ते कोणाला आवडेल वा आवडेल, पण ते बरे की वाईट हे आपल्यालाच कळायला हवे, आपणच ते ठरवायला हवे याच अवस्थेत, प्रकाशनाची मोहीम टपालखात्यामार्फत सुरू झाली परतदान मुबलक झाले. अनेकांना वाटते की, संपादकवर्ग हा नवीनाचा वैरी आणि वशिल्याची घोरपड लावूनच काबीज करता येण्यासारखा असतो. सामान्यतः हे खरे नसते. संपादकाचे स्वतःचे मत त्याच्या कार्यक्षेत्रात जारी असणे हे स्वाभाविक व आवश्यकही असते. त्याची व्यक्तिविशिष्ट रसिकता असते, त्याच्या मासिकास काही हवेनको असते, केव्हा त्याच्या आकलनास काही मर्यादाही असतात. काही असले तरी तो नवीनाच्या शोधात असतो यात शंका नाही; पण प्रौढावस्थेपेक्षा प्रारंभिक अवस्थेत, लेखक आपल्या लेखनात अहंकाराने अधिक गुंतलेला असतो त्यामुळे तारतम्य रहात

नाही आणि बऱ्यावाईटाची समजही अशक्य होते. कोणाएकासही हे तारतम्य नव्हते. प्रथमावस्थेत लिहिलेल्या किमान शेदीडशे कविता–तरी. त्यातील काही अग्रेसर मासिकांत प्रसिद्ध झालेल्या–त्याने पुढे आपल्या संग्रहात घातल्या नाहीत अथवा शिल्लकही ठेवल्या नाहीत; पण तेव्हा वाटायचे की, आपली प्रत्येक ओळ जगातील चिरंतन वाङ्मयाच्या जामदारखान्यात दाखल व्हायला हवी. परंतु डोक्याच्या भोवती हे अहंकाराचे धुके असल्याने परतदानाचा फारसा त्रास झाला नाही. पुढे म्हणजे कॉलेजच्या दुसऱ्या तिसऱ्या वर्षापर्यंत हा जमाना संपला आणि प्रकाशन हवे तसे होऊ लागले. या प्रवासात आणि सुरुवातीच्या काळातच संस्मरणीय प्रोत्साहन आणि तेही चांगल्या मोबदल्यासह–लाभते ते बालबोध–मेवाकार देवदत्त टिळकांचे. परतफेडीचा मार्ग नसलेले एक ऋण होते ते.

(पूर्वप्रसिद्धी ललित–दिवाळी १९६८)

(वि. वा. शिरवाडकर
प्रशांत, शरणपूर रस्ता, नाशिक)



अनुक्रमणिका

# एका लेखनाचा निर्लेप आलेख

– माधव मनोहर

माझ्या लेखनाच्या एकूण कालावधीचा आवाका बराच मोठा आहे. वयोमानाची विशी उलटण्यापूर्वीच मी लेखनाला सुरुवात केली. गेली साठ वर्षे मी अव्याहत काही ना काही लेखन करीत आलो आहे. हा लेखनसंभार अमर्याद असला तरी तो तसा एकसंध नाही. तो विस्कळित आणि अव्यवस्थित आहे, माझ्या लेखनाच्या दिशा वारंवार बदललेल्या आहेत. आणि या अनपेक्षित लेखन प्रवासात चढ-उतारही तसे पुष्कळच आहेत.

हे सर्व लेखन नानाविध असे आहे. एकाच प्रकारच्या एकदिक् लेखनात मी स्वतःला का गुंतवून घेतले नाही, आणि माझ्या लेखनाच्या दिशा आणि प्रकार मी काय म्हणून बदलत गेलो, या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा यत्न मी प्रस्तुतच्या लेखात करणार असलो तरी त्या यत्नाच्या सफलतेबाबत मी स्वतःच साशंक आहे. कारण एकेका विशेष काळात ज्या प्रकारचे लेखन मी सातत्याने केले, त्याचा आवाका ते लेखन करीत असताना माझ्या कधी धड ध्यानात आलेला नव्हता. ते जवळपास विस्मृतीत गेले होते. त्या लेखनाचे काही विशेष अन्य अभ्यासकांनी माझ्या निर्देशनास आणून दिले नसते, तर माझे मलाही कळले नसते.

साठ वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडातील हे सर्व लेखन तसे प्रायशः निरुद्देश होते. मात्र त्या त्या कालखंडात ते सहेतुक होते, आणि त्या लेखनामागचा हेतू त्या लेखनाच्या मर्यादेत सफल झाला आहे; असे त्या लेखनाचे निरीक्षक वा अभ्यासक जेव्हा मला सोदाहरण दाखवून

देतात तेव्हा प्रथम आश्चर्यचकित होतो तो मीच. असो.

ज्या घटना घडून गेल्या, त्यांच्या संबंधात कार्यकारणभाव शोधण्याची यातायात फारशी न करता निदान पक्षी त्या लेखनामागच्या समकालीन प्रेरणा तरी काय होत्या, त्यांचा शोध आता या क्षणाला जर मी न घेतला तर कविवर्य रेंदाळकरांप्रमाणेच 'काय निरुद्देश सर्व लेखन मग होते?' असा प्रश्न माझा मलाच विचारावा लागेल !

सो कॉल्ड लेखनाला मी प्रथम सुरुवात केली, तेव्हा मी काही लेखन करीत आहे, याचीच जाण नसावी. त्याचा कसलाही विचार माझ्या मनाशी मी केला नसावा. या लेखनाला सुरुवात करण्यापूर्वी मी काव्य करीत असे. पण ते काव्य-लेखन मात्र असे होते की आज त्याला काव्य म्हणायला मी धजावणार नाही. ते काव्य सामान्यत: देशभक्तिपर होते. आणि स्वातंत्र्यवीर सावरकर व स्वातंत्र्य-शाहीर गोविंद या कवींची नावे मी ऐकून असलो, तरी माझ्या कोवळ्या मनाला झपाटून टाकले होते ते प्रामुख्याने तिवारींच्या संग्रामगीतांनी.

नाशिकच्या माझ्या शाळकरी दिवसांत, यशवंत व्यायाम शाळेत मी नियमित जात असे. तिचे संचालक महाबळ गुरुजी आणि त्र्यंबकरावमामा देशपांडे हे दोघेही एका काळी सावरकरांचे सक्रिय सहकारी होते. व्यायाम शाळेच्या मेळ्यासाठी प्रसंगपरत्वे महाबळगुरुजी सुप्रसिद्ध गोविंदकवींना सांगून हवी तशी रचना करून घेत. त्या पदांची गोडी मला लागली होती. स्वतंत्रतेचे स्तोत्र, भूपाळी, शिवरायांची आरती, जिजाऊचा पाळणा आणि सावरकर-गोविंदांचे तानाजी-बाजी पोवाडे – त्या काळात ते जप्त असले तरी – आम्हांला मुखोद्गत असत.

एकदा केव्हा तरी अनपेक्षितपणे माझ्या ध्यानात आले की, तशा प्रकारच्या पोवाड्यांची आणि–विशेषेकरून पदांची–रचना करणे सोपे आहे. 'ट'ला 'ट' आणि 'री'ला 'री' जोडून यमक जमवण्यात अथवा विशिष्ट चालीवर गुण–गुणता येईल अशी रचना करण्यात कठिण काही नाही हे माझ्या मनाने घेतले. मी अनाथ विद्यार्थी गृहाच्या मेळ्यासाठी पदे रचू लागलो. साथीला सोपानदेव चौधरी असत. त्यामुळे चालींना तोटा नसे. दिलेल्या चालीवर शब्दांची जुळवाजुळव करण्यात मला रस होता. त्या काळात मेळे फार लोक–प्रिय होते. आपण रचलेली गाणी मेळ्यातून म्हटली जात आहेत, आणि ती गाणी माझी मीच ऐकतो आहे, हा अनुभव आनंददायक होता.

या काळात शाळेच्या गॅदरिंगसाठी स्वागतगीत रचणे वा एखाद्या स्थानिक गवयाने दिलेल्या चीजेबरहुकूम गेय गीत रचणे हे नित्याचेच झाले होते.

नाशिकच्या 'स्वातंत्र्य' साप्ताहिकात दर आठवड्याला एक याप्रमाणे देशभक्तिपर कविता 'अरुण' या टोपण नावाने मी देऊ लागलो. त्या कवितांनी रसिकांचे नसले तरी पोलिसांचे लक्ष वेधून घेतले होते. अर्थात ही सर्व रचना एका परीने हुकूमेहुकूम अशी होती. कालांतराने या नगण्य रचनांचे विस्मरण घडणे अपरिहार्य होते. या लेखाच्या निमित्ताने त्यांचे स्मरण झाले तेव्हा माझे मलाच आश्चर्य वाटले !

माझी पहिली आणि खरी ओढ निखळ काव्याचीच आहे. शाळकरी दिवसांच्या अखेरीस लायब्ररीचा छंद जडला. प्रथम काव्यसंग्रह वाचून अभ्यासून फस्त केले. ते केवळ प्रमुख कवींचेच होते असे नाही. हाती लागतील त्या कवींचे कविता-संग्रह मी वाचले. परिणामी पूर्वसूरींतील पदांसारखीच कवितांची रचनाही मला बिनचूक आणि सहज जमली. म्हणून काव्यरचनेच्या फंदात पडलो माझ्या शेपन्नास कविता तालेवार आणि प्रतिष्ठित मासिकांतून प्रसिद्ध झाल्या.

त्यामुळे लालजी पेंडसे किंवा शांताबाई कशाळकर यांच्यासारखे स्नेही मला कवी म्हणूनच ओळखू लागले. पुढे लालजी पेंडसे यांच्या 'साहित्य आणि समाजजीवन' या ग्रंथाचे 'सह्याद्री' मासिकात मी प्रदीर्घ परीक्षण लिहिले, ते वाचून त्यांना मोठा धक्का बसला असणार. त्यातून सावरायला त्यांना बराच वेळ लागला असणार !

माझी पहिली प्रदीर्घ विलापिका प्रथम नागपूरच्या 'वागीश्वरीत' तीस सालापूर्वी प्रसिद्ध झाली होती, आणि अखेरची 'प्रतिभा' पाक्षिकात. दरम्यानच्या वीस वर्षांत माझ्या कितीतरी कविता नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. त्यातील एकही आज माझ्या संग्रही नाही. पण डॉक्टरेटसाठी मराठी काव्यावर प्रबंध लिहिणाऱ्या एका अभ्यासकाने मला एकदा विचारले 'माधवराव, तुमच्या इतक्या कविता अशा लपवून का ठेवल्या आहेत ?' तेव्हा पुनश्च एकवार मी आश्चर्यचकित झालो होतो !

तीस-बत्तीस सालच्या सुमारास नाशिकच्या एच. पी. टी. कॉलेजात मी आणि वि. वा शिरवाडकर बी. ए. करीत असताना एकाच बाकावर बसत होतो. आम्ही काही समवयस्क व सममनस्क मित्रांनी सुप्रसिद्ध रविकिरण मंडळाच्या धर्तीवर 'ध्रुव मंडळाची' स्थापना केली होती, शिरवाडकरांनी 'जीवनलहरी' च्या प्रस्तावनेत त्याची माहिती दिली आहे. या काळातील एक घटना माझ्या स्मरणात आहे. कॉलेजच्या मॅगेझिनचा मी संपादक असताना शिरवाडकरांनी आपले एक प्रेमगीत त्यात छापण्यासाठी दिले. ते आधीच वाचनात आल्यामुळे कुसुमाग्रजांच्या प्रेमगीतातील प्रश्नाला प्रतिसाद देणारी

दुसरी कविता मी लिहिली ही दोन्ही सुनीते प्रचलित शार्दूलविक्रिडित वृत्तात होती ती लगतच्या दोन्ही पृष्ठांवर छापण्याची व्यवस्था मी केली दुर्दैव असे की मॅगेझिनचे ते अंकच आज उपलब्ध नाहीत !

माझ्या कवितांच्या बाबतीतील एक शेवटचीच गोष्ट. बत्तीस सालच्या सुमाराला नाशिकला भरलेल्या 'महाराष्ट्र कविसंमेलनाचा' मी चिटणीस होतो. स्वागताध्यक्षा लक्ष्मीबाई टिळक, आणि अध्यक्ष माधवराव पटवर्धन. किंबहुना तेच अध्यक्ष असावेत, असे गृहीत धरून या संमेलनाची आखणी केली होती. त्या आधीपासूनच मी माधव जूलियन यांच्या 'विरहतरंगाच्या' प्रेमात पडलो होतो. ते प्रेम आजतागायत अबाधित आहे. 'विरहतरंगाचे' सव्वादोनशे श्लोक मला उलटे तोंडपाठ आहेत !

माझ्या कवितेविषयी येथवर भरभरून लिहिले, याचे कारण कविता ही माझी पहिली प्रेयसी होती. कवितेने मला जितका आनंद दिला तितका अन्य कोणत्याच साहित्यविशेषांनी दिलेला नाही; अर्थात 'प्रतिभेच्या' अस्तानंतर कविता लिहिल्याचे मला आठवत नाही. हे असे अद्भुत का घडले, त्याचे कारणही सापडत नाही

एकीकडे हे काव्यविषयक प्रकरण रंगत असतानाच दुसरीकडे माझ्या लेखनाबाबत आणखी काही कोड्यात टाकणाऱ्या घटना घडत होत्या. अन्य साहित्यविशेषही मला खुणावत होते. त्या खुणाही जबरदस्त होत्या. त्यांच्याकडे कानाडोळा करणे माझ्या ताकदीबाहेरचे होते. ज्या नियतकालिकातून माझ्या कविता प्रसिद्ध होत होत्या, त्याच नियतकालिकातून माझ्या लघुकथाही प्रसिद्ध होत होत्या वैचारिक लेखही येत होते.

शाळकरी दिवसांच्या अखेरीस व कॉलेजकरी दिवसांत इंग्रजी वाचनाची माझी आवड आणि भूक वाढतच गेली ती इतकी की मराठी वाचनाकडे माझे सहेतुक दुर्लक्ष होऊ लागले. या इंग्रजी वाचनाचा अनपेक्षित परिणाम म्हणजे मराठीला सर्वथैव अपरिचित असे चित्रविचित्र आलोक माझ्या दृष्टिपथात येऊ लागले मराठी वाचकांसाठी त्या कवितांचे अनुवाद करावेत, असे वाटू लागले कॉलेजच्या पहिल्या दुसऱ्या वर्षात खण्डकाव्याच्या लेखनाबरोबरच रवींद्रनाथांच्या गार्डनरमधील भावमधुर कवितांचा अनुवादही मी केला. पण हे सर्व हळू हळू मागे पडत गेले इंग्रजी भाषेतील काव्येतर अन्य साहित्याचे वेड वाढत गेले (ते आजतागायत कायम आहे.)

इंग्रजी ललित साहित्य इतके मनोवेधक होते की त्याचा अल्पस्वल्प तरी परिचय जिज्ञासू मराठी वाचकांना करून द्यायला हवा, असे मला वाटले. त्या

दिशेने पहिला यत्न म्हणून मी वर्नार्ड शॉच्या नाटकांवर लेख लिहिला. हा लेख विस्ताराने पुष्कळच मोठा असूनही 'रत्नाकर'ने मोठ्या उत्साहाने छापला. 'रत्नाकर' हे साहित्यगुणाढ्य मासिक त्याच्याशी तुलना करण्यायोग्य असे अन्य मराठी मासिक आढळत नाही. शॉवरचा हा लेख एखाद्या छोट्या पुस्तका-इतका मोठा होता त्याच्या स्वीकाराचे पत्र संपादकांकडून आले, त्यात एक सूचना होती: यापुढचा लेख पाठवताना कागदाच्या एकाच बाजूवर लिहावा. म्हणजे गंमत बघा छापखान्याकडे पाठवायचा मजकूर पाठपोट लिहू नये ही साधी गोष्टही तोपर्यंत मला माहित नव्हती !

शॉनंतर गाल्सवर्दी आणि जेम्स बॅरीवर लिहिले. शॉ, गाल्सवर्दी व बॅरी हे त्या काळातील भिन्न प्रकृतीचे मोठे नाटककार होते. त्यांच्या नाटयकर्तृत्वाचा मराठीत विस्तृत परिचय प्रथमच होत होता. त्यामुळे जिज्ञासू वाचक मला भेटायला नाशिकला माझा पत्ता शोधत येऊ लागले. माझ्यासारखा एक पोरसवदा विद्यार्थी या विद्वज्जड लेखांचा लेखक असेल, यावर त्यांचा विश्वास बसत नसे.

याच सुमारास डी. एच. लॉरेन्सच्या प्रक्षोभक लेखनविशेषांचा परिचय करून देणारा दीर्घ लेख लिहिला. थॉमस हार्डी, युजीन ओ'नील, जे. एम. सिंज, हॅन्स फॅलडा, पिरांदेलो, मोल्नार इत्यादि पाश्चात्य लेखकांविषयीही असेच वेळोवेळी लिहिले. या परंपरेतील अखेरचा लेख म्हणजे इब्सेनवरचा. तो गतवर्षी लिहिला या जगद्विख्यात पाश्चात्य साहित्यिकांवरील माझे पहिले लेख केवळ परिचायक स्वरूपाचे होते. उत्तरोत्तर ते क्रिटिकल होत गेले पण या सर्व लेखना-मागची प्रेरणा एकच होती. तो म्हणजे अग्रगण्य पाश्चात्य स्वत्वविशेष लेखकांचा परिचय मराठी वाचकांना करून देणे.

कॉलेजच्या अखेरच्या वर्षी ध्यानीमनी नसता अचानक मी एक कादंबरी लिहिली. 'ज्वाला.' ती चारपाच वर्षांनी प्रसिद्ध केली, तिच्या प्रस्तावनेतील पहिल्याच वाक्याने वाचक चक्रावले असणार ! ते वाक्य आता नक्की स्मरत नाही, पण असे काहीसे होते : 'माझे अभिन्न जीवनमित्र माधव मनोहर हे दिवंगत झाले असले तरी--' आणि त्या प्रस्तावनेत असेही म्हटले होते की या माझ्या दिवंगत मित्राने ही जी कादंबरी लिहिली होती, ती प्रामुख्याने फडके, माडखोलकर आणि पु. य. देशपांडे या कादंबरीकारांच्या दडपणाखाली. भावार्थ असा की हे लेखन त्याचे असले तरी त्या लेखनामागची सर्वथैव प्रेरणा ही त्या काळातील लोकप्रिय कादंबरीकारांची होती. त्या कादंबरीने अभूतपूर्व वाङ्मयीन वादळ उठवले. अनंत काणेकर, प्रभाकर पाध्ये, डॉ. ग. य. चिटणीस, वि. ह.

कुलकर्णी प्रभृती बुजुर्ग टीकाकारांनी या कादंबरीविषयी उलटसुलट असे-पण उलट बरेच - लिहिले. मलाही माझा डिफेन्स देणे भाग पडले. आणि तो डिफेन्स प्रसिद्ध झाल्यावर पुन्हा वादविवादाची रणधुमाळी माजली. शामराव ओकांनी 'म्हादवा सुताराची गोष्ट' लिहून त्या रणधुमाळीचा समारोप केला. त्या उपरोधिक गोष्टीचे प्रतिपाद्य असे होते की 'ज्वाला'ची जाहिरात करण्यासाठी काही प्रतिष्ठितांनी हा एक स्टन्ट जाणूनबुजून घडवून आणला होता! ते काही असो. मराठी साहित्य-विचाराच्या लेखी या वादाच्या निमित्ताने एक महत्त्वाची गोष्ट घडली. कादंबरीनिर्मितीच्या प्रक्रियेबाबत जे विचारमंथन या वादातून झाले, त्याची परिणती अनंत काणेकर यांच्या 'स्वप्नरंजन' या अन्वर्थक संकल्पनेत झाली.

त्या कादंबरीने उडवलेल्या सेन्सेशनने उत्तेजित होऊन मी आणखी कादंबऱ्या लिहायला हव्या होत्या. पण तसे घडले नाही. जे काय अनपेक्षित घडले, ते कसे घडले; हे माझे मलाच अजून कळलेले नाही. पण जे काही घडले ते असे. 'ज्वाला'पर्यंतचे माझे लेखन बहुश: स्वतंत्र होते. क्वचितच मी अनुवाद केले होते. पाश्चात्य नाटककारांविषयी मी लेखमाला लिहिली आणि अगणित पाश्चात्य नाटके वाचली. 'बॅक टु मेथुसेला' सारख्या शॉच्या वैचारिक गंभीर नाटकापासून तो पराकाष्ठेच्या थिल्लर अशा फार्सवजा करमणूकप्रधान नाटकांपर्यंत. या सर्व कालखंडावर इब्सेनचा सर्वकष प्रभाव होता. पाश्चात्य नाटकाचा अनुवाद करायचा, तर इब्सेनपासून ओ'नीलपर्यंत अनेक नाटककारांच्या अप्रतिम नाटयकृती माझ्या डोळ्यासमोर होत्या. पण चाळीस सालापर्यंत नाटकाचा अनुवाद करण्याचा विचार माझ्या डोक्यात आला नव्हता. दोन पृथगात्म प्रवृत्तीच्या नाटयकृतींनी या काळात माझे लक्ष वेधून घेतले. कॅरेल चॅपेकचे 'मदर' व व्हॅलेन्टिन काटयेव्हचे 'स्क्वेअरिंग दि सर्कस.' मदर हे गंभीर, विचारप्रवर्तक, नाटक होते. दुसऱ्या युद्धातील सक्रिय सहभाग हा 'मदर'चा विषय होता. तर काटयेव्हच्या अफलातून फार्समध्ये पोथीनिष्ठ कम्युनिष्टांच्या आचारविचारांची टिंगलटवाळी होती. त्यातील उपहास विदारक होता. चॅपेक हा झेक तर काटयेव्ह रशियन. त्यांच्या उपर्युक्त नाटकांचे अनुवाद 'आई' व 'सशाची शिंगे' या नावांनी मी जवळपास एकाच वेळी केले होते. पण ते प्रसिद्ध केले ते मात्र चारपाच वर्षांच्या अंतराने. पैकी 'आई'चे अभूतपूर्व स्वागत झाले. या नाटकाला खांडेकरांची विवेचक प्रस्तावना होती. त्याच्या कव्हरवर दातेकर्तक यांचे अभिप्राय होते. या नाटकाचे प्रयोग दुर्मिळ का होईनात,

पण आजतागायत हांत आहेत. प्रयोग–निरपेक्ष अशाही या नाटकाची गुणवत्ता व योग्यता होती.

तर 'सशाची शिंगे' हा एक विलक्षण रंगतदार आणि उठवळ फार्स आहे. स्टालिनच्या निष्ठुर कारकीर्दीत या फार्सला परवानगी कशी मिळाली आणि अलोट लोकप्रियता कशी लाभली हे वादप्रश्न आजही अनुत्तरित आहेत. कम्युनिष्टांचे नाटक म्हणून प्रयोगासाठी मी ते प्रथम कम्युनिस्ट आय. पी. टी. ए'च्या हवाली केले. तेव्हा त्या नाटकाचे नियोजित दिग्दर्शक होते माझे मित्र प्रभाकर गुप्ते आणि एका प्रमुख भूमिकेत होते आत्माराम भेंडे. अर्थात हे दोघेही त्या काळात तसे कोणीच नव्हते. 'आय. पी. टी. ए'ने या नाटकाच्या तालमीही सुरू केल्या, त्या पाहणाऱ्या काही कट्टर कम्युनिस्टांना असे भावले की या नाटकात आपली यथेच्छ टिंगलटवाळी आहे. त्यांनी हा प्रश्न 'राजभवन'-मधील आपल्या बॉसकडे नेला असावा. त्यांचा मनाईहुकूम हाती आला. नाटकाच्या तालमी एकाएकी थांबल्या. मी ते नाटक सरळ उचलले आणि कम्युनिस्टांच्या विरोधात असलेल्या सोशलिस्ट आय. एन. टी च्या हवाली केले. गुप्ते पुण्याला गेले म्हणून भेंडे दिग्दर्शक झाले. याच नाटकापासून भेंडे यांच्या प्रथम प्रायोगिक व नंतर व्यावसायिक नाट्यकर्तृत्वाच्या कारकीर्दीला सुरुवात झाली त्यांनीच पुढे 'आई'ही केले. तोपर्यंत त्यांच्या हाती मी झोपलेले नाग हे आणखी एक जबरदस्त नाटक दिले. त्यापुढचे महत्त्वाचे अनुवादित नाटक म्हणजे 'डावरेची वाट.'

यातील प्रत्येक नाटक प्रक्षोभक आणि आव्हानक आहे. या नाटकांचे प्रयोग अशा काळात झाले की जेव्हा मराठी रंगभूमी प्रायः अस्तित्वातच नव्हती. किंबहुना 'प्रायोगिक' या नाट्यविशेष संज्ञेचा जन्मही त्यावेळी झालेला नव्हता. नाट्यतज्ज्ञ ज्ञानेश्वर नाडकर्णींनी म्हटले आहे की या नाटकांनी प्रायोगिक मराठी रंगभूमीचा पाया घातला. म्हणजे प्रायोगिक रंगभूमीची मुहुर्तमेढ रोवण्याचे श्रेय या नाटकांचे आहे. पण गमतीची गोष्ट अशी की ही नाटके लिहिताना असा काही विचार माझ्या मनात नव्हता. ही नाटके मी लिहिली ती केवळ स्वेच्छारंजनासाठी.

या प्रकारचे अनुवादित लेखन मध्यावधीत मी बरेच केले. कालांतराने मिळालेला प्रतिसाद काहीही असो ते लेखन निर्हेतुक होते, असा निःशंक निर्वाळा मी देऊ इच्छितो. स्वत्वसंपन्न पाश्चात्य नाटकांप्रमाणेच जागतिक भाषांतील उत्तमोत्तम कादंबऱ्यांचेही अनुवाद मी केले त्या अनुवादातही माझे स्वतःचे असे वैशिष्ट्य होते. शब्दशः भाषान्तर मी कधी केले नाही. केले ते

रूपान्तर तेही सहेतुक. मराठी वाचकांना ते आपले वाटावे म्हणून स्थलकाल नावे-गावे, चालीरीती व वाक्प्रचार सर्वथैव बदलून त्यांचे मराठीकरण मी केले.

हे सर्व अनुवाद स्वच्छंद, स्वैर आहेत उदाहरणार्थ 'एक आणि दोन'ची मूलाधार असलली एयान-फोमची कथा ही मुळात दीर्घ असली तरी कादंबरीच्या मानाने छोटी होती. माझ्या मते हा विषय कादंबरीचा आहे; कथेचा नव्हे. मूळ कथावस्तूत अनेक नवे प्रसंग कल्पून तिला फुलफ्लेज्ड कादंबरीचा आकार दिला. 'एका रात्रीची गोष्ट' लिहिताना समग्र पार्श्वभूमी, वातावरण त्यातील माणसांसह मी बदलून टाकले 'किल्ली' या मूळ जपानी कथेबाबतही. ह्याच मार्गाचा अवलंब केला. मूळ कथेत यत्किंचितही बदल न करता अधिकृत असे सरळ स्वच्छ भाषांतर केल्याचे उदाहरण एकच. कृष्णचंद्रांचे 'अन्नदाता' त्या कथेची पार्श्वभूमी मूलतः एतद्देशीय होती हे त्याचे कारण.

जे कादंबऱ्यांबाबत तेच लघुकथांबाबत ! माझी एकही अनुवादित कथा अशी नाही की जी शब्दशः भाषांतरलेली आहे. तीसेक वर्षांपूर्वी दीडदोनशे पाश्चात्य कथांचे अनुवाद मी केले, 'सत्यकथा हंस' इत्यादी प्रतिष्ठित मासिकातून ते आले 'सत्यकथे'च्या अखेरच्या काळात कॅरेल चॅपेकच्या 'प्रक्षिप्त कथां'ची एक मालिकाच मी सादर केली या जुन्या कथा मी विसरूनच गेलो होतो पण सुप्रसिद्ध कथातपस्वी राम कोलारकर यांनी परिश्रमपूर्वक या अनुवादित कथांचे उत्खनन केले त्यांचे व्यवस्थित वर्गीकरण केले खडशः प्रसिद्ध करण्याची योजना आखली. आणि ती कार्यान्वितही केली या कथाखंडासाठी लिहिलेल्या मार्मिक प्रस्तावनेत त्यांनी एक धाडसाचे विधान केले आहे 'अनुवादकाचा हेतू तसा असो वा नसो, जगातील प्रायः एकूण एक नामवंत कथाकारांच्या उत्तमोत्तम कथांचा एक प्रातिनिधिक संग्रह येथे प्रत्ययास येतो'

आता पुन्हा एकवार स्पष्ट निर्वाळा देऊ इच्छितो की फलित काहीही असो, अनुवादार्थ ज्या कोणाच्या कथांची मी निवड केली त्यामागे असा कसला म्हणून हेतू नव्हता लेखन काळात ज्या कथा भावल्या, त्यांना मराठी शब्दरूप देतेवेळी त्यांची महत्ता वा प्रतिनिधिकत्व यांचा कसलाही विचार माझ्या डोक्यात नव्हता. कथांची निवड मी केली होती, ती केवळ हाताशी असलेल्या पाश्चात्य कथासंग्रहातून. आणि तीसुद्धा केवळ रंजनसापेक्ष अशी. आणि आता बघावे तर कोलारकरांसारखा एक छांदिष्ट पण अभ्यस्त कथासंशोधक माझ्या या कथांच्या महत्तेची आणि प्रातिनिधिकतेची स्वच्छ ग्वाही देतो आहे.

असाच काहीसा प्रकार माझ्या अनुवादित एकांकांबावत घडला असावा. वस्तुत एकांक हा नाटचविशेष मराठीला सर्वथैव अपरिचित होता,अशातला भाग नाही हे मी स्वतःच, मला दिला गेलेला मराठी भाषेतील एकांकजनकाचा मान नाकारून दाखवून दिले आहे मी केले ते एवढेच की उत्तमोत्तम एकांकांचा अनुवाद सातत्याने व चिकाटीने केला आणि त्यायोगे प्रायशः अज्ञात असलेल्या एकांकाला मराठी नाटकाच्या नकाशावर एक प्रतिष्ठित स्थान प्राप्त झाले हे बहुसंख्य एकांक कथांप्रमाणेच) 'सत्यकथा' मासिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत

त्या काळात माझी माफक अपेक्षा एवढीच होती की मराठी या अर्वाचीन नाटचविशेषाचा परिचय करून द्यावा पण आता बहुतेक सर्व प्रतिनिधिक एकांक-संग्रहांच्या प्रस्तावनेतून 'मराठी एकांकांचा जनक' असा माझा निर्देश होत असलेला आढळतो. वाचकहो, येथे मी एकदाच आणि अखेरचे असे सांगू इच्छितो की, माझी अनुवादेच्छा तशी अगदी निर्हेतुक होती. परिचयाव्यतिरिक्त अन्य कोणताच हेतू त्या अनुवादांमागे नव्हता. आणि जे काय घडले, ते केवळ यदृच्छेने घडले आहे असे खुशाल समजावे

पंचवीसेक वर्षांचा ऐन उमेदीचा माझ्या जीवनातील कालखंड प्रामुख्याने अनुवादाला वाहिलेला आहे. अनुवादमूल्य मी कमी समजत नसल्यामुळे त्या विषयी माझी तक्रार तर नाहीच आहे तो केवळ एक प्रकारचा रास्त असा अभिमान: पण तो अभिमानही 'गर्वसे कहो' या जातीचा नाही. जगातील प्रतिष्ठित साहित्यकारांच्या अभिजात कृतींचा परिचय मराठी वाचकांना करून देण्याचा यत्न पूर्वकाळात मी केला होता; त्याचीच एकप्रकारे ही फलश्रुती आहे.

कसदार म्हणून जें साहित्य एका काळात भावले, त्याचा केवळ परिचयच देऊन थांबू नये तर ते साहित्यच वाचकांना सादर करावे अशी प्राजंळ कल्पना त्या मागे होती. समर्थांनी म्हटल्याप्रमाणे जे जे आपणासि ठावे' ते तें सर्व अन्य वाचकांस ठावे करून देण्याव्यतिरिक्त अन्य कोणताही हेतू या अगणित अनुवादा-मागे नव्हता. अर्थातच लेखन काळात. पण मागे वळून बघतो, तेव्हा असे ध्यानात येते की आपला संकल्प काहीही असो, जी सिद्धी प्राप्त झाली आहे. ती प्राप्त संकल्पापलीकडची आहे !

पूर्वकाळातील या लेखनाचा विसर लोकाप्रमाणेच मलाही झालेला होता. आणि त्या विस्मरणाच्या परिणामी काही अभ्यासक व्यथित होत आहेत याची जाणीव मला असली तरी त्या विस्मरणाचे दुःख मला नाही हे सर्व वळे वळे

आठवून मी आज लिहीत आहे, त्याचे कारण एकच आहे. या नानाविध लेखनाला कारण झालेली प्रेरणा जाणून घेण्याची इच्छा. जे घडले ते केवळ यदृच्छेने. आणि तदनंतर जे काय लिहिले वा या पुढेही लिहिणार आहे, तेही केवळ यदृच्छेनेच ते लेखन माझे असले तरी, ' इदं न मम ' अशी भावना मनोमन बाळगून.

अलीकडच्या काळात लोक मला ओळखतात, ते सामान्यतः समीक्षक व व विशेषतः नाट्यसमीक्षक म्हणून. ही ओळख मला नेहमी फार त्रासदायक वाटत आलेली आहे. त्याचे एक कारण असे की सोफोक्लीजपासून सार्त्रपर्यंतच्या पाश्चात्य व मुकुंदराजांपासून मर्ढेकरांपर्यंतच्या मराठी साहित्यिकांविषयी किंवा त्यांच्या साहित्याविषयी आजवर अनोखे आणि विचारप्रवर्तक लेखन मी बरेच केले आहे. त्या लेखनाचा ग्रंथरूप संग्रह करण्याचा विचार कालपरवापर्यंत माझ्या मनाला शिवला नव्हता. चूक माझीच होती आणि ती आता निस्तरणे भाग आहे हे जे काय लेखन आहे, ते मी यथेच्छ केले. ज्या नाट्यसमीक्षेसाठी माझी थोडीबहुत ख्याती आहे, ती नाट्यसमीक्षा ही देखील यदृच्छेचीच निर्मिती आहे. नाट्येतर साहित्याच्या तुलनेत नाटकाविषयी मला काही खास प्रेम होते वा आहे. अशातला भाग नाही. असेही म्हणायला हवे की नाट्यसमीक्षा एकापरीने माझ्यावर लादली गेली. केवळ योगायोगाने. पस्तीस वर्षांपूर्वी सिमल्यानजीक सुबाथूला केंद्रशासननियोजित एका आन्तरविद्यापीठ नाट्यसत्रासाठी मला जाणे भाग पडले. कारण तेथे मी गेलो तो महिला विद्यापीठाचा प्रतिनिधी म्हणून. अन्य कोणी महिला प्राध्यापिका तेव्हा उपलब्ध नसल्याने त्या नाट्यसत्रात मला सहभागी व्हावे लागले. तेव्हापासून काही योगायोगाने नाटकाविषयी मी नियमित लिहीत राहिलो, तो थेट आजतागायत.

मुंबईचे सांस्कृतिक वार्तापत्र लिहिण्यासाठी मला प्रथम ऑफर दिली ती केसरी 'चे त्या काळातील रविवार–आवृत्तीचे संपादक ल. ना. गोखले यांनी ते वार्तापत्र प्रथम चित्रपट–नाटकाचे व अल्पावधीतच केवळ नाटकाचे कसे झाले, ते माझे मलाच कळले नाही. गंमतीची गोष्ट म्हणजे ते नाटकाचे झाले, म्हणूनच केवळ आनंद मानणारा असा चोखंदळ वाचकवर्गही लाभला. हे वार्तापत्र मुंबईचे असल्यामुळे त्याचे नाव होते 'चौपाटीवरून' आणि त्या सदराच्या शेवटी लेखकाचे नाव होते ते आद्याक्षरवाचक ' प. य. न ' तेही चौपाटीवरच्या वाऱ्यावरूनच गहन आठवलेले.

पण चित्र, नृत्य नाट्य इ. कलांविषयी लिहायचे म्हटले, तरी त्या लेखनाचे लक्ष्य आपातत: ठरते ते कलाकाराचेच नाव. आणि कलाकार हे प्राचीन काळा–

## आदित्य प्रकाशने : उपयुक्त व सर्वांगसुंदर साहित्य

**० आमची गाजत असलेली प्रकाशने ०**

सफरसम्राट राजा पाटील यांचे चित्तवेधक, विनधास्त आत्मचरित्र

**※ केल्याने पर्यटन** मूल्य रु. ९०

"जिद्दीनं परिश्रम करणाऱ्या एक यशस्वी माणसाची अनुभव गाथा म्हणूनही या पुस्तकाला मराठी साहित्यात महत्त्वाचं स्थान द्यावं लागेल."

— डॉ. सुभाष भेण्डे (दै. लोकसत्ता)

स्पर्धात्मक परीक्षेतील 'इंटरव्ह्यू'त यशस्वी होण्यासाठी प्रत्येक मराठी तरुणाने वाचले पाहिजे असे पुस्तक

**※ यशस्वी इंटरव्ह्यू** मूल्य रु. ४५।– सवलत मूल्य रु. ३५।–

"मराठी युवक-युवतींना योग्य असे मार्गदर्शन या पुस्तकात असून हे पुस्तक इंटरव्ह्यूमध्ये निश्चित यश देणारे आहे." — लोकप्रभा

मुंबई C. I. D. चे निवृत्त सहाय्यक पोलिस आयुक्त श्री. ता. भा. गौड यांनी सांगितलेल्या सहा अप्रकाशित सत्यकथा.

**※ खुनांचा मागोवा** मूल्य रु. ६०।–

"श्री गौडांनी गुन्हेगारी साहित्यक्षेत्रात एक नवी पाऊलवाट निर्माण करून खुन्यांचा मागोवा घेतला आहे."

— गजानन जोहारी (दै. नवाकाळ)

---

पुणे वितरक : मॅजेस्टिक, उत्कर्ष, रविन्दु

निवेदिता

# आदित्य प्रकाशन

७८, पत्रकार कॉलनी, बांद्रा (पूर्व)
मुंबई ४०० ०५१.

आदित्य प्रकाशन

पासून जरा जादा संवेदनशील समजले जात असल्यामुळे त्यांच्या वेदनेची बाधा शक्यतो लेखकाला पोचू नये, म्हणून या टोपण नावाचा प्रपंच करावा लागला. अर्थातच संपादक–लेखकात असा करार ठरला होता की या टोपण नावाची वाच्यता कोणी करू नये. माझ्या बाजूने तसा काही प्रश्नच नव्हता. कारण हे त्या काळात कोणालाच माहीत नव्हते

आणि कोणा जिज्ञासू वाचकाने संपादकांकडे विचारणा केलीच, तर संपादक एक तर ते सांगता येणार नाही, असे म्हणून प्रश्नच उडवून लावोत कोणी हट्टालाच पेटला, तर त्या क्षणी जिभेवर येईल ते (उदाहरणार्थ : परशुराम वसंत नवरे) नाव ठोकून देत ! आता वृत्तपत्राच्या चावडीवरच जेथे टोपण–नावाबाबत गाजावाजा होत असे, तेथे कोणतेही टोपणनाव किती दिवस गुलदस्तात राहणार ? कालांतराने ' पवन ' नामधारी लेखकाच्या खऱ्या नावाची वाच्यता व्हायची ती झालीच.

प्रथम ' केसरी 'त ' चौपाटीवरून,' नंतर ' सोबत 'मध्ये ' पंचम ' आणि गेली कित्येक वर्षे ' रसरंग 'मध्ये रंगशाला या माझ्या सदरांतून नाटकाविषयी मी सातत्याने लिहीत आहेच. अर्थात नियमित नाट्यविषयक सदराचा विचार कर्तव्य असेल, तर माझे नाव घेतल्याखेरीज गत्यंतरच नसते. पंचवीस वर्षांपेक्षा अधिक काळ सातत्याने असे सदर अन्य कोणी मराठीत चालवले असण्याची शक्यताही कमीच. तेव्हा नाट्यविषयक सदराचे पहिलेपण आणि त्याचे इतक्या प्रदीर्घ काळपर्यंतचे सातत्य हे माझ्या नावे जमा करणे भाग असते. पण याही बाबतीत असे म्हणणे भाग आहे की एका अतर्क्य योगायोगाने ' केसरी 'त मी लिहू लागलो, त्याचा असा इतिहास घडणार आहे; अशी कल्पना त्यावेळी असण्याचे कारण नव्हते.

एक काळ असा होता की, वेगवेगळ्या नियतकालिकांतून तीन सदरे मी एकाच वेळी लिहित असे. पहिले उपर्युक्त नाट्यसमीक्षेचे, दुसरे रविवारच्या ' नवशक्ती 'मधील ग्रंथपरीक्षणाचे आणि तिसरे ' नवाकाळ 'च्या रविवार आवृत्तीतील कथामालिकेचे. या व्यतिरिक्त साहित्य–विषयक सदरेही मी लोकमत, जत्रा, मेनका यांसाठी चालविली. ' वसंत ' मासिकातूनही मी या प्रकारचे लेखन केले आहे.

नैमित्तिक सदरलेखनाच्या निमित्ताने बराच वेळ खर्ची टाकावा लागतो, नाटकाविषयी लिहायचे, तर प्रथम त्या नाटकाचा प्रयोग बघण्यासाठी आणि तत्पूर्वी वा तदनंतर त्या नाटकाची संहिता डोळ्यांखालून घालण्यासाठी वेळ

काढावा लागतो. ग्रंथसमीक्षेचे सदर असेल तर ग्रंथाभ्यासासाठी म्हणून वेळ ठेवावा लागतो. नैमित्तिक सदरलेखन तात्कालिक संदर्भाचे असते. अशा सदरां-तील विचारणा तात्कालिकापलीकडची असावी, असा माझा कटाक्ष असतो.

नैमत्तिक सदरलेखनासाठी बराच वेळ खर्ची पडत असला, तरी थोडाफार वेळ शिल्लक उरतो. त्या वेळेचा विनियोग मी स्वेच्छा लेखनासाठी करतो. एक नक्की की अनुवादात मला यापुढे आपली शक्ती वेचायची नाही. अर्थात देशो-देशींच्या प्रगत भाषांतील उत्तमोत्तम साहित्याचे सरस अनुवाद करणाऱ्या लेखकांची आजही वाण आहेच आणि ती उत्तरोत्तर अधिकाधिक जाणवत जाणार आहे. व्यासंगशील इंग्रजी भाषाभ्यासाच्या अभावी ती सतत दुणावतच जाणार आहे. दुर्दैवाने तसे घडलेच, तर मराठी साहित्य अभिजात आदर्शांनाच पारखे होईल. हे भविष्य भयावह आहे. तात्पर्य हे काम काही अधिकारी लेखकांनी कर्तव्यभावनेने करायला हवे.

लेखनासाठी मुक्रर केलेला फावला वेळ अशाच काही काही अन्य लेखनात व्यतीत करतो. उदाहरणार्थः आता स्वतंत्र कादंबऱ्या लिहितो. सवड नाही, उसंत नाही, वेळ नाही अशा फालतू सबबी मी सांगत बसत नाही. नैमित्तिक लेखनाच्या ऐन धवडग्यातून वेळात वेळ काढून कित्येक दशकांपूर्वी मी हजार-दीड हजार पृष्ठांची एक महाकाय कादंबरी लिहिली होती ! त्या कादंबरीचा एक इतिहासच होऊन बसला आहे. पण ललितलेखनात आज व्यक्तिशः मला फारसा रस उरलेला नाही. ते करायला हवे, अशी उर्मी वा टोचणी मला आज भावत नाही

उलटपक्षी वैचारिक लेखनाचा बॅकलॉग भरून काढायला हवा, अशा विवंच-नेत मी असतो. असे कित्येक साहित्यविषय आहेत की ज्या विषयी प्रारंभिक वा प्राथमिक विचारही धड झालेला नाही; त्या प्रकारचे लेखन करण्यासाठी मी काही वेळ काढतो. गेल्या साठ वर्षांच्या कालखंडात अनेक ज्येष्ठ व श्रेष्ठ साहित्यिकांशी माझा संबंध आला, त्याच्या सहवासाने मी श्रीमंत झालो आहे. त्यांचेही ऋण फेडायलाच हवे. आणि केवळ त्यांच्याच नव्हे तर तत्सम आणखी अनेक कलाकारांच्या आठवणींचा कोलाहल माझ्या स्मरणात दाटलेला आहे. त्यालाही वाट करून द्यायची आहे. माझ्या वाचनाचे अपुरे चरित्रही पुरे करण्याची उमेद बाळगून आहे. माझ्या लेखनाची इयत्ता काहीही असो, लेखन हे धर्मकार्य आहे अशा भावनेने मी सतत लिहित आलो आहे. 'गृहीत इव केशेषु मृत्युनां धर्मं' आचरायला हवा अशी माझी श्रद्धा आहे.

(माधव मनोहर, शिवाजी पार्क रस्ता क्र. ३, मुंबई ४०० ०२८)

# माझे आत्मशोधाचे दिवस

— राम शेवाळकर

विद्यार्थीदशेत मी विद्यार्थी–काँग्रेसचे काम करीत असे, स्वातंत्र्य अद्याप मिळायचे होते. त्यामुळे स्वातंत्र्याच्या लढ्यातीलच हे एक काम आहे, असे स्फुरण ते काम करताना उगीचच अंगात यायचे. विद्यार्थ्यांच्या प्रश्नावर हरताळ पाळणे, फी-वाढीसारख्या बाबींचा निषेध करण्यासाठी आंदोलन उभारणे, राष्ट्रीय नेत्यांच्या जयंत्यांच्या व पुण्यतिथ्यांच्या दिवशी प्रभातफेऱ्या व मिरवणुका काढणे व सभा घेणे, असे या चळवळीचे स्वरूप होते. समवयस्कांचा समुदाय जमवून काही सार्वजनिक स्वरूपाची कामे करण्यात वेळ बराच जायचा. भाषणे देण्याची सवय तेव्हाच लागली असावी. वडिलांचा व्यवसाय कीर्तनाचा होता. त्यांच्या अनुपस्थितीत मी त्यांची मित्रांच्या घोळक्यात नक्कल करतो, याचा सुगावा लागल्यामुळे त्यांनी माझ्याकडून काही कीर्तने पाठच करून घेतली. मग हौस म्हणून मी मित्रांमधेच नव्हे तर जाहीरपणेही कीर्तने करू लागलो. ते वय कौतुकाचे होते. त्यावेळी गळाही बरा होता. त्यामुळे वडिलांचे हुवेहूब अनुकरण करतो, या कौतुकात सारे खपून जायचे. तेव्हापासून भीड चेपली. सभाधीटपणा आला. विद्यार्थी काँग्रेसमधील कामामुळे त्याचा पुढे सराव झाला. श्रोतृसमुदायाची भीती कधी वाटल्याचे आठवत नाही.

त्याचवेळी मी समवयस्कांची एक संस्था चालवायचा. राजकमल कलामंदिरच्या धर्तीवर प्रकाश कलामंदिर असे त्या संस्थेचे नाव ठेवले. ते कुमारसाहित्य चळवळीचे दिवस होते. कुमारांमधील सुप्त गुणांना उत्तेजन देण्यासाठी या संस्थेच्या माध्यमातून सामुदायिक खेळ,



अनुक्रमणिका

बाल वाचनालय व हस्तलिखित मासिक. अशा उपक्रमांमध्येही गढून जाण्याची मला आवड होती. प्रकाश नावाच्या हस्तलिखिताचे लेखन बहुतेक एकहाती व एकटाकी असे. सजावटही माझीच असे. मुखपृष्ठ तेवढे कुंचला चालवणाऱ्या मित्राकडून करून घेतलेले असे. हस्तलिखिताचे वेगवेगळे विशेषांक काढणे, विशेषांकाचे प्रकाशन—समारंभ आयोजित करणे, हस्तलिखितासाठी लेख, कविता. कथा यासारखा मजकूर लिहिणे, त्यासाठी विविध प्रकारचे वाचन करणे, यातही वेळ चांगला जात असे. हस्तलिखिताचे लेखन बहुधा रात्री अभ्यासाच्या आडोशाने कंदिलाच्या उजेडात व्हायचे. पुढे हस्तलिखिताचा प्रचार व प्रसार जसजसा होऊ लागला, तसतसे मित्रांचेही साह्य त्याला होऊ लागले. आपल्याला लेखक व्हायचे आहे, असा समज परिसरामध्ये पसरविण्याच्या बाबतीत हे सर्व उपक्रम त्याकाळी उपयुक्त ठरले.

पुढे स्वातंत्र्य मिळाले व विद्यार्थी काँग्रेसचे काम सोडून दिले तेव्हापासून आजपावेतो कुठल्याही राजकीय स्वरूपाच्या संस्थेशी, पक्षाशी वा संघटनेशी दुरान्वयानेही संबंध आलेला नाही. सार्वजनिक कामाची, संस्थात्मक व्यापाची, सभासंमेलनादि उपक्रमाची खोड बाकी अद्याप गेली नाही. कॉलेजमध्ये गेल्यावर साहित्याची आवड आपोआपच वाढली वेगवेगळ्या वाङ्मयप्रकारातील साहित्याचे वाचन वाढले. त्यातील आवडलेल्या बाबी टिपून घेण्याची सवय वाढली अभ्यासक्रमामध्ये ज्या लेखकाचे पुस्तक नेमले, त्याचे समग्र साहित्य मिळवून वाचण्याची आवड उत्पन्न झाली. त्या लेखकावर लिहिले गेलेले सर्व चरित्रात्मक व समालोचनात्मक साहित्यही अभ्यासणे आवश्यक वाटू लागले. या समग्र साहित्याच्या व समीक्षेच्या कोंदणात नेमलेल्या पुस्तकाचे स्थान निश्चित करणे, त्यामुळे शक्य होऊ लागले. ज्या वाङ्मयप्रकारातील ते पुस्तक असेल त्या वाङ्मयप्रकाराचा संपूर्ण परिचय व परामर्श घेणारे साहित्यही अनुषंगाने वाचले जाऊ लागले. त्यामुळे काव्य, कादंबरी व नाटक या वाङ्मय-प्रकाराचे सर्वस्पर्शी आकलन आपोआपच होऊ लागले. परिणामी माझ्या टिपणांची परीक्षाकाळातील उपयुक्तता वाढल्याचे माझ्या व सहाध्यायांच्याही लक्षात येत गेले. त्यांना अभ्यासविषय रंगून व रंगवून समजावून सांगणाऱ्या माझ्या खाजगी वर्गाचा लौकिक वाढला. वसतिगृहातील इतर अभ्यासकांना त्याचा उपसर्ग होत असल्याचे लक्षात आल्यावर आपल्यातील सुप्त अध्यापन गुणाची प्रचीती आली.

माझे घराणेच मुळात वेदांत्यांचे व शास्त्र्यांचे. ज्योतिष, वैद्यक व वेदान्त यांत माझे पणजोबा पारंगत होते. ते संस्कृत व मराठीत अतिशय सुश्लिष्ट

पद्यरचना करीत असत. त्यातील पदलालित्य लक्षणीय असे. परभणी व अमरावती जिल्ह्यात होणाऱ्या वेगवेगळ्या देवतांच्या नवरात्रोत्सवात त्यांनी केलेल्या आरत्या व अष्टकांची आवर्तने आजही होताना आढळतात. त्यांनी केलेली देवीची एक आरती–तिच्यातील शब्दसौंदर्याकरिता माझ्या कायमची लक्षात राहिली आहे

जय जय शिवकांते । हरिदयिते ।
कमलासनप्रियचरिते । दुर्गे श्रीललिते । भरकामम्
पोपत जडमति कामम् । स्तन्यांमृतममलम् ।
कुर्वास्ये । कौलिकविधिनोपास्ये । जय जय शिवकांते ।। १ ।।
विहितालंकारे । रसपूरे । कोमल कोकिल मधुरे ।
भारति वाक्चतुरे । भवसारे । विध्याटविसंचारे ।
अयिमयि घन करुणा । अमित गुणा । सीलय नवनितपूर्णा ।।२।।
जय जय शिवकांते. .

माझ्या पणजोबांचे नाव रामशास्त्री शेवाळकर. पुढे संन्यास घेतल्यानंतर ते रामकृष्णानंद स्वामी झाले. त्यांचा 'संचित' हा पद्यसंग्रह मी अलीकडेच संपादित व प्रकाशित केला आहे. वडील कीर्तनकार असल्यामुळे निरनिराळी आख्याने रचण्याच्या निमित्ताने पद्यरचना करण्याचा त्यांनाही सराव होता. त्यांचीही अशी दोन–तीन पुस्तके मी प्रकाशित केली आहेत.

शब्दांशी खेळण्याची आवड अशी रक्तातूनच आली. विद्यार्थीवयामध्ये वेगवेगळे कवी वाचण्यात आले. त्यातील गोविंदाग्रज, बी आणि तांबे यांनी मनाला पछाडून टाकले. पुढे बोरकर, कुसुमाग्रज, कान्त, श्रीकृष्ण पोवळे, मंगेश पाडगावकर, वसंत बापट हे मनावर स्वार झाले. यांच्या विषयांची, उत्कटतेची, शब्दांची गोडी लागली. सजल, स्वप्निल, फेनिल, जलवंती यासारख्या शब्दांची मोहिनी आमच्या मनावर बराच काळ होती. त्यामुळे त्यानंतरच्या आमच्या कवितांमध्ये या सगळ्या आवडत्या कवींचा पायरव उमटणे स्वाभाविकच होते. या कवींनी आमची पौगंडावस्था झपाटून टाकल्यामुळे यांनी निर्मिलेल्या सृष्टी–मध्ये विसावणे हा आमचा विरंगुळा होता. त्यामुळे आमच्या गद्य–पद्य अभिव्यक्तीत याच लोकांचा प्रभाव पडायचा. आमच्या लेखनातून हेच कवी आळीपाळीने, अधूनमधून किंवा एकसमयावच्छेदेकरून आम्हाला प्रॉम्टिंग करीत आहेत, असा भास व्हायचा. कविता लेखनातील पहिली पावले यांच्या आधारानेच टाकता आली. यांनी आम्हाला चालायला शिकवले. पावलांमध्ये

स्वतःचे बळ येईपर्यन्त हे सर्व कविमित्र आपुलकीने आमच्या हाकेला धावले. वेळोवेळी सहृदयपणे आमच्या उपयोगी पडले.

पुढे स्वतंत्र वाटा फुटल्यावर या सर्व आप्तांच्या भेटी लग्नामुंजीतच व्हायला लागल्या. तथापि, कवी म्हणून माझ्या घडणीतील यांचा वाटा मोठा आहे. माझ्यातील लपलेला ओहळ शोधण्याचे व तो उघडकीला आणण्याचे श्रेय यांचेच. वेळीच माझ्या आयुष्यात हे उगवले नसते, तर हा झरा जागच्याजागीच जिरून गेला असता. मला स्वतःचा शोध यांच्यामुळे लागला. हे आरसे नसते, तर मला माझे प्रतिबिंब पाहायला मिळाले नसते. मी नेमका कोण व कसा आहे, याचा अचूक थांगपत्ता मला या अथांग जलाशयांच्या सान्निध्यात लागला. 'असोशी'-तील सुरुवातीच्या कवितांमध्ये माझे हे अभिज्ञान प्रकट झाले आहे हे मोकळे-पणाने मान्य केले पाहिजे.

अध्यापनाच्या क्षेत्रात मी पस्तीस वर्षे होतो त्यांपैकी तेवीस वर्षे प्राचार्य या नात्याने मी एका शिक्षणसंस्थेचे नेतृत्व केले. आपल्या विषयावर प्रेम करणे, शब्दांच्या वशिल्याने त्यांच्या अंतरंगात शिरून त्याचे सर्व सुकुमार पापुद्रे हळुवार एकाग्रपणे न्याहाळणे, त्यांच्या लावण्याचे सर्व उन्मेष आपल्या अंतरंगात साठवून घेणे, त्या एकरुपतेच्या आनंदात क्षणकाल स्वतःचे भान विसरणे, हा विषय आपल्याकडून समजावून घेण्याची उत्कंठा असणाऱ्या उमलत्या मनांवर प्रेम करणे, समरसतेचे प्रवेशपत्र देऊन त्यांनाही आपल्या आनंदात सहभागी करणे, आपल्या आयुष्याचे काळोखी कोपरे या प्रकाशाने उजळून निघाल्याच्या अलौकिक अनुभवाचे वाटेकरी त्यांनाही करणे, हे माझ्या व्यवसायातील कैवल्य होते.

प्राचार्यपदाचे प्रशासन सांभाळण्याच्या निमित्तानेही मला स्वतःचीच विविधांगी ओळख नव्याने झाली. प्राचार्य या नात्याने संस्थेची परिचितावेगळी परिमाणे वाढवणे, उमेदीच्या शिक्षितांच्या ज्ञानाचे, उत्साहाचे व कार्यशक्तीचे नीट नियोजन व उपयोजन करणे, युवाशक्तीतील त्यांनाही अज्ञात असलेल्या सुप्त बीजांचे उद्घाटन करणे, युवा विश्वातील उफाळत्या आकांक्षांना व कार्य-शक्तीला संस्कारपूर्वक प्रोत्साहन देणे, शासन, विद्यानुशासन, चालक, पालक, शिक्षक व विद्यार्थी या सर्व अंगांमध्ये योजनापूर्वक सामंजस्य राखणे हा व्यायाम मला तेवीस वर्षे करावा लागला. ही कसरत करताना अकल्पितपणे सुटलेला तोल सांभाळण्याच्या प्रसंगी जी तारांबळ उडाली, तिनेही मला बरेच शिकविले. आपण नेमके कुठे आहोत, आपल्याला कुठपर्यंत जाणे शक्य होईल, या प्रवासात

आपण निश्चित कुठे कमी पडतो, आपली पावले कुठे घसरली व तोल कुठे सांभाळला गेला, याचेही भान आले.

गेल्या वीस वर्षापासून विनोबांच्या आचार्यकुलाचे काम मी महाराष्ट्रात करीत आहे. शिक्षकांच्या जमातीतील सुप्त सामर्थ्य आचार्यकुलामुळे माझ्या लक्षात आले. व्यवहाराच्या, लौकिकाच्या, स्वास्थ्याच्या व सुखासीनतेच्या वाढत्या हव्यासामुळे आज हे सामर्थ्य गंजून गेले आहे. त्याला उजाळा देऊन त्या समयोचित उद्रेकाने आवश्यक ते परिवर्तन समाजमानसामध्ये घडवून आणणाऱ्या क्षणाच्या दिशेने आपली वाटचाल व्हावी, अशी मनोमन इच्छा आहे. निदान व्यर्थ पायपीट केल्याची निराशा तरी पदरी येऊ नये, असे कळवळून वाटते.

कवी, लेखक, वक्ता, वाङ्मयीन व सामाजिक कार्यकर्ता, शिक्षक . . . अशा वेगवेगळ्या भूमिकांमध्ये वावरण्याची पाळी माझ्यावर आली. माझ्या वाटचालीत मी या प्रत्येकाच्या बंद दरवाजावर थाप मारली. यापैकी कुठेतरी मी स्वतःला सापडेन, या आशेने सर्वत्र चाचपडत गेलो. कुठेही मनाजोगा प्रतिसाद मिळाला नाही. यापैकी आपण नेमके कोण आहोत, हे अजून निश्चित कळले नाही. पस्तीस वर्षांपूर्वी लिहिलेली 'शोध' ही कविता मला आठवते —

> किती दिवसांपासून
> माझा मीच हरपलो
> शोध शोधले परंतु
> नाही मुळी गवसलो
>
> होती आस, सापडेन
> कुठे तान्हेल्या तंद्रीत
> कुठे सातही स्वरांचो
> गुंतागुंत उकलीत
>
> उपचारांच्या कोषात
> किंवा दडलो असेन
> वर उथळपणाचे
> दीन हसू पांघरुन

असे सारिखे धुंडिले
मीच हरपल्या मला
ठिसूळ या वागण्यात
नाही सुगावा लागला

कधी येईल कळेना
उसा आसवांचा दीस
जेव्हा मीलनी माझ्याच
मन निवेल खुषीत !

या अवस्थेत अद्याप बदल नाही. याचा अर्थ : माझे आत्मशोधाचे दिवस अजून संपलेले नाहीत.

( प्रा. राम शेवाळकर, वणी )

---



---



अनुक्रमणिका

# यशवन्त कथा

— अरविंद गोखले

कथाकार म्हणून माझी जडणघडण झाली, माझ्यावर प्रभाव प्रकाश पडला, त्यात एखादी व्यक्ती, विचारसरणी, संस्था, संहिता अशांचा फारसा असर नव्हता, नसावा. भोवतालचं मी सगळं बघत व भोगत होतो आणि हवं तेवढं व तितकंच कथाकार होण्यासाठी जवळ जपून ठेवीत होतो. मला माझी वृत्ती व वाट वेगळी ठेवायची होती. कुणाला गुरु वा मार्गदर्शक करायचं नव्हतं की कुठल्या कळपात वा कंपूत सामील व्हायचं नव्हतं. माझी मतं, मूल्यं, माझे अनुभव, जीवन हे सकस, सर्वस्पर्शी ठेवायचे होते. स्वतंत्र, स्वयंभू, कलावन्त, कलन्दर.

तरी सुद्धा हे खरं की भोवतालचं वातावरण व व्यक्ती माझ्यावर खोल संस्कार करीत होत्या. मी अवखळपणा, अगोचरपणा करीत होतो, तरी माझं कुमारपण सरळ व सुरक्षित जगातलं होतं. सुसंस्कृत, सज्जन. घरचे व जवळचे सगळे सुशिक्षित व साहित्यप्रेमी. शाळा-कॉलेजात वाङमयीन वातावरण, पुण्यासारख्या सांस्कृतिक चळवळीच्या शहरातलं आयुष्य, यातच माझं व्यक्तिमत्त्व व कथाकारित्व पोसलं गेलं. कवयित्री आई व कविवर्य मामा; विज्ञानलेख लिहिणारे वडील व वडील बंधू; शाळेत शिक्षक लाभलेले पु. ग. सहस्त्रबुद्धे व श्री. म. माटे मास्तर, दैवतं मानले जाणारे फडके-खांडेकर, जवळून पाहिलेले रविकिरण मंडळाचे कवी; स्वतः सुरू केलेलं हस्तलिखित मासिक हे थाढाळू वयातले साहित्यिक संस्कार. या सगळ्यांनी मिळून.

या सगळ्यात सखोल संस्कार करणारी, माझ्या काळजात कथेच्या कळ्या उमलायला कामी आलेली गोष्ट म्हणजे त्यावेळच्या, केवळ

कथा या वाङ्मयप्रकाराला वाहिलेल्या यशवंत या मासिकाची ओळख, जवळीक. मला लघुकथा लेखनाची आवड उत्पन्न झाली, ओढ वाढत गेली. ती पुण्याच्या गणेश महादेव आणि कंपनी या प्रकाशन संस्थेच्या यशवंत मासिकामुळे, मी कथाकार म्हणून पुढे सिद्ध झालो, त्यात यशवंतचा महत्त्वाचा, मोलाचा वाटा असणार आहेच.

डिसेंबर १९२८ मध्ये यशवंत मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला, तेव्हा मी जेमतेम दहा वर्षांचा होतो. अरेबियन नाईटस् पंचतंत्र, महाभारत, इसाप-नीती यांतील कथा वाचण्याच्या वयात होतो. घरी हरी नारायण आपटे व नाथमाधव यांच्या कादंबऱ्यांची पुस्तके पुढ्यात येत असत, पण ती पाहाण्या-पलिकडे मी जाऊ शकत नव्हतो. यशवंत मासिकाचा जन्म, वेगळेपणा, वगैरेचा परिणाम माझ्या मनावर होण्याचं कारण नव्हतं.

तरीपण काहीतरी तेव्हा जागं होत होत, जवळ येत होतं. गणेश महादेव आणि कंपनीची कचेरी ६०८ सदाशिव पेठ या जागी होती आणि ती वास्तू आमच्या ५३७ सदाशिव पेठ या वाड्यापासून अगदी जवळ होती. गणेश महादेव कंपनीचे चालक श्री वीरकर आमचे घरी येत. कंपनीचे शेअर्स खपवायला प्रकाशनं द्यायला. त्यांचो 'चार आणे माला' आमच्या घरी येई व ती रहस्य-कथांची चोपडी आमच्या माळ्यावर थप्पी लावीत. गणेश महादेव कंपनीने लवकरच सृष्टिज्ञान या शास्त्रीय विषयांना वाहिलेल्या मासिकाचं प्रकाशन हाती घेतलं. हे सृष्टिज्ञान माझ्या आत्तेच्या यजमानांनी म्हणजे प्रा. गो. रा. परांजपे यांनी आपल्या सहकाऱ्यांच्या सहाय्याने सुरू केलं होतं. संपादक मंडळात पुढे माझे वडीलही सामील झाले. परांजपे मुंबईहून पुण्याला येत. ते आमचेकडे उतरत व लगेच वीरकरांना बोलावून घेत. त्यांची व वीरकरांची सृष्टिज्ञानाबद्दलची बोलणी आमच्या घरी पुढच्या माडीवर होत व मी ती भय-चकितपणे पहात राही. वीरकर यशवन्तचे चांगले चारपाच अंक ठेऊन जात. माझी आई, आत्या त्यावर झडप घालीत. मोठा भाऊ शरद आधीच एक अंक पळवी. उरलेला एखादा अंक माझ्या पुढ्यात येई. अज्ञानाच्या ओटीत ज्ञानेश्वरी यावी असा अचानक मिळालेला प्रसाद. पुढल्या प्रवासाची पदचिन्हं.

यशवंत मासिकाच्या प्रत्येक अंकाचं आमच्या घरी समग्र वाचन होई. मथूआत्या, शरददादा घरी येणारे नातेवाईक, पाहुणेदेखील यशवंत मागून घेत. लीला वर्वे या दूरच्या नातेवाईकांबरोबर माझी आत्या वि. स गुर्जरांची 'तापलेला तवा' कथा वाचीत होती. ते पाहात मी वेड्यासारखा उभा होतो हे आठवतं. शरद व मधूमामा केशवकुमारांच्या कविता वाचून हसत, ते मी

बघत राही—हे स्मरतं. कधीमधी घरी येणारे यशवंत कवी यांचीच कविता 'यशवंत'च्या पहिल्या अंकाच्या पहिल्या पानावर आलेली पाहिली व मी भारावलो. तेही मी विसरलो नाही. अशा पहिल्यावहिल्या अस्पष्ट आठवणीं !

पण माझा पहिलेवहिलेपणा, लवकरच सरला. साहित्याच्या विषयात मी लवकरच वयात आलो. नाथमाधवांच्या सावळया तांडेल व. स्वराज्याच्या इतर कादंबऱ्या माझ्या वाचून होत होत्या व गणेश महादेव कंपनीच्या अटकेपार व फोल आशा या कादंबऱ्यांची मी ओळख करून घेत होतो. यशवंतमधील गुर्जर, खांडेकर, य. गो. जोशी, बोकील या लघुकथा लेखकांची नावं मला पाठ झाली होती व यशवंतच्या कथा स्पर्धेबद्दलचे किस्से मी साठवीत होतो. यशवंतच्या पहिल्या पानावर अग्रभागी असलेलं गरुडाचं चित्र वापरून मी माझं हस्तलिखित मासिक सजवीत होतो. मासिकाचं नाव गरुड असंच ठेवलं होतं. मासिक नव्हे—अनियतकालिक. त्यात एखादी कविता, काही चुटके, कोडी. पण मुख्य म्हणजे गोष्ट, लघुकथा, माझी यशवंतच्या वळणाची

'यशवंत' वाचून मी कथालेखक व्हायची स्वप्नं पाहात होतो नव्हे, लेखणी पाजळीत होतो.

१९३२ साली मी हायस्कूलात गेलो तेव्हा हस्तलिखित मासिकच सुरू केलं, पण मी वक्तृत्व स्पर्धांतून भाग घेऊ लागलो, स्वतःची छोटी लायब्ररी काढली, लेखक मंडळात सामील झालो, आणि कथा लिहू लागलो

मांजराचं पोर ही पहिली लघुकथा, मी प्रत्यक्ष पाहिलेल्या एका मुक्या प्राण्याच्या हत्येवर, बराचसा बदल करुन, लिहिली होती.

यशवन्त मासिकातील कथांमधून स्फूर्ती घेऊन.

'यशवन्त' मधील खांडेकरांच्या कथांनी मी विद्ध झालो होतो.

माझ्या मामांनी माझी व खांडेकरांची भेट घडवून आणली, तेव्हा मी माझ्या कथा घेऊन त्यांच्या समोर उभा राहिलो यशवन्तचा वाचक 'म्हणून ओळख करून देत. 'उद्याचा कथालेखक' म्हणून !

त्या काळी सगळयाच वाङमयवेडयांची दैवतं वि. स. खांडेकर व ना. सी. फडके ही होती मी या द्वयीच्या कथा व कादंबऱ्या जवळ जवळ पाठ करीत होतो. त्यातही मला जाणवू लागलं होतं की या दोन श्रेष्ठी खेरीज अन्य काही लक्षणीय लेखक लघुकथा किती सकस व सहज लिहित आहेत. य. गो. जोशी यांच्या साध्यासुध्या घरगुती प्रसंगांवरच्या सखोल गोष्टी, लक्ष्मणराव सरदेसाई यांच्या गोव्यातील अनोळखी जगातल्या आगळया वेगळया कहाण्या, वि वि. बोकील यांच्या अनवट, अफलातून कथा खेरीज अगदी निराळं लिहिणारे ग. रा. बाळ,

जी एन आपटे, रॉय किणीकर, आर डब्ल्यू डी.

आपण कुणासारखं, कस की याहून निराळं, नवं ?

यशवन्त केवळ कथा प्रकाराला वाहिलेल असलं तरी त्यातील इतर बाबीही माझं मन वेधून घेत होत्या. उदाहरणार्थ, प्रसिद्ध चित्रकारांची तैलरंगी मुखपृष्ठ. पहिल्या अकावर धुरंधरांचं चित्र होतं. यशवन्त, गिरीश, केशवसुत इत्यादींच्या कविता, निवडक ग्रथांची परीक्षणं, अनोखी प्रवास वर्णन, क्वचित् कोडी व चुटके, गणेश महादेव कंपनीच्या जाहिराती.

यशवन्त खेरीज त्या काळी रत्नाकर, किर्लोस्कर, चित्रमयजगत्. मधुकर गृहलक्ष्मी अशी काही मासिकं लघुकथा प्रसिद्ध करीत 'रत्नाकर' तर यशवन्त पेक्षा अभिजात होतं. पण माझं मन यशवन्तवरच जडलं त्यातच कुणीतरी यशवन्तच्या चार पाच वर्षांचे अंक एकत्र बांधून मला बक्षीस दिले. मग काय ? मी

शाळा संपवून कॉलेजात जाईपर्यंत यशवंतशी माझं असं अतूट नातं जुळालं होतं. एका खाकेत 'यशवंत 'ची फाईल, दुसऱ्या खाकेत हस्तलिखित मासिक, पुढ्यातल्या कोऱ्या कागदावर ...

१९३५ साली कॉलेजात प्रवेश केल्यावर मी हस्तलिखित मासिक मागे टाकलं, यशवंतचे अक माळ्यावर ठेवले, नव्या मनाने कोरे कागद पुढे ओढले व कॉलेज मॅगेझिनसाठी कथा लिहिली. शीर्षक : हेअर कटिंग सलून. कथा कॉलेजऐवजी यशवंतमध्ये यावी अशी य गो, बोकील, ग. रा. बाळ, जी. एन आपटे यांच्या कथासंभारात शोभावी अशी 'सलून ' कथा वाखाणली गेली. मला आत्मविश्वास देऊन गेली. मी लगेच दुसरी कथा लिहून काढली. शीर्षक : वहिनींची इच्छा. जरा यगो–जरा खांडेकर. ती कथा माझ्या मित्राने उचलून मनोहर मासिकात धाडली. 'मनोहर' च्या फेब्रुवारी १९३६ च्या अंकात कथा ठळकपणे छापली गेली. मी असा हस्तलिखित मासिकातून कॉलेज मॅगेझिनमध्ये आणि कॉलेजच्या सावलीतून किर्लोस्कर समूहात. कथालेखक ! कथा प्रकाशित होणारा, मासिकाच्या अंकाची भेट–प्रत आणि मोबदल्याची मनीऑर्डर मिळविणारा. उद्याचा–नव्हे आजचाच कथाकार यशवंत मासिकात समाविष्ट होईन, शोभेन–असा

पन्नास वर्षांपूर्वीचा हा सारा इतिहास मला परवापरवा स्मरला, सारखा मनात येऊ लागला. यशवंतचे जुने, त्या काळातले अंक एकवार नजरेखालून न्यावेत असं वाटू लागलं. १९२९ ते १९३५ या काळातले मराठी कथेचा वाढता, वैभवकाळ दाखवणारे, तसंच मला स्फूर्ती देणारे, सुजाण करणारे. १९३९ च्या पुढच्या



अनुक्रमणिका

काळातला यशवंतही बघावा. कथेची उतरती कळा दाखवणारा, त्याचबरोबर मला ऊब देणारा, उजेड दाखवणारा. त्या काळचं यशवंत कथामासिक.

मी मग उठलो व दादरच्या मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या संदर्भ विभागात गेलो. यशवंतच्या जुन्या जाडजूड फाईलींचा ढीग माझ्यासमोर ठेवला गेला मी हरखलो. अलं:बाबाने रत्नखचित गुहेमध्ये डोकावावं, तसं मी त्या फाईलीत डोकं घातलं. जुन्या स्मृतींनीं, कथांनी मन मोहरून आलं. मी त्या कथारत्नांत रमून गेलो.

यशवंतचा पहिला अंक डिसेंबर'१९२८ ला प्रसिद्ध झाला आहे. प्रकाशक : गणेश महादेव आणि कंपनी. संपादक : स. आ. जोगळेकर, य. रा. फडके व वा. प्र. ओक. मुखपृष्ठ फाटलं होतं. आत बालक मंदिरातील मुलांचे व ग्वाल्हेरच्या दा. य. सदाशिव या कलाकाराचे मुद्राभिनयाचे फोटो छापलेले होते. लघुकथा रेखाचित्रांनी नटवल्या होत्या व आर्टिस्ट होता कुणी-गोखले. अंकाच्या आरंभीच नोव्हेंबर १९२८ मध्ये कालवश झालेल्या लाला लजपतराय यांचा फोटो, औंधच्या पंतप्रतिनिधींचा संदेश व यशवंत ही कवि यशवंत यांची कविता. संपादकीयात लघुकथा या वाङमय प्रकाराशी निष्ठा ठेवण्याचा निर्धार व्यक्त केला होता. मॉडर्न रिव्ह्यूसारखं गूढ गंभीर न ठेवता पिअर्सन, स्ट्रँड, अशा मासिकांसारखं लोकरंजन व लोकशिक्षण साधणार यशवंत असेल अशी ग्वाही दिली होती. क्राउन वन फोर साइझ, १५० पानं असलेल्या त्या अंकात महेंद्र-कर, झेनिथ द्राक्षासव इ. जाहिराती होत्या. गणेश महादेव कंपनीच्या प्रका-शनांची यादी होती. गणेश महादेव कंपनीच्या चार आणे मालेचे वर्गणीदार यशवंतचेही वर्गणीदार गणले जातील असे जाहीर केले होते; लेखकांना मानधन देण्याचे मान्य केले होते. लेखकांत शिवराम महादेव परांजपे, गो. म. चिपळूण-कर, वामन नारायण देशपांडे, सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर या थोरांच्या कथा. खांडेकरांची 'भावाचा भाव' ही कथा तर मुख्य आकर्षण. जडावाचा खंजीर ही रुपांतरीत लघुकादंबरी. प्रकाशक वीरकर हे छपाई-तज्ञ, तसेच कुशल विक्रेते. त्यामुळे पहिलाच अंक आकर्षक निघाला व हातोहात विकला गेला. व्हीलर स्टॉलवर, वर्गणीदारांत, फुटकळ पण.

दुसऱ्या अंकापासून, म्हणजे जानेवारी १९२९ पासून ऑक्टोबर १९३५ च्या अंकापर्यंत, म्हणजे माझी कथा कॉलेज मासिकात प्रसिद्ध होईपर्यंत, यशवन्त चाळीत असताना अनेक आठवणी उचंबळून आल्या. पुनर्प्रत्ययाचा आनंद लाभला दरमहा 'यशवन्त' हाती आल्यावर झालेला आनंद. जुने अंक केवड्याच्या पाती सारखे जपून ठेवून भोगायची सवय. धुरंधर, लाड, बाबूराव पेण्टर यांच्या रंगीत

चित्रांचे आकर्षक मुखपृष्ठं. केशव कुमार (प्र. के. अत्रे) यांच्या "प्रेमाचे अंकुर," "परिटा येशील कधी परतोनी." "अहा तिजला चुंबिले-असे यांने" या कवितांचं मित्रांत केलेल वाचन, अत्र्यांचा गाजलेला 'पुणेरी टांगेवाला" हा लेख, ना सी फडके यांची प्रतिभा साधन लेखमाला, 'देव्हारा' या रॉय किर्लोस्करांच्या नाटकाच्या तालमी, शिल्पकार करमरकरांच्या शिल्पकृतीचा परिचय, थोर मराठी पुस्तकांचा परामर्श खरोखर, यशवन्तच्या त्या पाच सहा वर्षांतल्या पन्नास साठ अंकात सुशिक्षित मराठी समाजाच चित्र सहज दिसतं.मराठी वाङमयाच्या वाटचालीतील वळणं दिसतात. प्रतिभावन्तांची प्रज्ञा प्रकट होते. कविता, कादंबरी कथा. . .

अर्थात् यशवंतचा जन्म कथेसाठी होता. खांडेकरांच्या कथा लेखनाला यशवंत-मध्येच बहर आला. यशवन्तच्या त्या वर्षांतील बहुतेक अंकात खांडेकरांची कथा आहे. कवडा पोर, सागर-अगस्ती आला, नवी सृष्टी या ३०-३१ सालातल्या त्यांच्या कथा अजून टवटवीत वाटतात. यशवंत गोपाळ जोशी हा यशवन्तचा शोध.शेवग्याच्या शेंगा ही गाजलेली व प्रथम पारितोषिक प्राप्त झालेली कथा मी नंतराने वाचली व लगेच दूरदर्शनसाठी देऊं केली. २९ सालची एक रुपया दोन आणे, ३१ सालची कवि आणि कुस्ती, ३४ सालची ग्यानबा तुकाराम आणि टेक्नीक् या यशोंच्या कथा खुमासदार आहेत. गुर्जरांनीही यशवंतमध्ये आठ दहा कथा लिहिल्या आहेत. लक्ष्मणराव सरदेसाई बऱ्याचदा यशवंतमध्ये भेटतात. दिवाकर कृष्ण-२९ साली 'रुपगर्विता' व ३२ साली 'मलयगिरीचा वसंत.' ना. सी. फडके यांनी खांडेकरांपेक्षा कमी कथा लिहिल्या आहेत. पण ओ. हेन्रीच्या 'गिफ्ट ऑफ दि मॅगी'चं नाताळची भेट हें भाषांतर यशवंतमध्यें प्रसिद्ध करून फडक्यांनी मोलाची कामगिरी केली आहे. उत्कृट अनुवादाचा आदर्श, पाश्चात्य थोर कथांची ओळख, नाताळची भेट ही मला परदेशी कथांची भेटच तेव्हा होती. ती कथा वाचूनच ओ. हेन्री, मो पासाँ, चेकॉव्ह इ. थोर कथाकार शोधण्याकडे तेव्हा मी वळलो.

या कथाकार श्रेष्ठींत महत्त्वाचे वाटतात ते वि. वि. बोकील. बोकीलांनी यशवंतमध्ये सुरुवातीपासूनच विपुल व विलक्षण लेखन केलेलं आहे. कथा, दीर्घकथा, प्रहसनं. २९ साली त्यांची वेबी अवतरली. त्याबरोबर कटुसत्य पण. या दोन दीर्घकथा मराठी कथावाङमयात फार महत्त्वाच्या मानल्या जातात. मी या दोन कलाकृतींची कितीतरी पारायणं केली होती. आताही त्या मनःपूर्वक वाचल्या व सुखावलो. तारेचा संसार व जमीन आणि अस्मान १९२९ मधल्याच. पुढच्या वर्षी तर बोकीलांनी ग बाई लेखक ही मिष्कील व धंदेवाईक मंडळी ही उपरोधिक कथा लिहिली. या दोन्ही कथा माझ्या आयुष्यात डोकावून गेल्या.

मला 'ग वाई लेखक' म्हणणारी माझी मैत्रीण, 'धंदेवाईक मंडळी' उर्फ वेश्या यांच्यावरील माझं कथालेखन

सर्वश्री चिचलीकर, जुन्नरकर, मांजरेकर, पै–रायकर यांच्या बऱ्यापैकी बऱ्याच कथा यशवंतमध्ये आढळल्या. वि. ग. लेले यांची सर्जेराव घाटगे आणि चि. य मराठे यांची कलावंतीणीची फिर्याद या ऐतिहासिक कथा कितीतरी कलात्मक व दमदार आहेत. स्त्रीलेखिकांत आनंदीबाई शिर्के, कमलाबाई टिळक, आनंदीबाई जयवंत, कुमुदिनी प्रभावळकर, दया परांजपे यांच्या लक्षणीय लघु–कथा आहेत. श्रीमती शिर्के व श्रीमती टिळक या तर तेव्हाच मातब्बर कथाकार म्हणून मानल्या गेल्या होत्या

या सर्व गर्दीत चारपाच चाकोरीबाहेरच्या लेखकांनी माझं तेव्हा लक्ष वेधून घेतलं होतं. ते लेखक म्हणजे ग. रा. बाळ, जी. एन. आपटे, आर डब्ल्यू डी व रॉय किणीकर. आताही मी प्रथम त्यांचाच शोध घेतला.. ग. रा. बाळ यांच्या बऱ्याच कथा आढळल्या. 'माझी नायिका' या कथेची सुरुवात 'इंदू–जणू सौंदर्याचा सिंधू' अशी आहे. ती तेव्हा मला अप्रतिम, अनुकरणीय वाटली होती. आता बाळांच्या कथा मला एकसुरी व सुमार वाटल्या. जी. एन आपटे व व आरडब्ल्यूडी यांनी पण तेव्हा यशवंतमध्ये खूप लिहिलं होतं. आपटयांची 'भाभी जी' व आर डब्ल्यूडी यांची 'रेल्वेची फुटबॉल मॅच' या मला प्रिय असलेल्या कथा. त्या पुन्हा पाहून वाचून माझं त्या कथाबद्दलचं चांगलं मत पक्कं झालं. रॉय किणीकरांच्या दोनच कथा–पण अफलातून !

'मी' नावाने, चित्रकार नी. म. केळकर यशवंतमध्ये नियमित कथा लिहीत. मला त्या आता वाचून विशेष वाटलं नाही. 'मोत्यांची कुडी' ही दांडकरांची गाजलेली कथा आताही कृत्रिम वाटली. रा. म. कीर्तने, नि. आ. स्वामी, अ. तु. वाळके, रा. वा. समुद्र, श. कृ. देवभक्त, शं. सी. फडके अशांच्या काही कथांनी 'यशवंत' ची पानं भरलेली आहेत, हे लेखक पुढे प्रसिद्धीस आले. पण आल्सा-रॅन राहिले.

यशवन्तने कथाकार दिले ते, म्हणजे वि. वि. बोकील, य. गो. जोशी, लक्ष्मणराव सरदेसाई हे युगप्रवर्तक, ग. रा. बाळ, जी. एन. आपटे, आर. डब्ल्यू डी. हे प्रतिभावन्त.

क्षमा राव या आद्य, आधुनिक कथालेखिकेचा लघुकथेच्या तंत्र व मंत्र यावरील लेखही महत्त्वाचा मार्गदर्शक.' यशवन्त'चं भूषण.

'यशवन्त'चे २९ ते ३५ सालातले जुने अंक चाळताना जुनं कथाकार व्हायचं स्वप्न बघणारं, थोरांच्या छापलेल्या कथा वाचून भारावणारं, आयुष्य पुन्हा अनुभवास आलं. त्याचबरोबर काही गोष्टी नव्याने कळल्या, जाणवल्या. पुर्नविचार, नव्याने मूल्यमापन, वगैरेही थोडं घडलं.

मनमोहन नातूंची एक साधी कविता १९६१ च्या अंकात आढळली. मनमोहनची पुढं दहा वर्षांनी माझी दाट मैत्री झाली. त्या, ४३–४४ साली तो किती वेगळं क्रान्तिकारक काव्य लिहायचा व यशवन्त, सत्यकथा, अभिरुची आदि मासिकांना शिव्या मोजायचा. नागपूरच्या दत्तू धगमवारची एक कविता होती दत्तू रमसीट, हॉकी खेळाडू. तो कवी कधीच शोभला नसता. त्याच्या हातात पुस्तक कधीच पाहिलं नव्हतं धगमवार कवी – हाच विनोद वाटला माझ्या हस्तलिखित मासिकासाठी माझ्या मामेवहिणीने, सुधा रानडे हिने, एक कविता दिली. त्याचं पहिलं कडवं असा कोकिळा, खुलवुनी गळा, खुणविते तुला, याच ग मासी – गतवर्षी फुललीस कशी ?' ही कविता सुंदर निर्दोष होती. माझ्याहून लहान असणाऱ्या वहिणीने अशी कविता लिहिली याचं प्रथम आश्चर्य वाटल, मग आनंद झाला. पुढे संशय आला की ही कविता सुधाची नाही. प्ऱ्याच वर्षांनी तिला विचारलं, तेव्हा ती म्हणाली, 'तू फार पाठी लागलास म्हणून जिजीची (आईची) कविता उतरवून तुला दिली–' ती कविता जिजींची म्हणजे मनोरमाबाई रानडे यांची शोभत होती खरी आईची कविता स्वतःची म्हणून देणं ही काही तशी चोरी नाही. पण आता पाहातो तो एप्रिल-मे १९३१ च्या 'यशवंत'च्या जोड अंकात ही कविता 'दोन वसंत कोकिळा' या नावाने छापलेली. कवी श्री. वा. रानडे, सुधाचे वडील. वडिलांची कविता स्वतःच्या नावाने द्यायची व विचारलं तर सांगायचं की आईची– हा काय विनोद ? श्री वा. उर्फ नाना मामांना विचारलं असतं तर त्यांनी कावळ्याच्या घरट्यात अंडी ठेवणाऱ्या कोकिळेचा किस्सा त्यांच्या खास शैलीत सांगितला असता, बहुधा !

'यशवंत'च्या एप्रिल १९२९ च्या अंकात 'जोन ऑफ आर्क' वर लेख आहे. त्यात कोल्हापूरच्या 'विद्यापीठ' या शाळेने 'सेंट जोन' नाटक केलं होतं त्याची छायाचित्रे दिली आहेत. 'विद्यापीठ' म्हणजे तोफखाने गुरुजी. त्यांची मोठी लेक आक्का तोफखाने माझा परम मित्र अशोक याची आतेबहीण. आक्का उतारवयात पुण्याच्या महानगरपालिकेच्या मुलींच्या शाळेच्या मुख्याध्यापिका म्हणून काही वर्षे काम करीत होत्या. अशोकमुळे माझे आक्कांशी ओळख.

सालापासून बेबनाव सुरू झाला. काही अंकांवर संपादक म्हणून नाव द्यायला जोगळेकरांनी विरोध केला. पुढे तडजोड होऊन सप्टेंबर ३४ पासून संपादक स. आ. जोगळेकर, सहसंपादक-- गो. रा पांध्ये, प्रकाशक व मालक ग. म. वीरकर अशी श्रेयनामावली प्रसिद्ध होऊ लागली. लघुकथा स्पर्धा अंकाचे संपादन तर (म्हणे) नी. म. केळकर यांनीच केलं. (आणि परीक्षण-- के नारायण काळे यांनी). गणेश महादेव कंपनीला १९३६ मध्ये टाळं पडलं व वीरकरांनी प्रथम मौज प्रिंटिंग ब्युरोमध्ये व मग सापळे यांच्या रामकृष्ण प्रिंटिंग प्रेसमध्ये यशवंत नव्या स्वरूपात सुरू केलं. वीरकर पुढे नाहीसे झाले जोगळेकर निघून गेले. पाध्ये पुढची दहाबारा यशवंत रडतखडत रेटत नेत होते.

या.पाध्येबुवांनाच मी माझ्या कथांचं हस्तलिखित नेऊन देत असे.

महाराष्ट्र टाइम्समधील तो लेख बाजूला टाकून मी 'सर्वोत्कृष्ट मराठी कथा' या राम कोलारकरांच्या दरवर्षीच्या उत्कृष्ट कथांचे संग्रह बाहेर काढले. कोलारकरांच्या मते १९२९ ते १९३४ या काळात कोणत्या उत्कृष्ट कथा यशवन्तमधल्या आहेत ? त्याआधी 'यशवन्तचा डिसेंबर १९३१ चा स्पर्धा अंक मी चाळला होता. तेव्हा १९३१ साली व आता परत १९८९ साली. त्या अंकात २६ कथा समाविष्ट होत्या व कथालेखकांची नावं दिली नव्हती. स्पर्धा निकोप व्हावी, निनावी कथांची नीट निवड पारितोषिकासाठी होईल म्हणून. स्पर्धेचा निकाल एप्रिल १९३२ मध्ये लागला व 'शेवग्याच्या शेंगा' य. गो. जोशी यांना प्रथम 'मोहिनी' – लक्ष्मणराव सरदेसाई – द्वितीय व 'नवी सृष्टी' – वि. स. खांडेकर – तृतीय – अशी पारितोषिकं वाचकांचा कौल लावून दिली निवड नेमकी होण्याबद्दल प्र क अत्रे, न चिं. केळकर, कुरुंदवाडकर व गो वा. खरे आदि सात वाचकांनाही बक्षिसं दिली होती. पारितोषिकप्राप्त कथालेखकां-व्यतिरिक्त अन्य तेवीस लेखकांत वा. ल. कुलकर्णी, दौंडकर, मालती दांडेकर, कुंभोजकर, पु. ना. पंडित, य. ग. वझे, जी. एन. आपटे, आनंदीबाई जयवन्त, श्री. वि. जोशी, युवराज पत्रसचिव, नी गो. पंडितराव व नी. म. केळकर हे होते.

राम कोलारकरांनी वाचकांचा कौल वगैरे घेतला नव्हता तेच परीक्षक. मासिकं पुष्कळ व कथालेखकांची नावं प्रकट. कोलारकरांची सर्वोत्कृष्ट कथांची निवड अशी आहे : १९२९ मध्ये ५ पैकी ४ कथा यशवंतमधल्या 'तोफेच्या तोंडी' कॅप्टन लिमये, 'एक रुपया' य गो जोशी, 'व्यवहार आहे हा' बोकील, 'गणिकेची ओळख' मी ! 'रत्नाकर'मधली एकच, ना सी फडकेंची कथा

घेतलेली आहे १९३० मध्ये ४ पैकी ३ कथा 'यशवंत'मधील आहेत व चवथी मनोरंजनमधील 'हृदयशारदा' ही कमलाबाई टिळक यांची आहे. यशवंत-मधल्या तीन म्हणजे 'बावनबुरुजी' व 'राजावळ' या चि. य. मराठे यांच्या व 'मूक', 'मी' ची. १९३१ मध्ये एकूण अकरापैकी यशवंतच्या तीन आहेत. चि. य. मराठे यांच्या 'हिंदूची मशीद' आणि 'आभाळास ठिगळ' व अत्रे यांची 'कुणी बोलायचं नाही.' बाकी कथा, स्फूर्ती, रत्नाकर, विविधवृत्त, मौज या मधल्या. १९३२ साली चारपैकी फक्त एकच, दिवाकर कृष्ण यांची, 'मलय-गिरीचा वसंत' ही कथा यशवंतमधली आहे. १९३३ मधल्या ४ व १९३४ मधल्या ७ कथा कोलारकरांनी घेतल्या आहेत. पण त्या सगळ्या 'प्रतिभा', 'पारिजात', 'विहंगम', 'संजीवनी', 'वागिश्वरी' अशा नव्या मासिकातून. यशवंतमधली एकही कथा या दोन वर्षांत निवडली गेली नाही! कोलारकरांची कलादृष्टी. कथांची निवड उच्च वादातीत आहे. यशवंतमधील कथांचा कस कमी होत चालला, कथांचा दर्जा घसरत गेला, हेच खरं!

१९२९ ते १९३३ या पाच वर्षांतल्या यशवंतच्या फायली मी भरल्या मनाने दूर सारल्या. आणि १९३५-३६ पासूनच्या मोठ्या आकाराच्या फायली तटस्थ-पणे पुढे ओढल्या. या फायली यशवन्तचा उतरता काळ दाखवीत होत्या. या फायलीत माझ्या पहिल्यावहिल्या कथा साठवल्या होत्या.

पदवीपरीक्षेच्या अभ्यासासाठी पुणे सोडून मी १९३७ साली मुंबईला आलो व दादरला रुईया कॉलेजचं हॉस्टेल असलेल्या 'पाम व्ह्यू' मध्ये राहू लागलो. इथे मला स्वातंत्र्य होतं, सगळं जग समोर होतं, लिहिण्याला बळ येत होतं, लिहिलेलं प्रसिद्ध करण्यासारखं आहे असा विश्वास वाटत होता. आणि डोळ्यापुढे यशवन्त मासिक होते. मी अवशेष ही लिहून ठेवलेली कथा यशवंत-कडे पोस्टाने पाठविली, ती यशवन्तचा पत्ता नीट लिहिला नव्हता म्हणून उशिरा पोचली. यशवन्तने कथा नाकारली की काय अशी शंका येऊन मी दुसरी कथा 'तुटलेला धागा' ही सत्यकथा मासिकाला धाडली. सत्यकथा मौज प्रेसमध्ये निघत होतं. संपादक होते अनन्त अन्तरकर; अन्तरकरांनी कथा स्वीकारली, भेटीला बोलावले, मैत्री देऊ केली. त्याच सुमारास अवशेष यशवन्तमध्ये छापून आली व नव्या कथेची मागणी आली, एप्रिल १९३९ पासून मी असा यशवन्त व सत्यकथा दोन्ही मासिकांचा लेखक झालो.

यशवंत तेव्हा मोठ्या आकारात, कमी पृष्ठांचे असे निघत असे. लेखक वर्गात चिपळीकर, जुन्नरकर, सहृदय, अदवन्त, ग्रामोपाध्ये, निरंतर, वाळिंबे. वसंत कानेटकरांच्या काही कथा ४०-४२ च्या दरम्यान आलेल्या दिसल्या. बी.

रघुनाथ, जी एन आपटे वामन चोरघडे अशा प्रतिभावान कथाकारांची कथाही दिसे. फडके, खांडेकर, य. गो. जोशी, वोकील, सरदेसाई, कमलाबाई टिळक, कुसुमावती अशा श्रेष्ठींच्या लेखनाला यशवंत अन्तरलेलेच दिसले. ३९ ते ४५ या काळात यशवंतला तेरा कथा दिल्या. सहा नंबरच्या ट्रॅमने दादरहून मी गिरगावात जाई त्रिभुवन लेनमध्ये रामकृष्ण प्रिंटिंगपाशी येई. दाराशीच टेवल टाकून सहसंपादक श्री. पाध्ये बसलेले असत. मी कथेचं हस्तलिखित टेवलावर ठेवी पाध्ये तिकडे डोळे मिटून पाहात मान डोलावित. कथा नंतरच्या अंकात प्रसिद्ध होई. भेटप्रत कधी येई कधी नाही. कल्पना विलास, पृथ्वीवरील चांदण्या, कोंडमारा, भातुकली, भाकरी आणि भावना, आदाम आणि इव्ह या काही कथा. 'हे मन!' ही ४५ सालातली शेवटची.

सत्यकथा मासिकसुद्धा तेव्हा मोठ्या आकारात, सुमार स्वरुपात निघत असे. या कालखंडात सत्यकथेत माझ्या वीसबावीस कथा प्रसिद्ध झाल्या. वीस मिनिटांचं प्रेम, मृगया, पालव्या पणत्या, उर्मिला या कथा. दादरहून ट्रेनने मी चर्नीरोडला जाई. खटाववाडीतल्या मौज प्रेसमध्ये येई. कार्यकारी संपादक रा. अनंत तरकर कागदांच्या गर्दीत आळसावून बसलेले दिसत. मला पाहाताच ते उठत. माझं हस्तलिखित पाळीत मला वाहेर घेऊन जात. जवळच्याच दर्युश या इराणी रेस्टॉरंटमध्ये चहापान, चर्चा वगैरेसाठी. नंतरच्या अंकात कथा छापून येई. अंकाच्या भेट प्रतीबरोबर संपादकांचं स्तुतिपत्र. अन्तरकर सत्यकथा सोडून जाईपर्यंत हे सुरू होतं. सत्यकथेचा नंतर कायापालट झाला. यशवंतची हाल–हलाखी वाढतच होती. मी यशवंतमध्ये लेखक म्हणून कसातरी. . .

प्रभात फिल्म कंपनीचा वैभवकाळ मी जवळून बघितला होता. प्रभातमध्ये जायची स्वप्नं घोळवली होती. प्रभातचा उतरता काळ, अखेरचं पर्व सुरू झालं, तेव्हा मी अल्पकाळ तेथे चित्रकथा लिहिण्यासाठी दाखल झालो. यशवन्त मासिकाच्या बाबतीत वाढाळू वयात असंच समांतर घडलं! यशवन्तचा वैभवकाळ मी पाहिला, वाचला होता. तिथे कथा प्रकाशित होण्याची स्वप्नं घोळवली होती. यशवंतचा उतरता काळ, अखेरचं पर्व सुरू झालं, तेव्हा मी यशवन्तचा कथालेखक झालो १९४५ पर्यंत.

त्या वर्षी सत्यकथा दिवाळी अंकात माझी कोकराची कथा प्रसिद्ध झाली. ती नवकथेची नांदी ठरली. मी मग नव्या स्वरूपाच्या सत्यकथाचा सर्वस्वी झालो. यशवन्त अखेरचे आचके देत कधी बंद पडलं ते समजलंही नाही.

( अरविंद गोखले, रागिणी, साहित्यसहवास, वांद्रा पूर्व, मुंबई ५१ )

# माझ्या जीवनपटातले काही एपिसोड

प्रकाशाचित्रण

**— भा. रा. भागवत**

फास्टर फेणे दूरदर्शनवर येणार असं ठरलं त्याचवेळी एक चित्रपट माझ्या डोळ्यांसमोरून सरकू लागला. पन्नास वर्षांपूर्वीपासूनच्या काही सत्यघटनांचा चित्रपट.

साऱ्या जगातच प्रचंड उलथापालथ घडवून आणणारा तो काल-खंड होता. अर्थात माझ्या आयुष्यांत त्याने उलथापालथ घडवून आणली ती साऱ्या जगातलं वातावरणच युद्धाच्या दिशेने खदखदत होतं म्हणून नव्हे; तर माझ्या व्यावसायिक जीवनातच कसला तरी खळबळाट सुरू झाला होता म्हणून.

मी त्या काळात माझं ब्रह्मचारी जीवन मुंबईत एकटा राहून कंठीत होतो. वयाची तिशीही गाठलेली नव्हती आणि तरी लेखनाच्या छंदाने मला झपाटलं होतं. अनेक विनोदी प्रेमकथा नि रहस्यकथा लिहिल्या आणि त्यांना 'किर्लोस्कर' 'मनोहर', सारख्यांनी सातत्याने स्थान दिलं त्यामुळे प्रसिद्धीचे थोडेफार कवडसे लेखणीच्या आजूबाजूस तरळत होते. वृत्तपत्रीय लिखाणही चालू होतं पण लेखणीची प्रवृत्ती एकंदरीत साऱ्याची खिल्ली उडवण्याकडे होती.

यातून अकस्मात मुंबईकरांचे दादा स. का. पाटील यांच्या 'प्रकाशा'च्या किरणांत मी एकाएकी कसा प्रवेश केला ते नीटसं आठवत नाही. मनोवृत्ती कुठंही घुसायची नाही, कुणी ओढून नेलं तरच जायचं अशीच. पण तसं झालं आणि अल्पावधीतच माझं नाव 'साप्ताहिक प्रकाश'चा संपादक म्हणून झळकू लागलं तेव्हा माझं मलाच नवल वाटलं.

वृत्तपत्रीय लिखाणाची आवड होती–नव्हे, पत्रकार होणं ही महत्त्वाकांक्षाच होती. पण त्यातही राजकारणाकडे उपहासाने पाहण्याकडे आणि कॉंग्रेसेतर राजकीय पक्षांची टिंगल उडवण्याकडेच लेखणीचा कल होता. (तो स्वातंत्र्या–पूर्वीचा काळ होता आणि महात्मा गांधी अन् तत्कालीन कॉंग्रेस यांनी आम्हा तरुण मंडळींना झपाटून टाकलं होतं हे या ठिकाणी विसरून चालणार नाही.) साहित्यसृष्टीत अलीकडेच 'ठणठणपाळ'ने ज्या पद्धतीच चुरचुरीत लेखनं केलं तसं काहीसं लेखन मी माझ्या 'चक्कर संघा'ची साप्ताहिक सभा भरवून प्रकाशच्या रकान्यांमधून तत्कालीन राजकारणावर करीत होतो. अर्थात प्रकाशचं मुद्रण सुंदर असलं तरी वितरण फार नव्हतं या कारणाने असेल आणि माझ्या लेखणीचा मगदूर कमी पडल्यामुळे असेल, मुंबईतल्या गांधी–विरोधी वृत्तपत्रीय गौंडांपुढे माझ्या लेखणीचा काहीच प्रभाव पडू शकला नाही.

पण मला या लेखात जे लिहायचं आहे ते माझ्या पत्रकारितेबद्दल नाही, माझ्या ललित लेखनाबद्दल. या लेखनालाही प्रकाशमधून भरपूर वाव मिळाला. नियमित बालसाहित्य लेखनालाही इथेच सुरुवात झाली रहस्यकथा अन् प्रेम-कथा यांची ओढ मला होती आणि तशा माझ्या कितीतरी गोष्टी यापूर्वीच अनेक नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाल्या होत्या. राजकारणात माझ्या मनामध्ये ज्याच्याबद्दल संपूर्ण रोष बसत असे, पण ज्याची साहित्यिक कर्तबगारी निर्विवाद होती आणि ज्याचे दिवाळी अंक म्हणजे त्या काळात एक वाङ्मयीन मेजवानी असायची त्या विविधवृत्ताने माझी पहिलीवहिली प्रदीर्घ (तथाकथित) विज्ञान कथा 'मंगळावर स्वारी' १९३४ च्या दिवाळी अंकात छापली तेव्हा मला माझा तो अपूर्व गौरव वाटला.

इथे भर देऊन सांगण्याचा मुद्दा हा की, माझ्या कथालेखनात एक प्रकारची नाट्यमयता होती. लघुकथा या प्रकाराबद्दल मला एक प्रकारची उपहासबुद्धी असे–त्या प्रकाराची टर उडवणारी 'दीड पानात आत्मघात' नावाची माझी कथा यापूर्वीच मनोहर मासिकातून प्रसिद्ध झाली होती. माझी प्रत्येक कथा प्रदीर्घ असे तीत कधी कधी गुर्जरी पद्धतीचा पाल्हाळ असे, नाही असं नाही. पण पात्र–वैचित्र्य, घटनांची गुंफण, रहस्य, उत्कंठा हे नाट्यविशेषही पुरेसे होते–किंबहुना माझ्या लेखनाचं हें वैशिष्ट्य मलाच प्रकर्षाने जाणवू लागलं. आणि असं वाटलं की माझी लेखणी चित्रपटासाठी लेखन करायला अनुरूप अशी आहे म्हणून मी तसा धडकावून प्रयोग केला.



अनुक्रमणिका

मराठीप्रमाणे इंग्रजीतूनही मी गोष्टी वगैरे लिहीत असे. नुकताच एक मोडका टाइपरायटरही खरेदी केलेला होता. तेव्हा मनात सुचलेल्या एका चमत्कृतिजनक कल्पनेवर आधारून मी माझ्या पटकथेचं इंग्रजीत सविधानक लिहून काढलं-तिचं टंकलेखनही केलं. आणि मग विचारात पडलो की हिचं आता काय करावं?

हा पुढला कार्यभागच मोठा दुष्कर होता. त्याचं कारण मासिकांत गोष्टी छापवून आणणं फारसं कठिण नसतं, पण सिनेसृष्टीत लेखक म्हणून प्रविष्ट होणं हें कर्म जबरदस्त आहे मासिकात संपादक नि लेखक या दोनच व्यक्ती आमने सामने उभ्या असतात; सिनेसृष्टीत निर्माता, दिग्दर्शक, तंत्रज्ञांचा तांडा या सर्वांशी स्टुडिओच्या तटाभोवती वशिल्याची तट्टं नाचत असतात ती वेगळीच. सिनेसृष्टीचे दरवाजे सहजासहजी उघडत नाहीत; त्यांवर धडका माराव्या लागतात अन् कपाळ फोडून घ्यावं लागतं. त्यतून लेखक एकदा आत शिरला म्हणजे मग मात्र वाटेल तसा धूडगुस घालू शकतो.

हा धडका मारण्याचा प्रकार मला जमण्यासारखा नव्हता किंवा सिनेसृष्टीतल्या नानाविध हुकमी पत्त्यांपैकी एखाद्या व्यक्तीला येनकेनप्रकारेण हस्तगत करणं हेही मला साधलं नसतं. कारण माझा तो स्वभावच नाही. त्यामुळे मी लिहिलेली कथा चित्रपटांच्या जगात कुठे नि कशी खपवावी हे मला कळत नव्हतं. काहीतरी करून ती खपवणं तर जरुरीचं होतं; कारण प्रकाशची नोकरी मी नुकतीच सोडलेली होती. इथे हे नमूद करायला हवं की कोणतीही नोकरी मी दीड एक वर्षापेक्षा अधिक काळ केलेली नाही घरसोडपणा हा व्यवसायातला माझा स्थायी भाव बनलेला होता. पण व्यवसायामुळेच काही नव्या ओळखी होणं अपरिहार्य होतं. तशा ओळखीतल्या मंडळींपैकी एकाला माझी कथा आवडली असावी किंवा माझ्याबद्दल करुणा वाटली असावी. त्याने मला सिनेसृष्टीतलं एक नाव सुचवलं. चित्रपटांच्या या 'विचित्र' जगात कुणाचाही भरवसा देता येत नाही, शहाण्या माणसाने त्या वाटेला न जाणंच बरं असा जो माझा ग्रह झालेला होता (आणि तरी मी ती वाट धुंडाळीत होतो) तो त्याने दूर केला अन् माझी खात्री करून दिली की सिनेमाच्या बेभरवशाच्या जगात एक फॅमिली अशी आहे की जी कधीही कुणाला दगा देणार नाही. त्यांना निःसंकोचपणे भेटावं, त्यांच्यावर बिनदिक्कत अवलंबून राहावं, इतकंच काय, या सौजन्यशील मंडळींचा एक मोठा गुण हा की ती गांधीजींची परमभक्त आहेत, खादी वापरतात. मी स्वतः खादी वापरत नव्हतो, पण मला दिलासा द्यायला हे सर्टिफिकेट पुरेसं होतं. मी त्यांचा पत्ता काढला आणि एक मोठं धाडस करून ज्योति स्टुडिओमध्ये त्यांना भेटायला गेलो.

या फिलम कंपनीचे ज्येष्ठ अध्वर्यू आजारी असून बिछान्याला खिळले आहेत असं कळलं. पण त्यांचे चिरंजीव ऑफिस चालवीत होते, त्यांना भेटलो. कुणाची तरी ओळख द्यायची होती ती दिली असावी. त्यांना भेटण्याचं कारण सांगितलं आणि स्क्रिप्ट त्यांच्या हाती दिलं. त्यांनी आदरातिथ्य चांगलं केलं. लिखाण ठेवून घेतलं अन् ते वाचून पाहण्याचं आश्वासन दिलं.

काही दिवसांनी पुन्हा जाऊन भेटलो मला वाटतं एक दोन भेटीतच मला त्यांचा निर्णय कळला. त्यांना गोष्ट आवडली होती; आणि ती ते घेणार होते! इतकंच नाही, तर कथानक लिहिलं होतं त्याच स्वरूपात (संविधानक म्हणून) स्वीकारायला त्यांची तयारी होती. पटकथा वगैरे लिहिण्याची जबाबदारी माझ्यावर नव्हती (हा नवखा माणूस ते कसलं करतो? काहीतरी गोंधळ घालून ठेवील अशी त्यांची खात्री असणार.)

पैशाच्या बाबतीत पहिला बूट कुणी काढला ते आज आठवत नाही; पण एक हजार रुपये ठरले. मला ते अर्थातच मान्य झाले. त्या काळात ती रक्कम प्रचंड होती. मनातल्या मनात मी एक उडीच मारली! त्याचवेळी त्या अगत्यशील तरुणाने सांगितलं की आपले वडील सध्या आजारी आहेत, पण आपण त्यांच्याशी बोललो आहो–किंवा बोलणार आहो. मी या निर्णयाबाबत निश्चित राहायला हरकत नाही

मी निश्चित राहिलो अन् पुन्हा पुन्हा या ज्युनियर निर्मात्याला भेटत राहिलो. सीनियर शेटजींच्या प्रकृतीची अर्थातच अगत्याने चौकशी करीत होतो. ते लवकर बरेच होईनात. तरुणाच्या आश्वासनाप्रमाणे कथानक घेण्याचं नक्की झालं होतं पैशाबद्दल काळजी करण्याचं मला मुळीच कारण नव्हतं. मला सिनेसृष्टीतला झगझगीत प्रकाश नको होता असं नाही, पण पैशाची चणचण हेच तर काळजीचं कारण होतं. कारण मी बेकार होतो. अखेरीस एक दिवस नक्की ठरलं,, की ज्या दिवशी माझ्या हातात हजार रुपये पडणार होते. तो दिवस जाऊन आणखीही काही दिवसगत झाली असणार

एका सुप्रभाती मी ज्योति स्टुडिओत गेलो तेव्हा ऑफीसमध्ये तो तरुण बसलेला नव्हता. त्याचे वृद्ध पिताजी बसलेले होते. प्रदीर्घ आजारातून उठून ते नव्या दमाने कामाला लागले होते मी स्वतःची ओळख करून दिली. माझं स्वागत त्यांनी चांगलं केलं, नीट बोलले. सगळं काही ठरलं असल्याची मी त्यांना आठवण दिली आणि ठरलेली रक्कम मला तातडीने मिळाली तर हवी आहे असं त्यांना आवर्जून सांगितलं. त्यानंतर संभाषणाला कशी कशी गती मिळत गेली आणि ती तशी का मिळाली ते सूत्र आता माझ्या स्मरणातून गेलं आहे.

पण या मुलाखतीचं पर्यवसान ज्या दोन शब्दांत झालं ते शब्द माझ्या चांगलेच लक्षात आहेत. 'गेट आऊट.'

असा जबरदस्त मानभंग माझा कधी झाला नव्हता. त्याच क्षणी मी तिथून जो बाहेर पडलो तो संतप्त मनःस्थितीत थरथर कापत होतो. भरवशाचे म्हणून ज्यांच्याबद्दल मला पूर्ण गॅरंटी मिळालेली होती त्यांच्याकडून बसलेला हा फटका असह्य होता. विश्वासाचा फुगा फुगत गेला होता अन् आता अचानकपणे फुटून त्यातली सारी हवा निघून गेली होती.

त्यानंतर मी त्या झगमगणाऱ्या जगाकडे पाठ फिरवली ती कायमची!

ज्या कथेने मला हा आशानिराशेचा खेळ सक्तीने खेळायला लावला तिचं नाव होतं सिगरेट क्रेझी. कल्पना थोडक्यात अशी होती की एक शास्त्रज्ञ एक फॅंटॅस्टिक सिगरेट शोधून काढतो. तिच्यात तंबाखूऐवजी एक प्रकारचं खास संस्करित द्रव्य ठासलेलं असतं. त्या सिगरेटचे झुरके घेणाराला एक अभूतपूर्व एनर्जी झपाटून टाकायची. त्याला कुठलीही रोगराई स्पर्श करू द्यायची नाही. आणि . . . मला वाटतं . . तो अमर व्हायचा! या फॅंटसीला जरूर त्या प्रेमप्रकरणाची झालर मी जोडलेली होती. आज ते 'स्क्रिप्ट' माझ्याजवळ नाहीं, तो टाइपरायटरही मी केव्हाच रद्दीत काढला, पण त्या अजब सिगरेटचा धूर मात्र नंतर कितीतरी काळ मला कासावीस करीत होता!

नंतर वर्ष दीड वर्षातच माझ्या असल्या 'विचित्र' करीअरचा दुसरा एपिसोड सुरू झाला. त्या वेळी मी पुण्यात होतो. माझ्या आते बहिणीचे यजमान के. नारायण काळे दिग्दर्शक म्हणून प्रभातमध्ये काम करीत होते. त्यांच्या विषयी तर मला आदर होताच, पण नाटय-चित्रपट सृष्टीने त्यांना जे वलय मिळवून दिल होतं तेही मला आकर्षित करायचं त्याचाही माझ्यावर लोभ होता. माझ्यातला नाटयगुण त्यांनी ओळखला होता.

एक दिवस त्यांनीच मला 'स्टोरी' लिहिण्याची 'ऑफर' दिली; तेव्हा मी रोमांचित झालो कामाला सुरुवात केली आपल्याला काय हवं आहे ते त्यांनी मला सांगितलं त्यांच्या मनात कथानकाचं काही एक बीज होतं. ते विकसित करून कथा लिहिण्याचं काम त्यांनी माझ्यावर सोपवलं.

मी त्यांच्याकडे नित्यनेमाने जात राहिलो नव्या नव्या कल्पना सुचत गेल्या; त्यांना शब्दरूप दिलं. पुढे कथानकाचा विकास होताना त्यातल्या काही कल्पना

पडल्या, काहींना निराळेच अंकुर फुटत गेले. मला वाटतं दीड दोन महिने हीं लेखनकामाठी चालू होती. त्यात भावात्मता, प्रीतिपरिपोष मधून मधून काळे त्यांच्या कल्पनेप्रमाणे भरीत होते, मी नवे नवे नाट्यप्रसंग हुडकीत होतो, त्यात रंग भरीत होतो; एखाद्या बारीकशा भावसूचक हालचालीत के. नारायण इतके रंगून जात की माझं नाट्यरंजन विसरून मी त्यांच्याकडे आश्चर्याने पाहात असे. अखेरीस संवादासह पक्कं कथानक जेव्हा तयार झालं तेव्हा माझ्या मूळ कथेत खूपच बदल झालेला मला दिसला.

काळेचांनी मला प्रश्न केला, 'पटकथा लेखक म्हणून तुझं नाव द्यायचं का?'

मी लगेच उत्तर दिलं, 'नको. ही कथा आता माझी राहिलेली नाही. तुमची झाली आहे.' नानांनी जास्त आग्रह धरला नाही. पण ते उत्तेजित स्वरुपात म्हणाले, 'ठीक आहे. प्रभातची पुढली स्टोरी तुझी!'

पण पुढली 'स्टोरी' ठरवणं ही नानांच्या मर्जीची गोष्ट राहिलीच नाही. कारण त्यांनी प्रभात कंपनी सोडली! धरसोडपणा हा जसा माझा स्वभाव तसा तो त्यांचाही होता. व्यवहारी जगात जोडीने यश मिळवायचं असेल तर परस्परात एकत्र एक गुण असून चालत नाही; पूरक गुण असावे लागतात. लेखन-कामाठीत आम्ही एकमेकांचे गुण ओळखून काम केलं, पण पुढे व्यवहारात मात्र घसरलो. 'शो-वर्ल्ड' मध्ये स्वतःच्या काही बऱ्यावाईट निष्ठा सांभाळून थोडीफार तडजोड करणं हे व्यवहार कुशलतेचं लक्षण आहे. त्यात वाईट काहीच नाही. पण ते के. नारायण काळेचांना कधी जमलं नाही अन् मलाही जमलं नाही. तरी असल्या प्रसंगांमुळे आमच्या परस्परांबद्दलच्या स्नेहात कधी खंड पडला नाही.

प्रभात-प्रकरणानंतर कुणाच्या तरी सांगण्यावरून देव्हारे बंधू अन् दादा तोरणे यांच्या कंपन्यांतून काही दिवस नवलेखक म्हणून उमेदवारी केली. पण ती सर्वस्वी निष्फळ ठरली. काँही म्हणता काही काम नसायचं. मी अन् माझा वेडेकर नामक एक सहकारी असे दोघे शंकरशेट रोडवर वीरवागेतल्या एका स्टुडिओत बसलेले असायचो. एका एकीकडच्या खोलीत टेबलापाशी बसून एकमेकांची तोंडं पाहात अन् अक्षरशः माश्या मारीत. बाहेर दोनतीन प्रशस्त सेट उभारलेले होते. अत्र्यांच्या नारदाच्या लग्नाचा सोहळा चालू होता. पण त्यात आम्हाला काही वाव नव्हता. मधून मधून शूटिंग बघायला जाऊन काय स्वतःची करमणूक करता येईल ती करून घेत होतो. दरम्यान माझ्याही लग्नाचा सोहळा पार पडला होता. नवरदेव काय करतात म्हणून कुणी प्रश्न केला तर वस्तुतः बेकार असूनही सिनेमात असतात असं ठोकून द्यायला मोकळीक होती.

(पृष्ठ १६२ पहा)

नावडीकरांना मी दोन भावगीते दिली–'पडले स्वप्न पहाटेला', आणि 'जारे चंद्रा मेघांच्या पडद्यात.' (त्यावेळी चद्र किती जणांनी वेठीला धरला होता त्याची सीमाच नाही,)–त्यांना ती आवडली हिज मास्टर्स व्हॉईसने या दोन्ही गाण्यांच्या ध्वनिमुद्रिका त्या दिवाळीच्या हंगामात बाजारात आणायचे ठरविले. त्यापूर्वी गणेशोत्सवाच्या पुण्याच्या विविध कार्यक्रमांत अशी गाणी गायकांनी पुनःपुन्हा म्हणून प्रसिद्धीपूर्व प्रसाराचे तंत्र अवलंबिले होते. माझी दोन्ही गाणी नावडीकर गाजवीत होते हिज मास्टर्स व्हॉईसच्या जी. एन. जोशींनाही ती आवडली असावीत कारण याच सुमारास आणखी नवीन भावगीतांची मागणी करणारे त्यांच्या सहीचे पत्र आले: सेंड मोअर फ्रेश काँपोझिशन्स.मी हुरळून जाणे स्वाभाविक होते ठरल्याप्रमाणे वरील स्वीकृत भावगीतांची ध्वनिमुद्रिका (दोन्ही बाजूला – एक एक ) त्या दिवाळीत बाहेर पडली!

त्या प्रसिद्धीच्या झोताच्या आनंदात मी मग्न असताना एक दिवस हिज मास्टर व्हाईसचे एक सणसणीत पत्र आले. पत्राचा आशय असा होता–'भावगीते तुम्ही आमच्या कपनीला दिली आहेत. करारनामा आमच्याशी केला आहे. अशा स्थितीत 'यंग इंडिया' या कंपनीला यातले भावगीत तुम्ही कसे दिले? हा करारभंग आहे. तुमच्यावर कायदेशीर कारवाई का करू नये? त्या कंपनीची याच भावगीताची ध्वनिमुद्रिका या दिवाळीला बाजारात आली आहे. इ. इ.'

मी हबकलोच! कोण हा गायक? कोणती ही 'यंग इंडिया' कंपनी? काही कळेना. धक्क्यातून थोडा सावरल्यावर तपासाला सुरुवात केली 'यंग इंडिया' चा पत्ता मिळवून त्यांना पत्र लिहिले, वस्तुस्थिती कळविली, लिहिले– 'बाबारे, हे तू काय केलस? तुझी माझी ओळख ना देख. माझी परवानगी नसताना तू भावगीत कसं ध्वनिमुद्रित केलंस? आणि मिळवलंस तरी कोठून? माझा करार 'हिज मास्टर्स व्हाईस' शी झालेला आहे. त्यांना माझ्या गाण्याचे अधिकार दिले आहेत. ते आता नुकसान भरपाईची कायदेशीर कारवाई माझ्यावर करतील. इ. इ.' असेच काहीसे पत्र यंग इंडियालाही लिहिले.

गायकाचे करुणापात्र पत्र आले. क्षमायाचना केली होती– 'मी नवखा गायक. मला कोणी भावगीत देत नव्हते. पुण्याला गणेशोत्सवात तुमचे गाणे नावडीकरांच्या कार्यक्रमात ऐकले–उतरवून घेतले आणि तुमच्या संमतीविना 'तुमची संमती आहे', असे खोटेच कळवून ध्वनिमुद्रण केले.' मी 'हिज मास्टर्स व्हाईस' ला दोन्ही पत्रांच्या मजकुराच्या प्रती पाठविल्या. आणि वेगळेच वळण या प्रश्नाला मिळाले. एच. एम. व्ही. ने कळविले– 'तुम्ही तुमच्या पत्रात गाण्याचे अधिकार एच. एम. व्ही. ला दिलेले आहेत. असा उल्लेख केलेला

असल्याने आता आम्हाला यात उतरणे भाग आहे. आम्हीच आता नुकसान भरपाई इत्यादीची कायदेशीर कारवाई संबंधितांवर करू.

चला सुटलो ! मी त्यावेळी तिशीचा तरुण. कोर्टकचेऱ्यांची धास्ती जास्त वाटणे स्वाभाविक होते. घाबरूनच गेलो होतो. पण दैवाने खैर केली. या प्रकरणातून असा अलग झालो. आणि या मार्गातूनही–कायमचाच. पुढे काय काय कोणावर कारवाई झाली, काय निकाल लागला याची चौकशीसुद्धा कधी केली नाही.

बऱ्याच वेळा ही ध्वनिमुद्रिका रेडिओवर लागते–अजूनही. असेच एका ऐकणाऱ्या चाहत्याने मला कौतुकाचे पत्र गेल्या महिन्यात लिहिले. मला उत्तर द्यावेसे वाटत होते–' मित्रा, तो पुरुषोत्तम पाटील मी नव्हे तो कधीच दिवंगत झाला. (ईश्वर मृताच्या आत्म्यास शांती देवो ! )' ही हकिकत जरा विस्ताराने सांगण्याचा हेतू एवढाच की असा काही या अपघाताचा सुदैवी शेवट झाला नसता तर भावगीत लेखकांच्या दिंडीतलाच मी एक झालो असतो. अर्थात तितके अचूक काहीं मी लिहिले नसते (ग दि मां चा चांगला आदर्श डोळ्या-पुढे होताच) पण ' पापडा 'वर जाहिराती, कविता लिहिण्याचा प्रसंग येण्याच्या दुर्भाग्यापेक्षा ते दुर्भाग्य फार वाईट ठरले नसते ! असो.

याच उमेदवारीच्या काळात ' सत्यकथा ', ' नवभारत ' ' साहित्य' मध्ये माझ्या कविता प्रसिद्ध होऊ लागल्या होत्या. बऱ्यापैकी कविता लिहू शकतो याचा आत्मविश्वास येऊ लागला होता एक निराळा उत्साह निर्माण झाला होता. ' सत्यकथे 'त तर सातत्याने कविता प्रसिद्ध होऊ लागल्या होत्या.

पण एकदम ठेच लागली. अशी जबरदस्त की डोळ्यात पाणी यावे. पण या ठेचेनेच मला शुद्धीवर आणले काव्याच्या वाटचालीतले एक विशुद्ध, लख-लखीत आत्मभान दिले.

एक दिवस ' सत्यकथे 'चे कार्यकारी संपादक श्री. ग. रा. कामत यांचे पत्र आले. संपादक श्री पु भागवत यांच्याप्रमाणेच तेही अतिशय चिकित्सक, लेखक-कवींच्या साहित्यातील गुणदोष नेमके हेरून त्यांना वेळीच मार्गदर्शन करणारे–तेही खटाववाडी सौजन्ययुक्त भाषेत पण त्यातले काही शालजोडीतलेही असे. मी सत्यकथेकडे ' मी तर असला छंदीफंदी ' ही कविता पाठविली होती. ती स्वीकारल्याचा कामतांच्या पत्रात सुरुवातीला उल्लेख होता. पण पुढे त्यांनी लिहिले होते– ' या कवितेखाली जर तुमचे नाव नसते तर इतकी सफाईदार कविता श्रीकृष्ण पोवळे यांनी कशी लिहिली याचा मला अचंबा वाटला असता! '

(पृष्ठ १५४ पहा.)

# दादूमिया कसे जन्मले ?

– दादूमिया

'सर्जन बनण्याची ख्वाईश राहून गेली बघा.' मी माझ्या प्लॅस्टिक सर्जन मित्राजवळ मनातली खंत व्यक्त करतो.

'चांगलं झालं, परमेश्वराच्या मनांत तुला लेखक बनवायचं होतं.'

'माझी खंत आहे माझ्यावर अन्याय झाला त्याची, सर्जरी थियरीत पहिला, प्रॅक्टिकलमध्ये पहिला आणि तरी सर्जरीची पोस्ट मला नाकारण्यात आली.'

'अन्याय झाला ते चांगलं झालं. आम्हाला तुझा हेवा वाटतो.'

'आमची पहिली बॅच होती. एव्हाना मी सर्जरीचा प्रोफेसर झालो असतो.'

'नक्कीच झाला असतास, पण मग लेखक नक्की झाला नसतास.'

'नॉट नेसेसरिली.'

'सर्जरी म्हणजे रोजचे टेन्शन. ऑपरेशन करायचे, त्याची कॉम्प्लिकेशन्स होणार नाहीत यासाठी परमेश्वराजवळ प्रार्थना करायची आणि तरीही जी नवीन कॉम्प्लिकेशन्स् होतील त्यांना तोंड द्यायचे. पैसा मिळतो पण मनाच्या शांतीचे काय ? म्हणून बहुधा सारे सर्जन्स् अकाली मृत्यू पावतात. एव्हाना तर तू वर पोचला असतास. यू आर टू सेन्सिटिव्ह, आय नो.'

आज माझे बरेचसे मित्र सर्जन्स् आहेत. आता माझा मुलगा देखील सर्जन झाला आहे. दैवात असेल तर सून देखील सर्जन होईल. सासूच्या पावलावर पाऊल टाकून.

पण मला अजूनही सारखे मनात येते, मला जनरल प्रॅक्टीस करावी लागली, सर्जरीची पोस्ट मला दिली नाही.

काँग्रेस जसे तिकीटच नाकारते तसा हा प्रकार झाला. पुढे निवडून

देण्याचा प्रश्नच नाही.

अर्थात बहादूर लोक पक्षांतर करतात किंवा स्वतंत्र म्हणून उभे राहून कॉंग्रेसच्या उमेदवारास पराभूत करतात. कॉंग्रेस त्याला पुढे पक्षात घेते व मंत्रीपदसुद्धा बहाल करते

ती हिंमत माझ्याच्याने झाली नाही. कारण, गरीबी.

वडिलांच्या मृत्यूनंतर माझ्या आईने मला एम बी. बी. एस. केले. मी नीट शिकलो तर माझी भावंडे नीट पुढे शिकतील व पुढे येतील असे माझे तत्त्वज्ञान होते. त्यामुळे अभ्यास एके अभ्यास एवढेच करायचे असा निश्चय मी केला होता. आणि तो पार पाडला. बडोदा मेडिकल कॉलेजातील माझी पहिली बॅच. मला सिनियर कोणी नाही. क्वॉलिटी कंट्रोल म्हणून एम. बी. बी एस. ला सारे एम. डी. - एम एस. चे परीक्षक आणण्यात आले. मेडिसिनला गिल्डर, सर्जरीला एस. जे. मेहता. अशा कर्दनकाळ परीक्षकांच्या तावडीतून मी सुटलो. सर्जरीत फर्स्टक्लास फर्स्ट. खूप आनंद झाला मला.

पण प्रिन्सिपॉलने सूड उगवला. मागे कधीतरी डिबेटमध्ये त्याच्यावर सडकून टीका केली होती. आमच्याकडे गुजराथमध्ये नर्सेस नाहीत म्हणून खिस्ती नर्सेस केरळकडून इंपोर्ट केल्या जातात. आमचे हॉस्पिटल क्राईस्ट-लँड बनविण्यात आले आहे. वगैरे वगैरे.

लोकांनी मला अक्षरशः डोक्यावर घेतले. कारण, मी त्यांच्या मनातले बोललो होतो. डिबेटिंग ट्रॉफी मी जिंकलो होतो पण आयुष्यातील खरी ट्रॉफी मी हरवून बसलो होतो! माझ्या रागावलेल्या व दुखावलेल्या प्रिन्सिपॉलने मला आव्हान दिले होते, 'मी पाहून घेईन!' मी माझ्या धुंदीत होतो. प्रत्येक विद्यार्थ्याने, प्रत्येक प्राध्यापकाने, प्रत्येक स्टाफ मेंबरने माझे मनःपूर्वक अभिनंदन केले होते. आणि नेमके त्यामुळेच पि. डीसवाड्‌ास माझ्यावर उखडला होता.

सर्जरीच्या दोन पगारी पोस्टस्. काहीतरी कारणे काढून त्याने त्या पोस्टस् मला दिल्या नाहीत. बिनपगारी पोस्ट दोन होत्या.

मागे वळून पाहता, मी त्यातली एक पोस्ट घ्यायला पाहिजे होती. माझा अहंकार नडला.

प्रत्येक वेळा व्यावहारिक शहाणपण शिकविणारा एखादा गुरू शेजारी असावा लागतो. यशस्वी माघार म्हणजे अंतिम विजयाची वाटचाल, असले व्यावहारिक शहाणपण शिकवावे लागते, अहंकार मनातल्या मनात गिळावा लागतो. लोखंडाचे

चणे खावे लागतात.

तारुण्यातील मस्ती.

सर्जरीत पहिला आलो त्याचा अहंकार.

आणि ' गुरू'चा अभाव.

डीक्वॉड्रासने विनपगारी सर्जरीची पोस्ट घ्यायला सांगताच मी त्यास सुनावले, ' मला तुझ्या मदतीची गरज नाही टू हेल वुइथ यू. मी जनरल प्रॅक्टीस सुरू करेन.'

हा पुढे मुंबई राज्याचा सर्जन जनरल झाला. ' मी तुझे नुकसान केले तुझी करिअर रुईन केली.' अशी त्याने पुढे माझी माफी मागितली.

' तू आमच्याकडे ये. ओजी (ऑब्स्टेट्रिक्स अँड गायनॅकॉलॉजी) म्हणजे अर्धे मेडिसिन, अर्धी सर्जरी, आम्हाला तुझ्यासारखा चांगला विद्यार्थी पाहिजेच आहे.' अशी समजूत घालून माझ्या ओळखीच्या प्राध्यापकांनी मला ओजीकडे आणले.

पण ते प्रेमात पडले होते. आधी दोन बायका होत्याच, पण तिसरीची तयारी चालू होती. या तिसरीला इतर लोक खूप सतवायचे ! काय वाटेल ते बोलायचे. हॅट्रीक काय, थ्री इन वन काय–मत्सरापोटी, हेव्यापोटी, असूयेपोटी पुरुष कसे निंदा करण्यास प्रवृत्त होतात ते मी जवळून पाहिले. ती मागासलेल्या जातीतील होती. माझी तिला सहानुभूती होती.

अर्थातच, तिची माझ्यावर.

अगदी वरदहस्त !

या बाईंनी मला खूप सर्जिकल वर्क दिले अर्थात वेंबीच्या खालील. आणि फक्त स्त्रियांपुरते मर्यादित.

ती 'निअरेस्ट टु द हायेस्ट' होती त्यामुळे तिच्या विरुद्ध तोंडावर कोणी काही बोलायची शहामत नव्हती. तिने व मी खूप मोठमोठाल्या शस्त्रक्रिया इतरांना डावलून पार पाडल्या. आणि तरी इतर तिची चमचेगिरी करीतच होते ! कारण ती 'उगवता सूर्य' होती बॉसची 'प्रिया' होती.

पण हेच चमचे तिची पाठ फिरताच वाटेल ते बोलत. कट – कारस्थाने करीत. पेपरमध्ये काही गोष्टी छापवून आणीत. ती मनातल्या मनात रडे. मी तिला धीर देई. बॉसचे तिला संपूर्ण सहाय्य होते. त्यामुळे ती टिकली.

'अरे, तिला पगार किती ? अडीचशे रुपये. पण डीयरनेस अलाऊन्स किती ? ते विचारू नका. ते आपल्याला कोण सांगेल ?' वगैरे जेवणाच्या टेबलावर

उघडपणे चर्चा होत.

एकही दिवस तिला नीट जेवू दिले नाही लोकांनी. रविवारी पार्टी असायची. त्यावेळेस तर या वक्रोक्तीस ऊत यायचा.

रोज कट कारस्थाने चालायची.

मला काम मिळत होते, पण कामाचे समाधान नाही. तेथल्या राजकारणामुळे मी हैराण होऊन गेलो. आमच्या क्लिनिकल मिटींग्ज दर बुधवारी सायंकाळी व्हायच्या. मला तो फाशीचा दिवस वाटत असे. बारीकसारीक चुकांचे भांडवल करून असे काही टीकास्त्र सोडले जाई की पृथ्वी दुभंगून आपल्या पोटात आपल्याला घेईल तर उपकार होतील असे वाटे. निदानालस्ती ऐकायची व वर चेहरा हसरा ठेवायचा.

पण ते नाटक करणे आवश्यक होते.

बरेच वेळा 'बाईचा पक्ष' सोडून द्यावा असे मनात येई. पण बाई फार दयाळू होत्या, भल्या होत्या. आणि त्या मला 'सर्जिकल वर्क' देत असत.

विरोधी पक्ष बेकार होता.

शब्द खूप छान, पण कामाच्या नावाने शून्य. याउलट, माझा बॉस व बाईचा प्रियकर कामाला वाघ होता. 'आम्ही काम करतो, तुम्ही बसा शिव्या देत,' अशी त्यांची घोषणा होती, तत्त्वज्ञान होते.

त्यामुळे शिव्याशापांना कंटाळून विरोधी पक्षात जाणे वेडेपणा ठरला असता. वर्क मिळाले नसते, काहीही शिकायला मिळाले नसते, रिकामटेकडा बसून काड्या घालण्याचे शास्त्र कदाचित शिकलो असतो. माझ्या बॉसने मला 'वर्कहोलिक' बनविले होते. मला वर्क पाहिजे होते.

बुधवार म्हणजे युद्धाचा दिवस.

एरव्ही पडद्याआडून युद्ध रोज चाले. कुत्रा डुक्कर, गाढव ही विशेषणे ऐकायला लागायची.

एके दिवशी धीर करून विरोधी पक्षाच्या म्होरक्यास त्याच्या घरी भेटलो. त्याने सरळ कबुली दिली, 'तू वेडा आहेस, तुला समजत कसे नाही ? आम्हाला तुझ्या बॉसला किंवा त्याच्या बाईला उघडपणे काही म्हणता येत नाही. म्हणून तुला शिव्या। त्या शिव्या त्यांच्यासाठी असतात.'

मी घरी आलो व मस्तपणे तणावून दिली.

'या शिव्या माझ्या बॉसला व बाईला होत्या, मला नाही,' या आश्वासनाने

मला एकदम सुटका झाल्याची जाणीव झाली. रिलीफ, भयंकर मोठा रिलीफ.

ओजी म्हणजे भयंकर काम.

'हे काम रात्री सुरू होते व रात्री संपते' असो आमच्या ओजीच्या खात्यात म्हटले जाते. ते खरेही आहे.

रोज जागरणे.

दिवसा प्रचंड काम.

आऊट डोअर एकदम हेवी दोनशे-अडीचशे पेशंटस. अक्षरशः दम निघायचा.

आणि वर राजकारण.

कटकारस्थाने, शिव्याशाप व पाय खेचणे.

मी सहा महिन्यांत पुरा कंटाळला व ते ओजीचे खाते सोडले.

'मग मी कसे सहन करीत असेन ?' बाई मला विचारायच्या.

'तुम्हांला तर डियरनेस अलाउन्स मिळतो.' मी हसून म्हणायचा. मी त्यावेळी अविवाहित होतो.

'म्हणत असल्यास मी वधूसंशोधन करते.'

'मला कंटाळा आला या राजकारणाचा. मी जीपी चालू करेन असा विचार करतो आहे.'

'सहा महिने तर गेले. अजून अठरा महिने काढ. एम. डी. होशील. खोऱ्याने पैसा ओढशील.'

'नको, आता वैताग आला.'

'मर्जी तुझी, पण नीट विचार कर, एम. एस. नाही तरी एम, डी. करच. आपले साहेबच परीक्षक असतील. तू हुषार विद्यार्थी आहेस. सहज पहिल्या ट्रायलला एम. डी. होऊन जाशील !'

'अं हं. मी खरंच कंटाळलो आहे.'

'मर्जी तुझी.'

आणि मी जी. पी. चालू केली. जनरल प्रॅक्टीस, कोणीही या. लहान मुलापासून बुढ्ढे बाबापर्यंत, हमालापासून मॅनेजिंग डिरेक्टरपर्यंत, कम वन, कम ऑल.

फावल्या वेळेत मी लेखन करू लागलो. पहिला लेख 'स्ट्रेप्टोमायसिन' टीबीवरील त्यावेळचे उत्कृष्ट औषध. आज त्यास कोणी विचारीतदेखील नाही.

आणि दुसरी गोष्ट 'मात्सुकोका.' माझ्या वडिलांच्या इंग्लंड-जर्मनीतील

वास्तव्यातील सत्यकथेवर आधारलेली.

केसरी प्रकाशनच्या सह्याद्रीमध्ये हे दोन्ही लेख प्रसिद्ध झाले.

आणि लाईफ-इंटरनॅशनलने माझे एक पत्र छापले. त्याने खूप प्रसिद्धी मिळाली.

सारे माझ्या खऱ्या नावाने.

एवढ्यात एक मजेदार घटना घडली.

मी रात्री व्हिजिटला गेलो होतो. पेशंट आमच्या फाईन आर्टस् कॉलेजचे डीन नानासाहेब. त्यांच्याकडे जायची नेहमी मजा यायची. कारण, चीन, जपान, युरोप, अमेरिका - कोठले न कोठले टॉप कलावंत त्यांच्याकडे पाहुणे म्हणून असायचे. गप्पा मारणे व ज्ञान मिळविणे हा माझा छंद होता.

नानांना फ्ल्यू झाला होता. मी औषध वगैरे दिले. कॉफी घेता घेता गप्पा रंगल्या.

'नाना, हा फ्ल्यू कोठून पैदा केलात ?' मी विचारले.

'कालंच मी इंडियात आलो. तेहेरानला गेलो होतो.'

'पर्शियाची राजधानी.'

'हां, तेथे हॉटेलात एक चित्र पाहिले. त्याच्या डोक्याभोवती वलय दाखविले होते. मी नोकराला विचारले, हे चित्र कोणाचे ? तो म्हणाला, एवढे ठाऊक नाही ? महमद द प्रॉफेट. मला आश्चर्य वाटले. महमदाचे चित्र ? कसे शक्य आहे ? म्हणून मॅनेजरला विचारले. त्याचे तेच उत्तर, महमद द प्रॉफेट, त्याला वाटले मी बहुधा धार्मिक मनुष्य आहे. त्याने दुपारी गाडी काढली व साऱ्या पब्लीक प्लेसेस मला दाखविल्या. संग्रहालय, बँड स्टँड वगैरे. आणि प्रत्येक ठिकाणी ते चित्र मी पाहिले व प्रत्येक वेळेस हमून त्याने मला सांगितले, महमद द प्रॉफेट.'

'आश्चर्य आहे.'

'मला फार आश्चर्य वाटले. आमच्याकडे असे कोणी चित्र लावले तर त्याला लोक दगडांनी ठेचून मारतील असे मी म्हणालो, तो मॅनेजर म्हणाला, तुमच्या-कडे खरे पाक मुसलमान थोडेच आहेत ? सारे बास्टर्ड मुस्लीम्स्. त्यांना काय इस्लाम कळतो ?'

आणखी बऱ्याच गोष्टी रंगल्या.

दुसऱ्या दिवशी मी पहाटे उठलो व ही सत्यकथा लिहून काढली. या आंतर-

राष्ट्रीय ख्यातीच्या कलावंताचे नाव मात्र लिहायचे मुद्दामच वगळले. लेखावर लेखक म्हणून माझे नाव लिहिले.

पण माझ्या मनात आले, माझे नाव लिहिले खरे पण माझ्यावर विश्वास कोण ठेवणार ?

एवढ्यात मला व्हिजिटला बोलवायला माझा एक नेहमीचा पेशंट आला. त्याची मुलगी झोरा खूप आजारी होती.

मी त्याला म्हटले, 'दादूमिया, पाच मिनिटे थांब. मी तयार होतो व तुझ्या-बरोबर येतो.'

माझी ट्यूबलाईट पेटली.

मी लेखावरचे माझे खरे नाव खोडून काढले व त्याऐवजी लिहिले दादूमिया.

व्हिजिटहून परत आलो व 'केसरी' च्या नावाने तो मजकूर पाठवून दिला. केसरीने तो छापला देखील.

आणि मग खरे नाटक सुरू झाले.

संपादकांना पत्रे सुरू झाली.

सुरुवातीलां मवाळ, काही आश्चर्ययुक्त, काही संशय व्यक्त करणारी, काही जास्त तपशील विचारणारी.

पत्रांची संख्या वाढू लागली.

आणि शेवटी, 'तुम्ही हे पाखंड प्रसिद्ध करता आहात, आम्ही केसरी जाळून टाकू ' या धमकीपर्यंत प्रकरण पोचले.

संपादकांनी व्यावहारिक शहाणपण स्वीकारले. त्यांनी प्रसिद्ध केले. 'यापुढे या विषयावरील पत्रव्यवहार बंद केला आहे.'

आणि त्या प्रकरणावर पडदा पडला.

त्यानंतर मी नेहरूंची मुलाखत घेतली होती. मुलाखत होती, मुस्लीम जातीयतेवर. 'तुम्ही अरब राष्ट्रांचे तुष्टीकरण करता आहात कारण ती मुस्लीम राष्ट्रे आहेत,' असा प्रश्न मी विचारताच पं. नेहरू लालेलाल झाले.

'डॉक्टरसाहेब, तुम्ही समजून का घेत नाही ? आपण सध्या काय तयार करतो आहोत ? पंखे व शिवण्याची यंत्रे. त्याला आपल्याला गिऱ्हाईक कोण आहे ? दक्षिणपूर्व आशियात जपानच्या मालापुढे आपला टिकाव लागणार नाही. प्रगत देश आपल्याला तुच्छ समजतात. राहिले दोन भूभाग. मध्यपूर्व व आफ्रिका खंड. आपल्याकडे फार मोठी मुस्लीम लोकसंख्या आहे. त्याचा आपण वापर

केला पाहिजे आपला इकॉनॉमिक इंटरेस्ट आपण बघितला पाहिजे, आपण अर्थशास्त्रीय दृष्टया जगात प्रगत बनले पाहिजे. हा मुस्लीमांच्या तुष्टीकरणाचा प्रश्न नाही. रिमेम्बर, पॉलिटिक्स इज दि आर्ट ऑफ दि पॉसिबल!'

ही मुलाखत त्यावेळी फार गाजली.

राजकारणावर मी त्यानंतर तीन दशके लेख लिहिले. बहुधा वैचारिक साहित्य. त्याची प्रशंसा झाली. त्या साऱ्याचा पाया केसरीतील हे दोन लेख.

मी लेखावर लेखक म्हणून माझे खरे नाव टाकले होते. लेख विवादास्पद व मुस्लीम जातीयतेवर होता. आणि पं नेहरूंच्या मुलाखतीचा. मराठी लेखकांत पंतप्रधानापर्यंत पोचणारा मी पहिला लेखक होतो. विचार स्पष्ट होते कोठेही छपवाछपवी नव्हती.

केसरीकारांनी माझे खरे नाव खोडले व त्याऐवजी लिहिले : दादूमिया.

तेव्हापासून दादूमिया जे चिकटले ते चिकटलेच. मुकुंदराव किर्लोस्करांनी एकदा ही वरील गोष्ट प्रसिद्ध करण्याचे ठरविले व माझी समती मागितली. मी त्यास नकार दिला. 'दादूमिया' हे नाव माझे मलाच आवडू लागले होते.

'दादूमिया, बडोदे' या पत्त्यावर मला बरीच पत्रे मिळू लागली होती.

त्यामागे आणखी एक मजेदार पार्श्वभूमी होती.

माझा आतेभाऊ त्यावेळी बरेच साहित्य लिहित असे. कथा देखील 'वसंत' मधून लिहित असे. स्वतःच्या नावापुढं तो एम. ए. व आणखी मिळविलेल्या डिप्लोमा व डिग्र्या लावी.

मी त्याला विचारी, 'हे डिग्र्यांचे शेपूट कशासाठी ?'

तो म्हणत असे, 'त्याने लेखकाचे वजन वाढते ते तुला नाही कळायचे.'

'एकही पदवी न लिहिता व एखादे ऑड नाव घेऊन मी लेख प्रसिद्ध करून दाखवेन. लेख आतील विचारांसाठी प्रसिद्ध होतात. लेखकाचे नाव व त्याच्या डिग्र्यांच्या शेपटासाठी नाही.'

'दाखवच लिहून. तुला नाही ते कळायचे !' त्याने मला आव्हान दिले होते.

'ओ. के. आय ॲक्सेप्ट युवर चॅलेंज.'

म्हणून, दादूमिया, फक्त दादूमिया, नो डिग्रीज्, लिहिताना मला एक आव्हान स्वीकारून ते जिंकल्याचा आनंद होतो.

म्हणून मी मुकुंदरावांना नकार दिला.

फक्त दादूमिया !



अनुक्रमणिका

मी राजकीय उलाढालीवर लिहितो. त्यातले वारकावे, त्यातील आतल्या गोटाच्या गोष्टी, गुपिते. त्या सर्वांमुळे मसाला रंगतो व मजकूर वाचनीय होतो. इन्व्हेस्टिगेटिव्ह जर्नालिझम मराठीत मी सुरू केला असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. दिल्लीच्या वाऱ्या माझ्या खर्चाने मी केल्या. खूप मंडळींना मी भेटलो, त्यांच्यापासून माहिती काढून घेतली. आणि पोट भरून लिहिले. हार व प्रहार दोन्ही मिळविले.

वडा मजा आया !

पण ते लेखन करीत असताना मी माझ्या प्रिन्सिपॉल डीक्वाड्रॉस, ओजीचा बॉस, त्याची बाई, आमचे विरोधक व माझा आतेभाऊ ( एम. ए. बी. टी. डी. वगैरे वगैरे ) यांना विसरू शकत नाही.

त्यांना माझे सलाम.

त्यांच्यामुळे 'दादूमिया' घडला.

डॉ. दा. वि. नेने, पितृछाया, खारीबाव, बडोदा ३९० ००१

# मला नाटककार व्हायचं नव्हतं

**– सुरेश खरे**

माझ्या लेखनाची सुरुवात कॉलेज जीवनात कवितांनी झाली. मंगेश पाडगावकर, वसंत बापट आणि विंदा करंदीकर हे त्या वेळी लोकप्रियतेच्या शिखरावर होते आमच्या कॉमर्स कॉलेजमध्ये लेखनाला पोषक असं वातावरण नव्हतं. एकूण मराठी विद्यार्थ्यांची संख्याही कमीच. त्यामुळे माझ्या सामान्य कवितांना सुद्धा लोकप्रियता आणि प्रसिद्धी कॉलेज वर्तुळात मिळत होती. त्या काळात जवळजवळ शंभर दीडशे कविता मी लिहिल्या. त्यातल्या बऱ्याचशा सामान्य होत्या याची मला त्या काळातही जाणीव होती. अनुकरणप्रियता त्या कवितेत जागोजागी दिसून येत असे. काही काही कविता मात्र माझ्या दृष्टीने खरोखर चांगल्या उतरल्या होत्या मी विनोदी कविताही लिहित असे. त्यातला विनोदाचा भाग सोडला तर त्या काव्याला तसा काही अर्थ नव्हता. त्यातली माझी एक कविता 'आलमगीर' साप्ताहिकात व दुसरी 'नवयुग' साप्ताहिकात प्रसिद्ध झाली कवी म्हणून आपलं नाव छापून आलेलं जेव्हा मी प्रथम पाहिलं, तेव्हा मला कृतकृत्य झाल्यासारखं वाटलं. माझ्या आठवणीप्रमाणे मी स्वतः अंक विकत घेऊन मित्रमंडळीत 'असू दे तुमच्याकडे, माझ्याकडे दुसरा अंक आहे' असं म्हणून त्यांच्या माथी मारल्याचं मला अजूनही स्मरतं

सत्यकथेत कविता छापून येणं म्हणजे आयुष्याचं सार्थक झाल्यासारखं म्हणून मी माझ्या त्यातल्या त्यात दोन उत्कृष्ट कविता सत्यकथेला पाठवल्या त्या अर्थातच साभार परत आणि त्यानंतर पुढे पचवीस वर्षांत मी एकही कविता लिहिली नाही. 'मंकेत मीलनाचा' या माझ्या नाटकासाठी एक कविता लिहिली हा एकमेव अपवाद. मी कविता लिहिण्याच बंद केल्यामळ वाचकांचा तसाच माझा स्वत.चाही व्यक्तिगत फार मोठा फायदा झाला. कवी व्हायचं माझं स्वप्न निथंच विरून गेलं.

नाटकाचा नाद मला लहानपणापासून होता. कुठच्याही नाटकात काम केलं की ते सबंध नाटक मी पाठ करीत असे. अशी अनेक नाटकं माझी पाठ होती

एक दिवस अचानक मला एक कथेचा विषय सापडला. त्यावर मी एका बैठकीत कथा लिहून काढली. कथा लिहून संपल्यावर माझ्या लक्षात आलं की ती कथा संपूर्ण संवादशैलीत होती. त्यात वर्णनात्मक असं एकही वाक्य नव्हतं. फक्त दोन पात्रांचे संवाद. तो आणि ती

माझं कॉलेज शिक्षण चालूच होतं. गिरगावातल्या पोर्तुगीज चर्चसमोर 'व्हाइसरॉय' या इराणी हॉटेलात आम्हा मित्रमंडळींचा अड्डा होता. बबन प्रभूची आणि माझी चांगली मैत्री होती. त्याच्याशी गप्पा मारण्यात मजा येत असे. त्याचे फार्स त्यावेळेस लोकप्रिय होत होते. त्याच्या एका फार्समध्ये मी कामही केलं होतं. त्याचीही व्हाईसरॉयवर अधून मधून चक्कर असायची. एक दिवस आम्ही असेच गप्पा मारीत बसलेले असताना तिथं बबन प्रभू येऊन टपकला. गप्पा मारता मारता त्यानं सहज म्हणून माझी बाजूला पडलेली वही उचलली. त्यात ती कथा होती. चाळता चाळता त्यानं ती कथा वाचायला सुरवात केली. तो गप्प झाला आणि एका बैठकीत त्यानं ती संपूर्णपणे वाचून काढली. वाचून संपल्यावर तो एकदम आनंदानं उद्‌गारला, 'अरे गड्या तू फार मोठा नाटककार आहेस. तू हे जे काही लिहिलंयस, ते इतकं सुंदर लिहिलंयस. असे संवाद आम्हाला वाचायलासुद्धा मिळत नाहीत. ही तुझी कथा नाही, ही एकांकिका आहे. मी ही नभोवाणीवरून प्रसारित करतो.' बबन त्या वेळी मुंबई नभोवाणीवर निर्माता होता. माझी पहिली एकांकिका प्रकाशात आणली बबन प्रभूंनी. ती अतिशय गाजली आणि त्यानंतर झपाट्याने मी नभोवाणीसाठी श्रुतिका लिहू लागलो. माझ्यातला 'संवादलेखक' मला सापडला होता.

तरीही नाटककार व्हायचं स्वप्न मी पहात नव्हतो. मला नट व्हायचं होतं. निरनिराळ्या नाटकांतून मी लहानमोठी कामं करीत होतो. एकांकिकांचं दिग्दर्शन करीत होतो. रंगभूषा, प्रकाशयोजना, नेपथ्यसहाय्य. नाटकाच्या निर्मितीच्या प्रत्येक भागात मी जीव ओतून कित्येक वर्षे मेहनत करीत होतो. मला जाणीव नव्हती पण माझ्या नकळत माझ्यातला नाटककार कुठेतरी घडत होता. रंगभूमीवर प्रत्यक्ष वावरल्यामुळे आणि अनेक नाटकांच्या संहितांची लेखकांबरोबर चर्चा केल्यामुळे चांगलं नाटक लिहिण्याकरिता काय हवं आणि मुख्य म्हणजे काय नको ते मला समजत होतं. नाटकाच्या फॉर्मवरची माझी पकड हळूहळू घट्ट होत होती. तरीही आपण नाटक लिहावं असं माझ्या मनात कधीही आलं नाही.

नभोवाणीसाठी श्रुतिकांचं लेखन चालूच होतं. कमीत कमी शब्दात जास्तीत जास्त आशय व्यक्त करण्याचं सामर्थ्य मला नभोनाट्य लेखनाच्या अनुभवानं

दिलं. नभोनाट्य लिहिताना ते निव्वळ श्राव्य माध्यम असल्याने दृश्याची मदत मिळत नाही. परिणामी, श्रोत्यांच्या मनासमोर दृश्य तुम्हाला निव्वळ शब्दांतून उभं करावं लागत. हे एक वेगळं तंत्र आणि कौशल्य आहे. तेही मला अनुभवानं साधत गेलं. पुढं मी जेव्हा नाटकं लिहू लागलो तेव्हा त्याचा मला फार उपयोग झाला. नाटकामध्ये नाटक हे दृश्य माध्यम असलं तरीही रंगमंचाच्या मर्यादेमुळे तुम्ही साराच आशय दृश्य स्वरुपात दाखवू शकत नाही. काही घटनांची नॅरेशन्सही अटळ असतात. आणि ती कंटाळवाणी होण्याची शक्यता अधिक असते. नभो–नाट्याच्या अनुभवामुळे ही वर्णने चित्रमय शैलीत करून प्रेक्षकांच्या समोर त्याचं चित्र शब्दातून निर्माण करताना मला नाटकात कधीही कष्ट पडले नाहीत. माझ्यातला नाटककार नकळत घडत होता. पण तरीही तो नाटक लिहीत नव्हता.

एकोणिसशे सहासष्ट सालची गोष्ट. 'ललितकला साधना' नावाची आमची हौशी नाट्यसंस्था होती. हौशी रंगभूमीवर आम्ही सुविहित प्रयोग करीत होतो. दाद मिळवित होतो. त्या वर्षी आम्ही महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेत नवीन नाटक घेऊन उतरायचं ठरवलं. आम्ही अनेक प्रथितयश नाटककारांचे उंबरठे झिजवले. आम्हांला कुणी नाटक देईना. आम्ही निराश झालो. शेवटी आमचे दिग्दर्शक नंदकुमार रावते म्हणाले, 'तूच का नाही नवीन नाटक लिहित ? तुझे संवाद चांगले असतात. तू लिहून तर बघ. नाही जमलं तर बघू पुढे काय करायचं ते.' मला पटकन 'हो' म्हणायचा धीर होईना. पण मी कसाबसा कबूल झालो.

त्यावेळी मी 'फॅनी' नावाचा इंग्लिश चित्रपट पाहिला होता. त्या चित्रपटाचं कथानक मला अतिशय आवडलं होतं. यावरचं नाटक मराठीत करता येणं शक्य आहे असं मला वाटलं आणि मी माझं पहिलं नाटक लिहिलं, 'सागर माझा प्राण.'

मो. ग. रांगणेकर त्या सुमारास आकाशवाणीवरच होते. त्यांचा माझ्यावर लोभ. त्यांना मी नाटक वाचून दाखवलं. त्यांनी फार मोलाच्या अशा अनुभवी दिग्दर्शकाच्या दृष्टीतून सूचना केल्या. विजय तेंडुलकरांनी त्यातल्या काव्यमय भाषेबद्दल नाराजी व्यक्त केली. पण त्याच वेळी हेही सांगितले, 'तू तुला काय आवडतं किंवा प्रेक्षकांना काय आवडेल याचा विचार करू नकोस.' दिग्दर्शक नंदकुमार रावते यांनी त्यात थोडी काटछाट करून काही प्रसंग माझ्याकडून पुन्हा लिहवून घेऊन अखेरीस २५ ऑक्टोबर १९६६ रोजी 'सागर माझा प्राण' हे माझे नाटक रंगमंचावर आणले आणि मी (लोकांच्या दृष्टीने) नाटककार

झालो. महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेत ते नाटक अंतिम स्पर्धेसाठी निवडलं गेलं आणि अंतिम स्पर्धेतही त्याचा तिसरा क्रमांक येऊन त्याने अनेक बक्षिसे पटकावली. स्पर्धा संपली आणि पाच प्रयोगात ते नाटकही संपलं.

मी नवीन नाटक काही लिहायला घेतलं नाही. 'सागर माझा प्राण' ला मिळालेलं यश मी निव्वळ फ्लूक समजत होतो. पुढच्या वर्षीच्या स्पर्धेसाठी नाटक नव्हतं. पण दत्ताश्रय कापडी या निर्मात्यांनी माझ्या एकांकिकेवरून 'स्वर जुळता गीत तुटे' हे नाटक माझ्याकडून लिहवून घेतलं आणि मामा पेंडसे, भावना, दीनानाथ टाकळकर अशा गुणी कलाकारांच्या संचात ते व्यावसायिक रंगभूमीवर आले. या माझ्या नाटकाने मला मला थोडेफार नाव दिले, थोडेफार समाधान दिले पण नाटककार म्हणून मी यशस्वी होऊ शकेन असा आत्मविश्वास काही दिला नाही. समीक्षकांनी त्या नाटकावर फार चांगलं लिहिलं तरीही माझं पुरेस समाधान झालं नाही. कारण जेव्हा मी माझ्या त्या नाटकाकडे अलिप्तपणाने पहात असे तेव्हा त्यातल्या त्रुटी मला सूर्यप्रकाशाइतक्या स्वच्छ दिसत असत. 'सागर माझा प्राण' आणि 'स्वर जुळता गीत तुटे' ही दोन्हीही नाटके मी कुणाच्या तरी आग्रहाने लिहिली होती. स्वत:च्या ऊर्मीतून लिहिलेली नव्हती.

आणि त्यानंतर 'काचेचा चंद्र.' एका झपाटलेल्या अवस्थेत आंतरिक ऊर्मीतून अथक परिश्रम घेऊन लिहिलेलं नाटक. तो विषय ज्या क्षणी सुचला त्या क्षणी मी बेभान झालो. त्या नटीच्या शोकांतिकेनं मला अस्वस्थ करून टाकलं, दुसरा काही विचार सुचेना. एक चित्रपट आणि एक रंगमंचावरील भूमिका इतकंच मी तिला पाहिलं होतं आणि मग एक शोधयात्रा सुरू झाली. त्यासाठी अनेक मुलाखती, अनेक गाठीभेटी, अनेकांशी चर्चा यातून कथानक उलगडत गेलं. तिच्या आयुष्याचे अनेक पैलू नजरेस येत होते. तिच्या जीवनाची शोकांतिका अधिक अधिक गडद होत होती. कुणाला तरी भेटून आलो आणि एखादा प्रसंग कळला की त्या प्रसंगातला आशय समांतर प्रसंगात बसवून होईपर्यंत मला चैन पडत नसे. कधीकधी रात्री अपरात्री काहीतरी सुचायचं लगेच उठून ते लिहून काढायचं. निर्मितीचा आनंद काय असतो ते मी अनुभवत होतो. कित्येक प्रश्न तरीही अनुत्तरित राहात होते. त्यांची माझ्या कल्पनेप्रमाणे मी उत्तरं शोधीत होतो. मनासारखी उत्तरं मिळाली नाहीत की अस्वस्थ होत होतो. आणि मग पुन्हा विचार, पुन्हा माहिती गोळा करणं. उत्तरं मिळेपर्यंत.



अनुक्रमणिका

लागलं. मग आपोआप त्यांची पत्नी, मुलगा अमर, त्याच्या हातून चुकून बंदुकीची गोळी लागलेली मीरा, या व्यक्तिरेखा हळूहळू निर्माण झाल्या.

या मीराला एका शिक्षणसंस्थेत शिकायला ठेवलं असताना लेडीज हॉस्टेलचा सुपरिटेंडंट भानुदास तिच्यावर बलात्काराचा प्रयत्न करतो. त्यावेळी मीरा शील-संरक्षणासाठी त्याचा खून करते. मीरावर खुनाचा खटला भरला जातो आबासाहेबांचा मुलगा अमर एव्हाना वकील होऊन कोल्हापुरात प्रॅक्टिस करत असतो तो मीराचा कोर्टात बचाव करतो. स्त्रीने शीलसरक्षणार्थ केलेला खून क्षम्य मानावा हे अमर न्यायाधीशांना पटवून देतो. मीरा त्या खटल्यातून दोषमुक्त होते. अशा एकामागून एक घडणाऱ्या वेगवान घटना केव्हा लिहून झाल्या हे समजलं देखील नाही.

आता प्रश्न पडला. अमर आणि मीराचं लग्न तर व्हायला हवंय, पण काही गैरसमजुतीने या अगोदर जयमालेशी अमरचं लग्न झालेलं आहे. हा गुंता कसा सोडवायचा ? मग जयमालेला बाळंतपणात आजारी पाडण्याशिवाय गत्यंतर उरले नाही. ती मीराला बोलावून घेते. अन् बाळाला सांभाळ एवढं बोलून मान टाकते. इथेच कादंबरी संपते !

एखाद्या नवशिक्या किंवा नवप्रयत्नवादी कादंबरी लेखकाकडून यापेक्षा काही अधिक जरी अपेक्षित नसले तरी या कादंबरीत तत्कालीन (१९६०) सालचे ग्रामीण भागातील चित्रण, निसर्गवर्णने यांची अगदी रेलचेल झाली होती. पुरोगामी विचाराचे आबासाहेब थोरात देशातली जातपात नष्ट करण्याचा एक मार्ग सुचवतात. 'मी जर काही काळ या देशाचा सत्ताधीश झालो तर प्रथम एकच कायदा करीन. आपल्या जातीत लग्न करणं हा कायद्यानं दखलपात्र गुन्हा मानला जावा.'

आबासाहेबांच्या तोंडी मी हे वाक्य घातलं खरं, पण माझ्या पत्नीने मला ते वाक्य लिहिल्याबद्दल वेड्यात काढले. ती म्हणाली, निधर्मी राज्याचा डांगोरा पिटायचा ही राज्यकर्त्यांची धूर्त खेळी आहे. इलेक्शन्स जवळ आल्या की जाती अन् धर्मांच्या कुबड्या हातात घेऊन मतांची भीक मागणाऱ्यांच्या या देशात तुम्ही म्हणता असा कायदा कधीच संमत होणार नाही !'

ती म्हणाली ते एकाअर्थी खरेच होते. पण अजूनही माझी अशी भाबडी श्रद्धा आहे: या देशाला अखंड भारत बनवायचा असेल तर आपल्या जातीत लग्न करणे हा गुन्हा मानला जावा. दहा वर्षे हा कायदा राबवला तर हिंदू, मुस्लीम, जैन, ख्रिश्चन असले धार्मिक भेदाभेदच उरणार नाहीत. पण आता अनुभवाने पटू लागले आहे की आपल्या हयातीतच काय, पण येती कित्येक शतके असा

कायदा करण्याचे धारिष्टय कोणा नेत्याच्या अंगी असणार नाही ! असो. या कादंबरीचं नामाभिधान 'प्रलय' असं केलं ते माझे प्रकाशक श्री. चंद्रकांत शेटचे यांनी. आचार्य अत्र्यांना ती कादवरी अर्पण केलेली होती. आचार्य अत्रे काही समारंभाच्या निमित्ताने सांगलीला आले होते. कादंवरीच्या पहिल्याच पानावर छापलेली ती अर्पण पत्रिका.

'झुंजार साहित्यिक आचार्य अत्रे यांना.'

ती वाचून आचार्य गमतीने म्हणाले म्हणे, 'कोल्हापूरात एवढे लेखक असताना हा आणखी नवीन कोण निर्माण होऊ पाहतोय ?' बरं, मी वाचून तुम्हाला माझा अभिप्राय कळवतो, असे आचार्यांनी प्रकाशक शेटचे यांना सांगितले. मी काही सांगलीला गेलो नव्हतो. हा वृत्तान्त मला शेटचांनी कोल्हापूरात सांगितला.

आचार्यांचा अभिप्राय काय येतो याकडे आता माझे डोळे लागून राहिले होते. पण मला फार काळ त्या अवस्थेत राहावे लागले नाही. आठ दिवसांनी आचार्यांच्या 'मराठा' या दैनिकात मोठया मथळयाखाली 'प्रलय'वर परीक्षण आले. 'एक प्रभावशाली कादंवरीकार उदयास येत आहे. प्रलय, जिवंत व्यक्ति-रेखा, सजीव निसर्गवर्णने अन् वास्तववादी ग्रामीण पार्श्वभूमी !'

तो समीक्षा लेख स्वत: आचार्यांनीच लिहिलेला होता. तो वाचताना क्षणोक्षणी माझ्या अंगावर रोमांच फुलत होते. मला साहित्याच्या या दालनात हाताला धरून कोणीतरी आत घेतले आहे ही जाणीव होऊ लागली. अन् त्यानंतर मी झपाटल्यासारखा लिहू लागलो.

माझी दुसरी कादंबरी 'इन्साफ' ही एका फौजदाराच्या जीवनावर आधारलेली होती. ती त्यावेळचे मुख्यमंत्री वसंतराव नाईक यांना अर्पण केलेली होती. त्या कादंवरीवर चित्रपट निर्माण व्हावा म्हणून आचार्यांनी सिनेनिर्माते श्री. दत्ताराम चौगुले यांना कळवले व माझ्या परवानगीची वाट न पहाताच 'मराठा'त फोटोसह बातमी आली. आचार्य अत्रे यांचे 'इन्साफ' कादंवरीवर आधारित चित्रपटाला आशीर्वाद !

माझ्या पहिल्या दोन कादंवऱ्यांचे असे अनपेक्षित स्वागत झाल्यामुळे माझ्यात आत्मविश्वास निर्माण झाला. मला हे बऱ्यापैकी जमने आहे असे अगदी मना-पासून वाटू लागले. अन् मग गिर्यारोहण (श्वेतगिरी), रेस (अजिंक्य), खिसे-कापू तरुणी (सन्ना), संस्थानी जमाना (राजधानी), सर्कस (साकी), गुन्हेगारी (पाच नाजूक बोटं) अशा विविध विषयांवर आजपर्यंत मी साठ कादंबऱ्या लिहिल्या. पहिल्या तीस चाळीस कादंबऱ्यांच्या दोनदोन तीनतीन आवृत्त्या

झाल्या. काही जाणकार समीक्षकांनी माझ्या कादंबऱ्यांचे साहित्यिक मूल्य कोणते ? या लेखकाच्या कादंबऱ्या इतक्या लोकप्रिय का होतात याची चिकित्सा सुरू केली. काही हाडाचे दुष्ट समीक्षक होते. त्यांनी फारसे अनुकूल लिहिले नाही हेही तितकेच खरे. पण असे समीक्षक कोण आहेत याचे थोडेसे सखोल असे इन्व्हेस्टिगेशन केल्यावर आढळून आले की माझ्या लेखनाला उत्तेजन न देणारे हे समीक्षक एकेकाळचे पडेल कादंबरीकारच आहेत. असो

आता मात्र मी लिहायचा वेग थोडा कमी केला आहे. आता नोकरीतून निवृत्त झाल्यावर मी थोडा सॉमरसेट मॉम आणि अर्नेस्ट हेमिंग्वे वाचला. अन् मला वाटलं, साठ कादंबऱ्या लिहून मी आजपर्यंत उगाच माझी लेखणी झिजवली ! अर्नेस्ट हेमिंग्वे आणि मॉम यांच्यासारखं आपल्याला लिहायला येईल का हाच ध्यास आता लागून राहिलेला आहे. केवळ घटनाप्रधान साहित्य लिहिणे हे जसे अप्रगल्भ प्रतिभेचे लक्षण आहे, तसेच अतिकलात्मक लिहिणे हे दुर्बोधतेचे प्रतीक आहे असे मला प्राजंळपणे वाटते. साहित्य हे घटनाप्रधान आणि मनोविश्लेषणात्मक यांचा सुरेल संगम साधणारे असावे. तसेच ते वास्तवते-पासून फार दूर जाणारे नसावे. अन् यापेक्षा अधिक मोलाची वाटते ती वाचनीयता, रीडेबिलिटी. ही वाचनीयता ज्या दिवशी कमी होईल त्या दिवशी लेखणी खाली ठेवायची, असे मी ठरवून टाकलेले आहे.

( बाबा कदम, आनंद बालमंदिराजवळ,
ताराबाई पार्क, कोल्हापूर. )



अनुक्रमणिका

# मी बसलो कवितेशी खेळत !

– सविता पारिजात

मित्रवर्य,
शेजारी कभिन्नकाळा खडक
आभाळात रुप्याचं चांदणं
अन् मनात मात्र काळाकुट्ट अंधार.
तुमची माझी ओळख अहो तुहोची.
पण का कुणास ठाऊक ! वाटतं लिहावं. ओतून लिहावं.
कदाचित् ह्या माणसाला समजेल. आवडेल. तो काहीतरी सांगेल.
कॉलेजात असताना खूपजण असायचे.
तास ऑफ असायचे... कँटिन रिकामं असायचं.
कवितेची पानं फडफडायची.... अभिनंदन... टाळ्या.
कुणी फार जवळ आलं... डोळ्यातलं पाणी डोळ्यांनी पुसण्याइतपत.
कुणी दिलासा दिला. शब्दांची देवघेव झाली प्रेमाचीही.
चार–सहा वर्षाचा हंगाम संपला.

पाखरं दहादिशांनी गेली.
एकानं रंगमंच सजवला. जन्माचं नाटक करून.
एकजण गगनचुंबी आकाशमनोरे बांधून स्थापत्यविशारद बनला.
कुणी गोड गळ्याचं माणूस उसना आवाज देऊन रजतपटावर गेलं.
कुणी आकाशवाणीतून बोलायला लागलं.
जीवन देशाला वाहणारे भेटले.
काही भेटले ते रुपये आणे पैंच्या हिशेबात चोख.
त्यांना वाटलं नव्या नाण्यात रुपयाचे पैसे शंभर म्हणजे (१००–६४) ३६ पैशांनी फायदा. (गरीब विचारे!)

एका वोलघेवडी महाविद्यालयात शिरली. कँटिनमधल्या गप्पा प्लॅटफॉर्मवर मारायला. काल तर कुरकुरत होती 'ॲरिस्टॉटल्ची ट्रॅजेडी' समजायला कठिण जाते म्हणून !

एकजण गेला तो दर्यातच. चैतन्यासारखा. मोठमोठाल्या बोटींवर.

पंखहीन असून आकाशभ्रमण करणारेहां कोणी भेटले.

काही थोडे बसले कुरकुरत शा. मा. चा पट्टा गळयात पडला म्हणून

ज्यांनी वृत्तपत्राची वृत्ती पत्करली ते निवृत्त व्हायला धडपडले. कुणी रडलं. कुणी शोकसभा घेतल्या. कितीतरी अजूनही कुरकुरताहेत. तक्रार आहे त्यांची प्रत्येक बाबतीत.

अन् मी ?

मी बसलो माझ्या कवितेशी खेळत.

हायस्कूलमध्ये आम्ही दोघांनी भातुकली सजविली.

कॉलेजमध्ये आट्यापाट्या रंगल्या.

आज आलोय संसारापर्यंत.

तिनं नादी लावलं अन् कायमचं अस्वस्थ केल. समाधान तर देतच नाही.

दररोज म्हणते नव्याकडे चल. संध्याकाळ झाली की लगेच म्हणते जुनं झालं.

नैराश्याची आभाळं दाटून यायला लागली की अनुभूतीची क्षितिजं अंधारायला लागतात. थोडंसं रडावसं वाटतं. कित्येकदा वाटतं ओक्साबोक्सी

मन नाही तर नाही डोळे तरी स्वच्छ होतील.

निराशेनं भारलं की यशवंत लगेच म्हणतात तरुणांनी निराशेच्या आहारी जायचं नाही.

मनातला वाल्मीकी रामायणाची घाई करतो.

लपलेला कालिदास आषाढायला लागतो.

टागोर म्हणतात गीतांजलीकडं चल.

भव्याचा हव्यास घेऊन दिव्याकडं जावे तर प्रखर आकाशदेवाला बघायला डोळे अपुरे पडतात.

अनुभूतीची झोळी मधेच फाटते अन मग प्रतिभेची माधुकरी विस्कटते चारही दिशांनी

मधेच कीर्ती एखाद्या वारयोषितेसारखी धावत धावत येते.

एक ओळीच्या पत्रातनं 'मस्ताड' कवितेची मागणी येते.
दिवाळी अकांनी घर भरतं वृत्तपत्राचे कोने भरभरून वहातात.
भरल्यासारखं वाटतं अन शेवटी रिकामंच रहातं.
किती लिहायचं ?
दीड इंचाच्या डोळ्यांनी असीमावर नजरा रोखायच्या ?
मूठभर मनानं अमाप आभाळाला जवळ करायचं ?
जे सापडत नाही ते शोधायचं.
पळत पळत पाठीमागं धावायचं.
अन् पाय दुखायला लागले म्हणजे थकलो म्हणून परतायचं होय !
काय करायचं ?
थोडंसं निराशून जावं तर वर्डस्वर्थची ल्युसी आडवी येते.
काव्यवाचनानंतर स्वाक्षरीसाठी येणाऱ्या छोकरीसारखी अर्ली ड्रीम्सना डायव्होर्स देणारा वायरन मनाला सांगतो की वी स्टिल ऑर ब्रेक. डेड शेफर्डचं प्रेम नाजूकपणे रंगवणारा शेक्सपियर प्रथम नजरानजरीतला प्रेमाची मजा सांगतो. अन् मग पुन्हा मन समाजात यायला लागतं. कसं तरी कुठं तरी उपजीविका म्हणजे जीविका शिक.

परिस्थितीतल्या झंझावातातलं मन आता मोठ्ठं झालेलं असतं. आता नाही ते हॉटेलातल्या कपवशा विसळत. प्रिन्सिपॉलच्या हपिसशेजारी नादारीसाठी उभं रहाणं नको असतंय त्याला,
कुठंतरी मास्तर होतय् ते किती आनंद असतो तियंही. सत्याचं वय पाच सहा. शिवाचं दहा बारा आनं सुंदराचं पंधराच्या आत. सोळा सव्वा-सोळा. साडेसोळा नाही लालशाईन चुका दाखवत ते स्वतःकडं बघतं. नीतीचा केवढा मोठा चष्मा असो तियं जाड भिंगांचा.
परीक्षा होते. पर्यवेक्षक होते ते किती बारकाईनं निरीक्षण करीत !
जून उजाडतो त्याला वाटतं पुरे झाली ही तांबडी शाई ! आपली शाई निराळी आहे.
त्याचा राजीनामा जातो अन् पाणावलेले असंख्य डोळे वहायला लागतात 'सर तुम्ही जाऊ नका.'
भुरंकन् उडत ते गुलाबी वाड्यात शिरतं.

रुपेरी पडद्याची चंदेरी वाट.

सोन्याच्या नदीला हिऱ्याचा घाट.

कावळा डायरेक्टर असतो, चिमणी प्रोड्युसर.

कोकिळेला असतो भाव, मोरावरोवर लांडोरही नाचणार. (मोराची मर्जी म्हणून )

गाढवाला तर मुद्दाम आमंत्रण, कारण ते संगीतातल दर्दी ! माकड ॲक्शन्स देणार

वगळ्याला सगळ्यात जास्त किमत.

त्याच्याकड असते सोन्याची गंमत.

मैफल वसते मन लिहायला लागतं.

वा ! वा एकदा आणि वहाव्वा एकदा. छान ! फार छान ! शंभर नव्हे, एकशे एक टक्के. पण—पण काय ?

थोडंसं सेक्स अपील पाहिजे. तिचा पदर पाडा, आणखी खाली पाडा, आपण असं म्हणू ' पदर ढळतसे खाली ' काय सेक्सअपील आहे ?

' मी लग्नाची वाइल तुमची घरात न्हाती धुती.
सांगा व्रगू चोलिचं पैसं किती ?'

वा ! वा ! वाहव्वा !

'असली कसली पब्लिक दादा चार आन्यामंदि घालते शीळ ?
गोरी मडुम वाल्कनीतली, सजनासकट खुषीत वसली,
तिची वसे दातखीळ.'

वहोत अच्छा

चांदीचं तवक, मसाला पान, फस्ट क्लासनं जा. नमस्ते.

पुन्हा मन कचरतं कसा लिलाव होतो त्याचा ? थंड

पुन्हा थंड. मध्येच सरकारचं फॅमिली प्लॅनिंग व्याख्यान. सभा. टाळ्या.

शेवटी शेवटी ते ओक्साबोक्सी रडायला लागतं.

सगळं सोडून, मग आईलेकीची गोष्ट ऐकत वसतं.

श्रावणाच्या सरीत भिजतं आणि असं विनडोक होऊन लांवच्या माणसाला लांव लांव पत्र लिहितं.

शेजारी कभिन्नकाळा खडक. आभाळात रुप्याचं चांदणं अन् मनात मात्र काळाकुट्ट अंधार.

ते म्हणतं, बे दुणे तीन तरी म्हणा नाहीतर पाचतरी. अन् लोक करतात

कांगावा ते बुद्दू आहे. अव्यवहारी आहे. वेअकली आहे. तिरकस बेरीज करूनही वे दुणे चारच. मग पुन्हा वैताग. खेद.

ते जगायला राजी नसतं. काल जे झालं तेच उद्या होणार म्हणून किती चिडतं ते.

सगळ्याकडे हे असंच असते.

आंधळी न्यायदेवी आंधळी कोशिंबीर खेळते.

न्यायाच्या राज्यात दयेचा अर्ज. अन् पुन्हा फाशीला जन्मठेप.

देवळातली घंटा धुपारती करून पुन्हा थंड होणार अन् चर्चमधली घंटा कुठवर वाजणार ?

जोवर जमतील ख्रिश्चन चार-बायबल वाचून झालं रे झालं. पुन्हा थंडगार.

मधेच थोडासा प्रकाश पडेल लावलेल्या मेणबत्तीचा !

मशिदीतला नमाज मशिदीत छान.

दारातला सब्जा मात्र तुळशीशी भांडतो

कुणाची काळजी कुणी करायची ?

मनाचं मन ( ह्याला मनाची आई म्हणूया का बाप? ) मनाच्या मनाचं मन ( ते आजोबा ? ) म्हणतं. तू नको करूस काळजी. पाप पुण्याकडं चाललंय

आधी भरले पापाचे रांजण

मग उमगली क्रौंचाची व्यथा

वाल्या कोळ्याचा वाल्मीकी झाला. रक्ताच्या शाईत रामाची कथा

तुला आवडली मला आवडली

दोघांनी मिळून पसापसा अश्रू ढाळले.

विडीचं थोटूक सोन्याची चोरी

बापाच्या मरणात मुलगा बिनघोरी

सत्याचा वारा झोडपून गेला. अहिंसेची वावटळ झाली. महात्मा झाला शांतीदूत झाला. जगाला त्यानं दीक्षा दिली.

तूही गातोस मीही गातो त्याचं नाव. त्याचं भजन 'रघुपति राघव राजाराम'

केलं काय ? झालं काय ? पश्चात्ताप त्याचं नाव

आपण आपले जगू मरू ( मला हे पटत नाही )

तुला मला नकोय चिंता ( मग कुणी करायची )

जग जातंय सत्याकडं . . शिवाकडं.

पाप जातंय पुण्याकडं.

मग मी म्हणतो शाप देऊनही इंद्र निर्लज्जच नाही का राहिला ? अजूनही इंद्राचा कावळा अहिल्येला शिवतोय अन् ती दगड होतेय.

मित्रवर्य, तुम्हीच सांगा. का असं वेड्यासारखं होतय ते ? क्षणभर ह्या खडकांवर वसू बोलू. तुम्ही बोलाल की नाही माझ्याशी ? की तुम्हाला काम आहे खूप ?

मी तरी किती खुळा !

तुम्ही मला किती पुराल ?

पुरं करतो.

पत्र तुम्हाला पाठवायचं म्हणून लिहिलय. पण पोस्टात पडेपर्यंत त्याची शाश्वती नाही. कदाचित माझ्याच हातून उद्या सकाळपर्यंत त्याचे तुकडे होतील. कदाचित ते तुम्ही वाचाल.

अस्तु. वाचा आणि ?

फॉर्म्यलिटी म्हणून नको आपल्याला. पण एखादं उत्तर धाडा. कार्ड नको कारण ते वाचायला सुरुवात करण्यापूर्वी संपतं. कचेरीत वसून उत्तर नका लिहू. कारण त्यावेळी तुमच्यात संपादक असतो. दीड ओळीचा पत्रव्यवहार करणारा.

लिहा असेच. मनाचा दर्या उफाळला. विचारांचे मेघ आले. अन त्यात माझी आठवण आली की

तुमचा
सविता पारिजात
(१२३७ ख, ए वॉर्ड, कोल्हापूर ४१६ ०१२)

# कोल्हापूरचं पाणी

**– आनंद यादव**

कागलला रात्री जाऊन पोचलो होतो. दादा वस्तीला जायच्या बेतात होता. सोप्यात बसून चिलीम ओढत होता. मी आल्याचं कळताच आईही बाहेर आली. शिवा, हिरा सुंदरा, लक्ष्मी, आप्पा पटापटा गोळा झाली.

'मला पुण्याच्या 'रेडिओकेंद्रावर नोकरी लागली !' मी मोठ्यानं उद्गारलो.

'बरं झाल बाबा. आमची पंढरी आता पिकलं. भोगलास ते सगळं सुफळ हुईल' आई बोलली.

'बरं झालं ! कालिजाच्या शिक्षणाचं काय करणार आता ? का सोडून देणार ?' दादानं विचारलं.

'न्हाई ते कडंला न्हेणार. नोकरी बघत बघत पुण्याला शिकणार.'

'हे ब्येस हुईल.' दादा हसतमुखानं बोलला. त्याला खुशी वाटली

'पण हितनं लई लांब की. 'शिवाचा काहीसा काळजीचा प्रश्न.

मी त्याची काळजी ओळखली. 'एकशेपासष्ठ मैलांवर हाय. कोल्हापुरातल्या-सारखं आता मला वरचेवर घराकडं यायला हुणार न्हाई. दर आठवड्यातनं दोन दीस मंगळवारी नि शुक्रवारी रात्री पावणेआठ वाजता माझा आवाज कागलातल्या कुणाच्यावी रेडिओवर ऐकायला मिळंल. मी रेडिओवरतं बोलणार हाय. शेतकीच्या प्रश्नांची उत्तरं देणार हाय. ती ऐकताना सगळ्यास्नी वाटंल दादा घरातच हाय. मळ्यातल्या कामाचं बोलत बसलाय. म्हंजे कोल्हापुरातल्या-पेक्षा जास्त वेळ तुम्हास्नी भेटणार'

'म्हंजे तू तिथं बोललेलं आम्हांनी हितं कागलात ऐकायला येणार?' लक्ष्मीनं डोळं मोठं करून विचारलं. कविता वाचनाच्या कार्यक्रमाच्या वेळी तिला काही कळलं नव्हतं.

' मग ? आता बघच तू. सदू घाटग्यानं रेडिओ आणलाय. तिथं जाऊन ऐका नि बघा की माझा आवाज येतो का न्हाई ते.'

'पगार किती मिळणार तुला ?' दादानं मुद्याचं विचारलं.

'ते अजून ठरलेल नाही. तरी दोनसवादोनशे तरी मिळंल.'

'सव्वा दोनशे ?'

'हां !'

'म्हजे किती इसा झालं ?'

'अकरा इसा झालं. म्हंजे जवळजवळ बघ चारपाच गडी माणसांचा रोजगार मला म्हैन्याला पडणार'

'आर त्येच्या बायली ! म्हंजे सायवाचाच पगार झाला !'

दादा अजून मनानं साहेबाच्या राजदटीत रेंगाळत होता. त्याला विसाच्या पुढं मोजता येत नव्हतं. मोजताना गोंधळ उडे. त्यामळं 'त्रिसा' च्या पटीत बोलत असे. पैसे मोजतानाही इसावर एक, इसावर दोन असाच मोजो. पाच इसांचा शंभर, दहा इसांचं दोनश हे त्याला कळत होतं.

खूप गप्पा झाल्या. 'दादा आता सायब हुणार' असं भावंडांना वाटू लागलं. ती उमलल्यागत झाली. हे सगळ मी बी ए. पर्यंत शिकत गेल्यामुळं झालं, याचा दादाला पडताळा आला आईला सुखाचं दिवस येतील, असं वाटू लागलं.

संक्रांत आधल्या दिवशीच होऊन गेलेली. मी पिशवीतनं पुण्याचे मोहरदार तीळगूळ आणले होते. संक्रांत पुण्यातच साजरी करावी लागल्यानं खरेदी केले होते. सगळयांचं तोंड गोड करायची इच्छा होती संक्रांतीचा फायदा घेतला नि सगळयांना तीळगूळ वाटले.

रात्री बराच वेळ दिवसा गप्पा माराव्यात तसे बोलत बसलो झोप, कंटाळा येत नव्हता. सगळयांना लख्ख उजाडल्यासारखं वाटत होतं घरापुरता सूर्य उगवला होता

हिरा दिवाळीला म्हणून आलेली. नंतर तिला कुणी बोलवायला सासरचं आलंच नाही. तिच्या नवऱ्याच्या मनात तिला नांदवावं असं दिसत नव्हतं. घरात हिरा सगळयाबरोबर राबून खात होती. तरीही आईला वाटत होतं तिचा संसार तेवढा उभा राहावा, तिला मूलबाळ व्हावं ती मार्गी लागून तिचा बायकाचा जन्म सार्थकी लागावा.

धोंडूचं लग्न झालं असल्यानं आता सुंदराच्या लग्नाची पाळी आली होती. तिच्यासाठी अधनंमधनं 'जागा' येत होता पण कुणी कामगार, कुणी गवंडीकाम करणारा, कुणी मालगडी तर कुणी दुसऱ्या लग्नाचा, अशी तऱ्हा म्हणून मी

विरोध करत होतो.

घरात सुंदरा सगळ्यात देखणी उजळ गुलाबी रंगाची. रेखीव नाक, काळेभोर डोळे, तांबूस ओठ, तब्येतीनं दणकट तिला चांगला जागा येईल, अशी मला आशा होती म्हणून आईनं घाई करू नये, असं वाटे

मळ्याच्या काळजीनं आणि वाट्टेल तसं आंबट खाण्यान दादाला अल्सर झालेला. पोटात अधनमधनं भयानक कळा करत होत्या. ऑपरेशन करण्यासाठी डॉक्टरानं सांगितल होतं. गोपातात्यानंही अल्सरचं ऑपरेशन करून घेतलेल पण दादाला ऑपरेशन करून घेण्याची भीती वाटत होती. कदाचित कुणाचं तरी ऑपरेशन होई तेही मोठ्या पैसेवानांच्या घरी. गोरगरिबाला ते कधी परवडत नव्हतं तरीही गोपातात्यानं बायकोचं दागिन विकून ऑपरेशन करून घेतलेलं. आमच्या घरात तसं काही नव्हतं.

'आपरीशन नगं खर्चा झेपणार न्हाई. केलं तरी मी कायमचा अधू होऊन बसीन. 'मला दृष्टान्त पडलाय, दृष्टान्तात मला सांगितलंय दातवण खा म्हणून. दातवणान माझा रोग हळूहळू बरा हुईल.' दादानं उत्तर दिल होतं.

तो नेमानं दातवण खाऊ लागला होता. त्याच्या श्रद्धेला कुणीही हात घालू शकत नव्हतं.

पुष्कळ वेळा घराला उसन्या पैशांची गरज पडे. इकडतिकडचं उसनवार आणावं लागे. आता आपण घरापासनं दूर जातोय.

गावातले सगळे मित्र आता आपआपल्या ताग्याला लागलेले गरिबीमुळे न शिकलेले मजुरी करत होते. काही आपआपल्या शेतावर राबत होते. कुणी सातवी होऊन शाळा सोडल्या होत्या नि शिक्षक, कारकून, सुपरिटेंडंट, पोलीस झाले होते. कुणी इचलकरंजीला पॉवर् मागावर गेले होते. कुणी ड्रायव्हर, क्लीनर झालेले. आवाजी तुकारामसारखे कुणी एस एस सी न झाल्यामुळं घरच्या उद्योगधंद्याला लागलेले.

ब्राह्मण गल्लीतले सगळे मित्र पुढं कॉलेजात शिकत होते. एस. एस. भोसले तेवढा माझ्यासारखा गरिबीवर मात करत, धडपडत कॉलेजात शिकत होता. वडिलांमागे त्याची आई नि त्याचे मामे यांनी त्याला भरपूर शिक्षण देण्याची जिद्द बांधली होती. भोसलेची हुशारी त्यांना साथ देत होती. बाकीच्या सगळ्यांनी जागोजागी योग्य स्थळ बघून मुक्कामाच्या मेखा मारल्या होत्या. बहुतेक सगळ्यांनी लग्नं केलेली. संसाराची मांडामांड केलेली. घरादाराचा

आधार होऊन खांबासारखे उभे राहिलेले.

मी मात्र पुढं चालला होतो. ऐन पंचविशी सुरू झालेली. पुण्यात नोकरीचा जम बसला तर तिथं मुक्काम पडणार होता. चाकोरी रुळली तर शहरवासी होणार होतो. घरापासून, गावापासून कदाचित कायमचा दूर जाणार होतो. शिक्षणानं मी खेड्याला घनिष्ठपणे जोडणार होतो की शहराला शरण जाऊन पांढरपेशीपण पत्करणार होतो ? मातीला माझ्यात सामावून घेणार होतो का उसळी मारून शहरी हवेल्यांत अंतराळी फिरणार होतो ? . . या प्रश्नांची उत्तरं काळाशी दोस्ती करीत माझी मलाच शोधायची होती.

सकाळी कोल्हापूरला आला. वरीच निरवानिरव करायची होती. आलो नि उद्योगाला लागलो.

प्राध्यापकांना भेटून निरोप घेतला.

राजाराम कॉलेजच्या मराठी एम. ए. सेंटरचे प्रमुख प्रा श्री. शं. खानविलकर होते. त्यांना वस्तुस्थिती सांगणं जरूर होतं. ज्युनिअर एम. ए. ची परीक्षा कॉलेजच घेणार असलं तरी जानेवारीचा पंधरवडा नि फेब्रुवारी सगळा महिना मी गैरहजर राहणार होतो. मार्चमध्ये अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानं सुट्टी पडणार होती. परीक्षाही साधारणपणे मार्चच्या नऊदहा तारखांना होऊन जात होत्या. म्हणजे दीडएक महिना अनुपस्थित राहण्याची परवानगी काढावी लागणार होती; नाही तर फॉर्म भरताना अडथळा आला असता. म्हणून प्रा. खानविल–करांना गाठलं. नोकरीची बातमी सांगितली. बाकीच्या प्राध्यापकांना माझ्या रेडिओवरील नोकरीचा आनंद झाला होता. रेडिओवर अधिकारी म्हणून जाणं ही सर्वांना सुवर्णसंधी वाटत होती अतिशय दुर्मिळ जागेची ती प्राप्ती वाटत होती. सांस्कृतिक प्रबोधनाचं ते एकमेव महत्त्वाचं माध्यम होतं.

पण प्रा. खानविलकर मात्र उखडले. म्हणाले, ' तू जा, खुशाल नोकरी कर. पण तुझी इथं अनुपस्थिती लागेल. परिणामी तुला परीक्षेला बसता येणार नाही. टर्म ग्रँट होणार नाही '

त्यांची खूप मनधरणी केली. पण ते ऐकेनात. ते सूचकबोचक बोलू लागले. मग माझ्या लक्षात आलं की त्यांचा माझ्यावर राग आहे. लेक्चरच्या तासाला ते अवांतर गप्पा खूप मारायचे. विषयाला मनापासून कधीच हात घालायचे नाहीत स्वतःविषयी अव्वाच्या सव्वा बोलायचे. काटकसरीनं आणि गांभीर्यानं वेळ वापरणाऱ्या माझ्यासारख्याला तो वेळ वाया चालला आहे, असं मनापासून वाटायचं. त्यामुळं मी त्यांच्या तासाला अस्वस्थ होऊन जाई. मित्राकडं बघून

क्वचित हसत असे. हेतू असा की सरांच्या ते लक्षात यावं आणि ते शिकवण्याच्या विषयाकड वळावेत. अधनंमधनं त्यांच्या 'थापा नि गप्पा' मारण्याच्या प्रवृत्तीची वर्गांत चर्चाही केली गेली होती अनेकांना त्यांच्या या गोष्टी आवडत नसत. पण केंद्रप्रमुख असल्यामुळ सगळ्या विद्यार्थ्यांच्या शेंड्या त्यांच्या हातात होत्या. त्यामुळं कुणी बोलत नसत. तरीही कुणीतरी या गोष्टी त्यांना सांगण्याची गरज होती, म्हणून मी डॉ. भिगारे यांच्या कानावर या गोष्टी घातल्या. त्यांच्या एकूण शिकविण्याविषयी बोललो त्यांनी ती त्यांच्या कानावर एकदा घातली होती- एकदा सणक येऊन धीटपणानं मी कधी नव्हे ते 'थापांचा तास' असं त्यांच्या तासाअगोदर येऊन फलकावर लिहिलं होतं. एकदोघांनी ते पाहिलही होतं हे मगळं कोण करतंय हे त्यांच्या कानावर गेलं असावं म्हणून त्यांनी अगोदरच 'तुला परीक्षेला बसता येणार नाही' अशी वॉर्निंग मला स्पष्टपणे दिली

मी ही सगळी वस्तुस्थिती डॉ भिगारे यांना सांगितली. भिगारे सर खमके होते ते म्हणाले, 'तुझा तू रेडिओवर नोकरीला जा अभ्यास मात्र कर पेपर्स उत्तम लिहिले पाहिजेस ज्युनिअरच्या परीक्षेला येऊन बैस त्या अगोदर मला एक पत्र पाठव पुढची सगळी व्यवस्था मी करतो तू काही काळजी करू नकोस. खानविलकर माझं कसं ऐकत नाही ते बघतो. तू निश्चित मनानं जा'

मला धीर आला नि मी नमस्कार करून बाहेर पडलो

सध्याकाळी सहाच्या सुमाराला व. ह. पिटके यांच्या बरोबर रंकाळ्यावर फिरायला गेलो. रंकाळ्यावर जाईपर्यंत त्यांना पुण्याच्या मुक्कामात काय काय घडलं ते सविस्तर सांगितलं

रंकाळ्याच्या पूर्वेच्या कठड्यावर येऊन बसलो. पश्चिमेच्या टोकाचा रम्य शालिनी पॅलेस स्वप्नासारखा दूरस्थ, गूढ, धूसर प्रकाशात अस्पष्ट, मोहक दिसत होता. त्याचं त्याच्याहून सुंदर प्रतिबिंब तलावात पडलेलं. माझ्या खोलवरच्या मनातलं काहीतरी संगमरवरी जिथं आकारलंय असं क्षणभर वाटलं.

बोलता बोलता पिटक्यांनी मला प्रश्न विचारला. 'यादव पूर्वीपासनं तुम्ही म्हणताय की वाङमयाच्या क्षेत्रात तुम्हाला काही तरी करून दाखवायचं आहे. आता तर तुम्ही ऐन पंचविशीत आहात व्यंकटेश माडगूळकर, रणजित देसाई हे तर त्यांच्या ऐन पंचविशीपासून कथा प्रसिद्ध करू लागले नि पंचविशीत त्यांचे कथासंग्रह प्रसिद्धही झाले. म्हणजे या वयात त्यांच्या समोर 'आपण काय करणार आहोत' हे स्पष्ट झालेलं होतं तसं तुमच्या मनासमोर कोणतं चित्र



अनुक्रमणिका

आहे ? निदान त्याचा कधी तुम्ही विचार केलाय की नाही ?'

'प्रश्न अवघड आहे पूर्वी तुम्ही हा कधीच विचारला नाही. तसा विचारला असतात तर त्याचा अगोदरच विचार करून ठेवला असता नि आता सांगितल असत.'

'हा प्रश्न आत्ताच विचारला, याचं कारणही तसंच आहे. तुम्ही आता पुण्याला जाणार तुमच्या नोकरीचं ऑफिस हे मराठी साहित्यिकांच्या भेटीचं केंद्र असल्यासारखं आहे तिथ तुम्ही रमणार; म्हणजे तुम्हीं पुणेकर होणार. तिथं भेट ाऱ्या ज्येष्ठ मंडळींच्या संस्काराखाली जाण्यात फायदा आहे आणि एक धोकाही आहे त्यांच्याशी बोलताना, चर्चा करताना निश्चितपणे त्यांचे संस्कार तुमच्यावर होणार तो फायदा आहे पण ते सस्कार फारच जास्त झाले तर तुम्ही त्यांच्या अनुकरणात सापडाल आणि स्वत्व गमावून बसाल म्हणून म्हणतो तुमच स्वत्व तुमच्या मनाशी आधीच स्पष्ट झालेलं असाव तसं ते आहे की नाही, हे विचारण्यासाठी प्रश्न विचारला.'

पिटकर्यांच्या या बोलण्यानं मी गडबडून गेलो. मी असा विचार कधी केला नव्हता. मला फक्त पुण्याचे फायदे दिसत होते. त्यातला धोका कळला नव्हता. त्यांना अडखळत म्हणालो, ' तुम्ही म्हणताय त्या धोक्यापासनं मी सावध राहीन.'

'नुसतं सावध राहून भागणार नाही. तुमच्या व्यक्तिमत्त्वाचं वेगळेपण, तुमचा जीवनविषयक दृष्टिकोण या गोष्टी तुम्हाला एक साहित्यिक म्हणून शोधाव्या लागतील. नाहीतर नुसतेच लिहित राहाल, त्याला काही अर्थ नाही लेखन वेगळेपणानं उठून दिसण्याची गरज आहे. त्यासाठी तुमच्या आसपास जे लेखन करतात त्यांच्या लेखनाचा डोळसपणानं अभ्यास करण्याची गरज आहे.'

माझ्या वाचनातून तो होत असावा. पण मी आता तो अधिक जाणीवपूर्वक करीन. चांगल्या लेखकांचं साहित्य कसून वाचत जाईन. माझ्या वेगळेपणाविषयी माझ्या जाणीवा तुम्ही म्हणताय तशा अजून जागृत आणि सावध झालेल्या नसल्या तरी काही गोष्टी मनाशी स्पष्ट आहेत. एक तर माझं व्यक्तिमत्त्व हे खास माझंच असणार. त्याची मी नीट अभ्यासपूर्वक जोपासना केली तर माझ साहित्य वेगळं होईल'

'वेगळं म्हणजे नेमकं कुठं, कसं ?'

'ते अजून माझ्यासमोर स्पष्ट नाही. हळूहळू आता मी त्यावर विचार करतो; म्हणजे मग ते कुठं कसं वेगळं होऊ शकेल, याची मनाशी स्पष्टता होईल.' मी अटकल्यागत झालो. पुढं काहीच बोलायला सुचेना. म्हणून धाडकन म्हणालो; 'पण मी माझा प्रदेश, तियली माणसं, माझ्या परिसरातील ग्रामीण संस्कृती

टिपणार आहे. तिचं जे काही वेगळेपण असेल ते साहित्यात येईलच की. माझी खरी प्रेरणा केवळ वेगळेपण एवढीच नाही. त्याच्याबरोबर मी जे अनुभवतो आहे, ते मळे, शेतं, माती, माणसं, त्यांच्याविषयीचं माझं चिंतन, हेच आज तरी मला महत्त्वाचं वाटतं "

" ते ठीकच आहे. तो वेगळेपणा प्रत्येकाच्या साहित्यात असतोच. तसं पाहायला गेल तर आपलीच एक कथा आपल्याच दुसऱ्या कथेपेक्षा काही प्रमाणात वेगळी असते. पण हे वेगळेपण तसं महत्त्वाचं नसतं. आपलं वेगळेपण हे खास महत्त्वाचं वेगळेपण असलं तरच लेखक साहित्याच्या क्षेत्रात उभा राहू शकतो. मग ते जीवनाचं असो किंवा साहित्यिक गुणधर्माचं असो.."

बराच वेळ मिणमिणत्या बल्बच्या उजेडात बोलणी चालली होती. गप्पा मारत मारतच परत जायला निघालो.

पिटक्यांच घर आल्यावर त्यांचा निरोप घेतला. 'आजच्या गप्पा फारच चांगल्या झाल्या. कधी विसरू शकेन असं वाटत नाही आणि तुमच्या प्रश्नाचं उत्तर शोधल्याशिवाय चैनही पडेल असं वाटत नाही. आता मी उद्या पुण्याला जाणार. मी पत्रं पाठवत जाईनच. तुम्हीही पाठवत चला.'

' जरूर, पुण्यात गेल्यावर तुम्हीही आम्हांला विसरू नका कोल्हापूरला विसरू नका. विसरलात की तुमच्या पतंगाची दोरी तुटलीच म्हणून समजा.' ते खळखळून हसले.

मुळीच विसरणार नाही म्हणत मी त्यांचा हात हातात घेतला.

एरव्हीही गप्पा होत. पण या बोलण्यामुळं मी ढवळून निघाल्यासारखा झालो.

साहित्यनिर्मिती करणं काही साधी गोष्ट नाही. उचलली लेखणी की लावली कागदाला. हे काही साहित्य नव्हे. प्रत्येक गोष्टीचा छडा लावला पाहिजे. उलटसुलट आपणच आपली तपासणी केली पाहिजे. तर काही हातून होईल. नाहीतर मजकूर खरडलेल्या कागदांच्या थप्प्या म्हणजे आपलं साहित्य होईल. मी बोर्डिंगवर परतलो. विचारांचा खेळ मनाशी सुरूच होता.

सकाळी लक्ष्मीपुरी स्टँडवर निरोप द्यायला कमलाकर दीक्षित, ज. वा. जोशी, एल. बी. रायमाने आले होते. गोखले कॉलेजमधनं एम. ए. मराठीला बसणारा एकटाच होतो. त्यामुळं ज्युनिअर एम. ए. च्या अभ्यासाला लागणारी बरीच पुस्तकं मी घेतली होती. पत्र्याची ट्रंक जवळजवळ त्यांनीच भरली बरोबर वळकटी, कपडे नि लेखनाच्या ताज्या वह्या एवढं सामान घेतलेलं.

जोशी–दीक्षित पुण्यातील रेडिओ अधिकाऱ्यांचं माझं काल्पनिक चित्र रेखाटत खट्याळपणा करीत होते मी मोठा अधिकारी झाल्यावर जोशी–दीक्षित यांना कसा जुमानणार नाही, ओळखही दाखवणार नाही, याचं काल्पनिक प्रसंग सवादरुपानं रंगवत होते. मी उत्साहानं ऐकत होतो मनोमन फुलून येत होतो.

गाडीची वेळ झाली.

गाडी सुरू झाल्यावर दीक्षितांनी शेवटचा विनोद केला.

'साहेब, गरीब कोल्हापूरकरांस्नी इसरू नका कधी आलो तर वळख ठिवा. पत्तर पाठवा.'

'व्हय व्हय कोल्हापूर तेवढं इसरू नका बरं.' जोशी. गाडी हलली.

कोल्हापुरातील माझा शेर संपला. भिगारे, गं वि. कुलकर्णी यांचा सहवास आता संपल्यातच जमा. एस एस. के. तर अगोदरच अमेरिकेला निघून गेलेले. ही तीन दैवतं म्हणजे माझ्या देव्हाऱ्यातील दत्तात्रेयाची सुंदर मूर्ती. यांनी आंबट आंब्याची अढी घातली नि मला पिकवण्याचा प्रयत्न केला.

भिगारे सर शांतपणे, वैचारिक पद्धतीनं विषयाची मांडणी करीत एखाद्या घटनेचा विचार इतक्या खोलात जाऊन, इतक्या विविध अंगांनी करता येतो, याचा मला सतत अनुभव येत होता. मराठी गद्य ते शिकवीत. त्यांचं शिकवणं बुद्धीला तल्लखपणा आणी.

गं. वि. कुलकर्णी संस्कृत शिकवीत. कालिदासाचं 'अभिज्ञान शाकुन्तलम्' ते शिकवीत. भिगारे सरांची प्रकृती दणकट तर कुलकर्णी सरांची प्रकृती कृश. त्यांच्या चेहऱ्यावरचं तेज लक्ष वेधून घेई. त्यांच्या हातांच्या हालचालीही लक्ष वेधून घेत. त्याचं कारण वेगळं होतं त्यांच्या दोन्ही हातांना सहासहा बोटं होती एकएक करंगळी जादा. शिकवण्यात बुद्धीच्या तेजापेक्षा भावनांचा गोडवा नेहमी अधिक जाणवे. रसाळपणे कवितेचा आस्वाद घेत, प्रसंगातील नाट्य उकलून दाखवत, काव्य खुलवत ते शिकवीत. दृष्टी सात्विक, आध्यात्मिक होती त्या अंगानं ते साहित्याचं चिंतन मांडत. भिगारे सर तर्कनिष्ठ नि आक्रमक वाटत.

तर्कशास्त्र शिकवायला एस. एस. के. सर होते. ते दिसायला साधे पण बुद्धीची झेप दांडगी विद्यार्थ्यांच्या मनावर कोणत्याही प्रकारचा ताण न आणता हासतखेळत शिकवण्याची त्यांची हातोटी. तास कमी असल्यानं पुढं सांस्कृतिक इतिहासही तेच शिकवू लागले.

परिचय वाढत गेल्यावर मी प्रा. गं. वि. कुलकर्णी यांच्या घरी जाऊ लागलो. घर अतिशय स्वागतशील. त्यामुळं वरचेवर जाई. संध्याकाळ छान जात असे.

सरांना कवितेची आवड. स्वतः ते 'रसगंगाधर' या नावानं कविता करीत. त्यांच्या घरी श्याम कुलकर्णी, गोविंद जोशी हे तरुण कवी येत त्यांची कवितेची मैफल जमे. वाचनाच्या फेरी झडत. कवितेवरच गप्पा होत. कविता करण्यास मनात वातावरण तयार होई. पुष्कळ वेळा सरांच्या बरोबर फिरायला जात असे. सरांना निसर्गाचं सान्निध्य, मोकळी हवा विशेष आवडे. ते मोठमोठ्या आध्यात्मिकांचे विचार गुणग्राहकतेनं सांगत. त्यातील मर्म सांगण्याचा प्रयत्न करीत. त्या अंगानं जीवनाचे सारतत्त्व सांगत. माणसातील सात्त्विकवृत्तीविषयी त्यांना अधिक आस्था. तर्कापेक्षा प्रेममय अंतःप्रेरणा श्रद्धा, भावना त्यांना महत्त्वाची वाटे. जीवनातील गूढतेवर, रहस्यमयतेवर त्यांचा विश्वास असे ते बोलत असताना आपणास काही तरी खूप मिळत आहे, असं वाटे.

पण ते उत्कट क्षण संपले की वास्तव जीवनाला सामोरं जावं लागे त्या वास्तव जीवनाचे प्रश्न वेगळे असत. त्यांची उत्तर वेगळी मिळत त्यांची अध्यात्माशी सांगड घालता येणं अशक्य होऊन बसे. त्यामुळं बाहेरचं वास्तव खरं की मनातलं अध्यात्म खरं? हा मला सतत प्रश्न पडे. आपणास अध्यात्मिक उंची गाठता येत नसल्यामुळं ते जीवन आपणास भासमय दिसतं, असं वाटून मी स्वतःविषयी असमाधानी राही. पुष्कळ वेळा तर्क प्रभावी होई. त्या निकषावर अध्यात्म कोलमडल्यासारखं वाटे.

भिगारे सरांच्या घरी गेलो की वास्तवाचा प्रखर अनुभव येई. सरांच्याकडं मी फारसा जात नसे. त्यांचं माझ्यावर खूप प्रेम होतं, पण त्याची तर्ककठोरता मला पुष्कळवेळा झेपत नसे. काव्यापेक्षा गद्याकडं त्यांचा ओढा अधिक. सर प्रकृतीनं समीक्षक. त्यांची समीक्षाविचारातील तार्किक शिस्त मला आवडे. तसा विचार करायला आपण शिकलं पाहिजे, असं वाटे वैचारिक लेखन करताना मी त्यांचं अनुकरणही करी. पण भिगारे सर अध्यात्म, श्रद्धा, भावना यांना उडवून लावत. वास्तव, विज्ञान, बुद्धी, तर्क यांना मानत. या तत्त्वांच्या आधारे ते भल्या-भल्या साहित्यिकांच्या साहित्याच्या आत्मविश्वासपूर्वक चिंध्या करीत.

माझ्याजवळ तेवढं बौद्धिक सामर्थ्य नव्हतं. त्यांच्याशी बोलतानां मानसिक दबाव येई. आपला बौद्धिक कंगालपणा सरांच्या समोर उघडा पडेल, असं वाटे. त्यांच्याशी एखाद्या विषयावर चर्चा करायला किंवा वाद घालायला भीती वाटे.

वैचारिक, चिंतनात्मक लेखन आणि कविता हे दोन्हीही मला आवडे. पण माझ्या तरुण भावनाप्रधान मनाला भावनागर्भ, रोमँटिक कविता, निसर्गरम्य प्रतिमांची कविता अधिक आवडे. सरांना ती उथळ वाटे मला ती मोहक वाटे अशा वेळी सरांच्या समोर जाऊन हात दाखवून अवलक्षण कशाला करून घ्या, असा विचार येई. मग मी जायच टाळे.

एखादी कादंबरी वाचलेली असे. तिच्या वाचनामुळं जीवनविषयक एखाद्या प्रश्नाला चालना मिळालेली असे हा प्रश्न आध्यात्मिक पातळीवरून सोडविण्या–पेक्षा जीवनाच्या वास्तव पातळीवरुन सोडविण्याची निकड भासे. पुष्कळ वेळा वाङ्मयीन विचार किंवा समीक्षा वाचत असताना काही प्रश्न पडलेले असत. या प्रश्नांची सोडवणूक करून घेण्यासाठी भिगारे सरांच्याकडंच गेलं पाहिजे, असं वाटे. अशावेळी सरांच्याकडं जाण्याची ओढ लागे. तिला पर्याय नसे.

प्रश्न घेऊन गेलो की सर विशेष खुलत. त्यांना आव्हान वाटे. अनेक संदर्भ देऊन प्रश्नाला प्रतिप्रश्न उभे करीत. त्यातील परस्पर संबंध आणि गुंतागुंत समजून देत. मग उत्तराची गुंतवळ मांडत. त्या चर्चेत मी गुंग होऊन जाई. कधीकधी गोंधळूनही जाई.

चर्चा संपल्यावर किंवा सरांना ती पुरेशी वाटल्यावर ते बोलत बोलत पानाचा डबा उघडत. हळूहळू पानाच्या शिरा काढत. त्याला चुना लावत. कात खुडून टाकत, आवश्यक तेवढी सुपारी नि तंबाखूची चिमूट टाकत. विडा करून पानाचा तोबरा तोंडात भरत. तोबरा तोंडात भरला की तोंड मिटावं लागे. तोंडात गुळणी साठत राही. ती थुंकण्यापेक्षा तोंडात तशीच साठवणं म्हणजे विड्याचा आनंद चाखणं. मग आम्ही काहीही बोललो; तर त्याला एका शब्दात 'हूं', किंवा 'अहं' अशी उत्तरं देत. मग ते नुसतेच गप्प बसून राहत. मलाही वाटे की आता आपण उठावं.

सर अंतर्मुख वृत्तीचे होते. मुळात कमी बोलत. फाफटपसारा त्यांना आवडत नसे. मनात खरोखरच जे आहे; तेवढं तेच मोजकेपणानं बोलत. गप्पा मारण्या-पेक्षा चक्क पान खाऊन काहीतरी जाड ग्रंथ वाचण्यात त्यांना आनंद मिळे विद्यार्थ्यांबरोबर कधी बाहेर ते फिरायला पडत नसत. कधीतरी एकटेच बाहेर फिरताना दिसत. घरचेही कुणी त्यांच्याबरोबर नसे. एकान्तात किंवा एकटेपणात त्यांना आनंद वाटत असावा. सदैव वाचन चाललेलं असे. त्यांच्या विषयी मला

नितान्त आदर वाटे. त्यांची सचोटी, मनःपूर्वकता, बोलण्याशिकवण्यातील शिस्त, अभ्यासूवृत्ती, स्पष्टवक्तेपणा आपण आत्मसात करावा, असं वाटे. तसा तो करण्याचा मी प्रयत्न करीत होतो.

भिगारे आणि कुलकर्णी दोघेही भाषेचे आणि साहित्याचे प्राध्यापक, पण दोघांचे दृष्टीकोन परस्पर भिन्न वाटत. त्यामुळं मी काही काळ गोंधळून जाई.

मी एक सोपं उत्तर शोधलं. भिगारे सर एकटे असतात. त्यांच्याकडं गप्पा फार कमी होतात. विषय संपला की ते अवांतर जराही बोलायला तयार नसतात. त्यांच्या चेहऱ्यावर एक गूढ उदासीनता, तटस्थता कायम असते. ते आनंदानं कधी उमललेले किंवा फुललेले दिसत नाहीत. कदाचित हा अतितर्कवादाचा तर परिणाम नसेल ? .. हा तर्क जीवनातील भावना, नाट्य, काव्य, श्रद्धा यासारख्या चैतन्य निर्माण करणाऱ्या गोष्टींचा रस तर शोषून घेत नसेल ? तर्कामुळं जीवनातील थ्रिल, नष्ट होत असावं. जीवनाची गूढ, उल्हासी चव नाहीशी होऊन थंडपणा येत असावा. आपण एवढं तर्ककठोर नाही होऊ शकणार. नुसतं गद्य नाही जीवनाला उपयोगी पडणार. काव्यही हवंच. माझ्या आईच्या अंगावरच जुनेर हे वास्तव आहे पण पेटीतली पैठणी तिच्या मनातलं स्वप्न आहे. ती आहे, कधी सटी सहामासी सणासुदीचं नेसायला मिळते म्हणून तर तिला जुनेराचं जन्मवास्तव सोसतं. काव्याचंही तसंच आहे.

कुलकर्णी सर कसे आनंदित असतात. त्यांच्याकडं प्रसन्न वाटतं. ते कसे माणूसप्रेमी आहेत. सात्त्विक गप्पांत मनापासून रमतात. काव्यमय वातावरणात, निसर्गात तल्लीन होतात. हवेहवेसे वाटतात. कंटाळा आला की त्यांच्याकडं जावसं वाटतं. काव्याच्या गप्पारसात डुंबावसं वाटतं.

पण ते मानतात तसा माणूस सौजन्याचा पुतळा नसतो किंवा अज्ञानामुळं दुबळेपणापेक्षा त्याचं क्रौर्य, अडाणी हटेल पशुताच जास्त अनुभवाला येते. अर्थात भिगारे मानतात तसं माणसात नुसतंच हीणही नसतं; सौजन्याचं सोनंही असतं. आपण सारखा पशुतेवर डोळा ठेवून भागणार नाही. त्यामुळं आपण सतत संशयग्रस्त राहू. आनंद गमावून बसू....

प्रा. एस. एस. कुलकर्णींच्याकडंही मी आरंभापासून जात असे मला पडणारे जीवनविषयक प्रश्न विचारी. सर हाडाचे शिक्षक होते. त्यांचे

विचार शास्त्रीय वाटत. कदाचित तत्त्वज्ञान, मानसशास्त्र या त्यांच्या विषयांचा तो परिणाम असावा. मुद्देसूदपणे एखादा विचार मांडत. आग्रह कशाचा धरत नसत. 'ही वस्तुस्थिती आहे तुला जे वाटेल ते तू स्वीकार. अनुभव येणं महत्त्वाचं असतं. पिंडधर्मही महत्त्वाचा असतो' असं म्हणत.

त्यांची आग्रहरहित भूमिका विशेष आवडे. 'तत्त्वज्ञान काय म्हणतं, मानसशास्त्रीय स्वरूप काय आहे' याची तटस्थ मीमांसा ते करत. त्यामुळं मनातल्या शंकांना समाधानकारक उत्तरं मिळाल्यासारखी वाटत.

भिंगारे, कुलकर्णी, एस. एस. के या तिघांशी अनेक विषयांवर चर्चा केल्या, बोललो. एस. एस. कें च्या विचारांत उरलेल्या दोघांचा समन्वय दिसे. त्यामुळे मला तिघांकडही जावस वाटे. वर्गातल्यापेक्षा या तीन प्राध्यापकांच्या घरीच मी अधिक घडलो हे तिघेही केवळ पढीक प्राध्यापक नव्हते. आपआपल्या परीनं समृद्ध व्यक्तिमत्त्वाचे होते. तिघेही खडतर आयुष्यातून वाटचाल करीत आलेले. त्यांचा भूतकाळ त्यांना घडविण्यास कारणीभूत झालेला. तरीही तिघांचे दृष्टि-कोन भिन्न. विशेषतः भिंगारे आणि कुलकर्णी ही जीवनविषयक दृष्टिकोनाची दोन टोकं. एस. एस. के या दोहोंची मीमांसा मांडणारे. प्रत्येक दृष्टीचं महत्त्व ओळख-णारे, मर्यादाही सांगणारे या तीन दैवतांच्या भोवतीनं माझी प्रदक्षिणा अधून-मधून सतत चाललेली. तिघांचेही सूर माझ्या एकतारीवर उमटणारे,

आता ती एकतारी त्या डोळस बोटांपासून दूर पुण्याला चालली. कोल्हापुरा-पासून दीडशे मैल दूर

चार वर्षांत मी कोल्हापूर किती आत्मसात केल ? खासबागेच्या ग्राउंडवर पंडित जवाहरलाल नेहरू, मोरारजीभाई देसाई, यशवंतराव चव्हाण यांच्या विराट सभा मी पाहिल्या. त्या सर्वांना अगदी जवळून डोळ्यांत घालून बघितलं.

प्रियदर्शनी इंदिरा गांधींना पाहिलं. गोखले कॉलेजच्या साठमारीच्या वळणा-वरून आवाज न करता त्यांची गाडी एका सकाळी सकाळी थंडीच्या दिवसात वळली होती. इतकी आवाज न करता वळत होती की खाली बघून चालणाऱ्या मला ती अंगावर येते की काय असं वाटलं. मी सर्रकन मागं सरलो नि उताणा पडलो. हातातली पुस्तकं विस्कटून पडली रागानं त्या गाडीच्या ड्रायव्हरकडं पाहिलं. गाडीत कोण बसलंय ते पाहिलं तर पंतप्रधान पंडित नेहरूंची रूपमती

कन्या प्रियदर्शनी इंदिरा गांधी ! मी चकित होऊन तसाच बघू लागलो. इंदिराबाईंनी माझ्यातल्या प्रांजळ निष्पापतेशी क्षमा मागावी तसे मला दोन्ही हात जोडले. मी पायजमा झाडत तसाच उभा राहिलो नि दोन्ही हातांनी त्यांना घाईगडबडीनं नमस्कार केला गाडी हळूच निघून गेली. आश्चर्यचकित करणारी आयुष्यातील एक घटना

बोर्डिंगच्या शेजारीच भालजी पेंढारकरांच्या फिल्म स्टुडिओ. रोज तेथून जातायेताना कुणी ना कुणी नटनटी दिसत असत. पुष्कळ वेळा मॉबसीनसाठी बोर्डिंगमधल्या सर्वांना बोलावणीही येत असत. सिनेमाचं सगळं शूटिंग बघायला मिळत असे. पुन्हा तेच सिनेमात बघताना गंमत वाटे. कलावंत माणसं जवळून पाहायला, अनुभवायला मिळत होती

एकदा दुपारी चार वाजता मी चहाला जात असताना अचानक पाऊस आला. खुद्द भालजी पेंढारकर आणि लता मंगेशकर स्टुडिओपासनं फर्लांगभर अंतरावर घराच्या वळचणीला पाऊस जाण्याची वाट बघत होते बळवान आलेला पाऊस माझ्याजवळ छत्री होती.

मी त्यांच्याजवळ गेलो. म्हणालो, 'मी स्टुडिओत पोचवू का ?'

'चला' ते दोघेही माझ्या छत्रीत दोन्ही बाजूंला आले खेटून चालू लागले भालजींनी एक हात चक्क माझ्या खांद्यावर ठेवला. लताबाईंवर छत्री अधिक झुकवून मी चालू लागलो चित्रपटसृष्टीच्या आणि गानसागराच्या आकाशाला गवसणी घालणारे दोन महान प्रतिभावंत आपल्या छत्रीत मला अगदी खेटून चालताहेत, आपण ते भिजू नयेत म्हणून काळजी घेत आहोत, या घटनास्थितीनंच मला अतिशय आनंद झाला.

त्यांना पोचवून मी सुगंधत परतलो.

गाडी कोल्हापुरापासनं खूप लांब आली होती ती लांब येईल तशा निरोपाच्या आठवणी अधिकाधिक दाटून येऊ लागल्या

पिटके गंभीरपणानं म्हणाले होते, 'कोल्हापूरला विसरू नका.' आणि जोशी, दीक्षितही विनोदानं तेच म्हणाले होते.

सगळ्यांचा आपला सूर एक होता. ही उपचाराची भाषा असते का? उपचार तरी का जन्मावा ? त्याच्या पाठीमागं खरोखरीची काही भावना प्रथम असणारच. त्यातनंच हळूहळू उपचार तयार झाला असणार.

माणूस एक गाव सोडून दुसऱ्या गावाला कायमचं जातं. ते जुन्या गावाला विसरून नव्या गावात रमत असावं. त्याला तिथं कायमचं राहायचं असल्यानं खरं तर त्यान तिथं रमायला पाहिजे तिथला समाज, रीतिरिवाज, माणसं आत्मसात केली पाहिजेत. त्यांच्याशी मैत्री केली पाहिजे. तरच त्याचं जीवन तिथ कटाळवाणं होणार नाही. तसं न झाल तर त्याला तिथं जगणं अशक्य होईल त्यामुळं कदाचित तो पहिल्या गावी परतही येऊ शकेल. मग हे बरंच आहे की, आपल्या माणसांत तो पुन्हा येईल.

मी असं परत जाणं बरं होईल का ? मला माझी कागलची माणसं, कोल्हापूरचे मित्र, वातावरण, आपलासा वाटणारा समाज हवाच आहे. पण रेडिओची नोकरी तिथं नाही. ती फक्त पुण्यातच आहे. शिवाय पुण्याच वाङ्मयीन, सांस्कृतिक वातावरण दुसरीकडं कुठं नाही म्हणजे आपल्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाच्या विकासाला तिथंच भरपूर वाटा मिळणार आणि तिथंच विपुल संस्कारही होणार तसा वाव आज दुसरीकड कुठं नाही.

गाव सोडलं तरी तिथली माणसं मनानं सोडलीच पाहिजेत, असं कुठं आहे ? मी माणसं सोडीन, अशी पिटके, जोशी, दीक्षित यांच्या मनात खोलवर नकळत भीती असली पाहिजे. ती अगदीच अनाठायी नाही. पुष्कळ माणसं गावाबरोबर तिथल्या माणसांनाही सोडतात. ती कृतघ्नता आहे. या दुष्टाव्याची जाणीवही कित्येकवेळा अशा माणसांना होत नसावी. अशी जाणीव राहण्यासाठी थोडं खोलवर जगता यावं लागतं. आपल्यावर कुणीकुणी स्नेह, प्रेम, माया, मदत उधळली हे काळजीपूर्वक सूक्ष्मात जाऊन समजून घ्यावं लागतं तिथं मन गुंतवावं लागतं सामान्य माणसं जिथं अन्न, वस्त्र, निवारा भोग मिळतात तिथं रमतात नि मागचं सगळं विसरून जातात. कुत्र्यामांजरासारखं त्यांचं जगण. ती एका अर्थी केवळ पशू असतात. आपल्यातलं पशुत्व शक्य तो टाळावं, उन्नत माणूस व्हाव, असं त्यांना निश्चयपूर्वक वाटतच नाही.

वाटलं असतं तर त्यांना कळलं असतं की, पूर्वी ज्या गावात आणि माणसांत आपण राहिलो त्यांचे अनंत उपकार आपल्यावर आहेत. आपण त्यांच्यामुळं शिकलो, वाढलो, संस्कारित झालो, हे त्यांना कळलं असतं. खरं तर गाव म्हणजे तरी काय ? नुसती झाडं, घरं, शेतं यांची का ती समग्र रचना असते ? तशी असती तर ती सर्वत्रच भेटते. गाव म्हणजे आपला पिंडधर्म संस्कारित करणारी

मूस असते. त्या मुशीमुळं आज आपण जे काही असतो, ते घडलेले असतो. म्हणून गावमूस आपली दुसरी माय असते. पहिली माय मांसाचा गोळा जन्माला घालते नि दुसरी माय मांसाचा माणूस करते आपल्या आईला विसरण्याइतका जगात दुसरा कोणताही कृतघ्नपणा नसेल.

कागल गाव माझी दुसरी माय. रत्नागिरीनं मला वर्षभर सांभाळलं, कोल्हापुरानं मला आणखी माणसात आणलं. ऐन घडईचे माझे दिवस कोल्हापुरातले. त्याचा अवयव नि अवयव माझ्या घडईला हातभार लावीत होता ऐटदार दोन्ही महाविद्यालयं, हिरवागार टाऊन हॉल, राजविलासी पॅलेस थिएटर, कुस्त्यांचं मर्दानी मैदान, राजेशाही भवानी मंडप, पुराणमुग्ध अंबाबाईचं घनदाट खांबांचं दगडी देऊळ, वीरत्वाचं भूषण आणि विचारवंतांचं व्यासपीठ असलेला बिंदू चौक, रंकाळ्याचा चिंतनशील विशाल बाकदार कठडा नि सरस्वतीच्या शुभ्र सृष्टीचं नगर वाचन मंदिर ही ठळक ठिकाणं मला सांभाळत होती. छत्रपती शिवाजी महाराज, राजर्षी शाहू महाराज, शांतपणे घोड्यावर स्वार झालेले प्रिन्स शिवाजी यांच्या पुतळ्यांनीही मनाच्या काही जागा व्यापल्या आहेत एवढंच काय सकाळी लौकर उठून कॉलेजला जाताना एका बाजूनं हातात पितळेच्या छोट्या वादल्या घेऊन, तांबडमातीचे लेप अंगावर तसेच मिरवत, झुलत झुलत जाणारे पैलवान नि दुसऱ्या बाजूनं तशाच झुलत झुलत रस्ताभर गवळाऊ शिंगं पसरून निवांत चालणाऱ्या म्हशी बघून, हे खास कोल्हापूरचं लेणं वाटे त्यांच्याही आठवणी विसरणं शक्य नाही.

कोल्हापूर म्हणजे विकास पावणाऱ्या माझ्या ऐन तारुण्यातील उत्कट सुखाची ऊबदार वाकळ, किंवा पंचगंगेच्या काठच्या माझ्या व्यक्तिमत्त्वाची गाळपेर जमीन. या कलापुराला कसा विसरू ? कोल्हापूरची स्वतंत्र उद्योगशीलता, तिथली स्वर्गीय चित्रनगरी, खास मराठी कलावंत, नामांकित चित्रकार, वीरत्वाचे पोवाडे गाणारे शाहीर, पन्हाळगड, विशाळगड, तियला उज्ज्वल इतिहास, महाराणी ताराबाईंचा अभिमानी वारसा, महर्षी शाहू महाराजांचा दूरितांना उचलून उराशी धरणारा राजधर्म, सगळ्या महाराष्ट्राला कोल्हापुरानं हा मराठी स्वाभिमान दिला आहे. हे सारं कसं विसरू ?

गाडी पुण्याच्या दिशेनं सुसाट चालली होती, माणसं असूनही मी गाडीत एकटाच होतो. माझ्यात खोल खोल जाऊन पुन्हा वर येत होतो. मागे पडणारा प्रदेश बघत होतो. पचगंगेच्या पाण्यावरची सपाट हिरवी ऊसरानं, आभाळाकडं

मुखं असलेले झाडांचे गुलजार गुच्छ, उताणे पडलेले विचारवंत निळे डोंगर नि त्यांच्याच पोटात शिळापाषाण, झाडीझुडपे, शेते यांनी भरलेल्या दऱ्या-खलाट्या, आसपासची शेती कसण्यासाठी तिथंच वस्ती करून राहिलेली मराठी खेडी, त्यातली खेडवळ माणसं, त्यांची बैठी घरं नि खोपटं सगळी झपाट्यानं मागं पडत होती. माझ्या पुण्याला जाणाऱ्या गाडीला आपल्यामधून वाट करून देत होती. मी या सगळ्यांचा कृतज्ञ होतो. डोळे मिटून मुजरा करत होतो.

('नांगरणी' या लौकरच प्रसिद्ध होणाऱ्या आत्मचरित्रात्मक कादंबरीमधून)

आनंद यादव

५ कलानगर, धनकवडी, पुणे ४३

# घरगंगेच्या काठी : सत्त्वाचा शोध

— ज्योत्स्ना देवधर

'कार्टी मला भिकेला लावणार.'

माझ्या किशोर हातावर तीन रुपये आणि आठ आणे ठेवत काका (वडील) चिडून म्हणाले. त्यांचा राग सार्थ होता पण भिकेला लावणार वगैरे वैतागाचे उद्गार होते. मी बोर्डाच्या म्हणजे सातवीच्या परीक्षेला दोनदा नापास झाले होते. जोधपूरला आम्हां मुलींना शिक्षण फुकट होतं. सातवीला दोन्ही वेळेला मी गणितात अगदी कमी मार्क मिळवल्यामुळे नापास झाले होते. साडेतीन बायका, सव्वा मूल, पावणेचार पुरुष अशी उत्तरं काळ - काम - वेग या गणितांना मी दिली होती 'शिचीचं लवकर लग्न करून टाकतो ही काही शिकणार नाही.' वडलांनी निर्णय सुनावला व त्याप्रमाणे ते वागलेही. आईला फार वाटायचं मी डॉक्टर व्हावं पण माझ्या बुद्धीचा एकूण आनंदच होता.

तर असे माझे पाळण्यातले पाय

माझ्या सासर-माहेरच्या कुठल्याच घराण्यात कधीच कुणी लेखक, कलावंत, पुढारी, विचारवंत, वक्ता, कार्यकर्ता वगैरे झालेलं नव्हतं. त्यामुळे अशा थोर लोकांचं दर्शन तर सोडा त्यांचं काही वाचायला, ऐकायलाही कधी काही मिळालं नाही. कानावर पडत होतं वडलांचं विष्णुसहस्रनाम आणि आईचं 'धाव रे धाव रामराया' हे करुणाष्टक. आजी, काकी, मामी किंवा कुणी झोपाळ्यावर गाणी म्हटली नव्हती की ओव्या रचल्या नव्हत्या. जोधपूरसारख्या ठिकाणी कसली चळवळ नाही की व्याख्यान, प्रभात फेऱ्या, कीर्तन, प्रवचन नाही. पुण्यात आले तो काळ बेचाळीसचा. धगधगता काळ. नाट्य साहित्य, संगीत यांचा सुवर्णकाळ. पण सासरी यातली एक झुळुकही अंगावर आली नाही. वडिलांना वाचनाचा नाद होता. ते हिंदी, संस्कृत, इंग्रजी वाचत. पुस्तके, मासिकं विकत घेऊन वाचत पण मुलींना यात काही द्यावं, सांगावं, वाचायला लावावं असा तो काळ नव्हता म्हणा किंवा त्यांना तसं वाटलं नाही म्हणा. सासरी तर शिकणाऱ्या पुतण्यांच्या

क्रमिक पुस्तकाशिवाय दुसरं पुस्तक घरात नव्हतं.

तर असं वातावरण कुठलीही महत्त्वाकांक्षा असूच नये असा एकूण वाढीचा काळ. सोळावं लागता लग्न झाल. सोळावं सरता आई झाले.

उमेदीचा, हौशीचा, स्वप्नांचा काळ ! स्वप्न बघायला डोळ्यांना वळण नव्हते. विचार करायची सवय रुजवली गेली नव्हती. वाचायविचायची गरजच ठाऊक नव्हती.

कुणा ज्योतिषानं माझी पत्रिका पाहून, ही लिहेलं, नाव मिळवेल असं काही सांगितलं असतं तर मी त्याच्या हातातून हात काढून घेतला असता. पत्रिकेची घडी घालून ठेवून दिली असतो.

बरोबरीच्या पुतण्या शिकत होत्या. कॉलेजात जात होत्या. वहिणीपण मॅट्रिक झालेल्या होत्या. वडील तर खरंच बोलायचं व्रत घेतल्याप्रमाणे सांगून टाकत, 'हीच तेवढी आठवी पास झालेली आहे.' जाऊबाईपण म्हणायच्या, 'भाऊ-रावांची बायको मॅट्रिकपण नाही.'

तेव्हा मनात एकच ईर्षा होती. मॅट्रिक व्हायचं हाताला घड्याळ आणि गळ्याला पेन लावून पुस्तक हातात घेऊन मी मॅट्रिकच्या परीक्षेला जातेय हे एकमेव स्वप्न होतं.

मुलं मोठी झाल्यावर शिकले. एम. ए. झाले. ते सुद्धा हिंदी घेऊन. मराठी कामचलाऊ. वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत एकही नाटक पाहिलं नव्हतं. (जोधपूरला नाटकंबिटकं येत नव्हती. आली तरी पहायला संधी नव्हती) सिनेमासुद्धा वर्षातून एकदा. भाऊबिजेच्या दिवशी आम्ही आठदहा भावंडं एकुलत्या एक चांगल्या थियेटरमध्ये जाऊन असेल तो सिनेमा पाहत होतो. ती आमची भाऊबीज म्हणून ओवाळणी असे. पडदानशीन बायकांच्या घोळक्यात आम्ही मुली सिनेमा पहायचो.

असे हे संस्कार म्हणा किंवा साहित्य, संगीत, कला या बाबतचं ज्ञान म्हणा. शून्य फक्त शून्य. याबाबत संपूर्ण उन्हाळा. कशाची जाणीवच नसल्यामुळे कशाची उणीव आहे असं वाटतच नव्हतं, त्यामुळे बालवय, तरुणवय खाऊनपिऊन, लेवून सुखी होतं. आईवडलांचं, वडीलधाऱ्यांचं मायेचं छत्र होतं. धार्मिक, शुचिर्भूत असे संस्कार होते. गरळ, साधे, सोज्वळ, घरंदाज वळण होतं. तसं वातावरण होत त्या आयुष्यात दुःख माहित नाही. कशाची कमतरता नाही. प्रवास नाही. वाचणे, पाहणे, अनुभवणे नाही

आज वाटतंय, नव्हतं ते किती मोलाचं होतं. भरल्या घरात, माणसाच्या गराड्यात एकही पुस्तक असू नये ! शाळेतही वाचनाचा छंद लागू नये! सुरेख,

सुग्रास, कसदार जेवण, या भुकेपलिकडे संस्कारक्षम वयात इतर कुठलीच भूक जागी होऊ नये ! तिला खाद्य मिळू नये ! वाचन नाही, पाठांतर नाही, विविध कलांचा आस्वाद नाहीच नाही.

किती गमावलं ! प्रचंडच. अमाप. असंख्य. संस्कृत येत नाही याची खंत आजवर आहे

तरीपण माझ्या पेशीत माझ्या जन्मदात्यांनी या सगळ्या गोष्टींची ओढ, प्रेम, भूक निर्माण केलीच असावी. त्याशिवाय का आज माझी माझ्याजवळ हिंदी, मराठी, इंग्रजी शेकडो पुस्तकं आहेत ? चाळीसएक पुस्तकं नावावर आहेत. साहित्य क्षेत्रात थोडंफार नाव आहे. कलागुणांची जाण आहे. यात आनंद आणि स्वाभिमान पण आहे हे सगळं माझं मी मिळवलं. मी धडपडले. प्रयत्न केले. कष्ट केले. कुणाचं मार्गदर्शन, मदत, आधार नाही. सुदैवानं माझ्या घरात मला स्वातंत्र्य होतं. सहकार्य होतं माझ्या छंदांचं कौतुक होतं. कशाची ना नव्हती. प्रोत्साहन होतं. अडथळा नव्हता. नकार नव्हता. त्यामुळे माझी धडपड अडथळ्याशिवाय सत्कारणी लागली माझ्या यशाचं कौतुक माझ्या माणसांच्या डोळ्यात दिसायचं हेच फळ मी मम तपाला होतं नशीबानं साथ दिली. योगायोगानं हात दिला. वातावरणानं सोबत केली सामान्य बुद्धीनं झेप घेतली. दैवानं उन्नतीचा मार्ग दाखवून दिला

'घरगंगेच्या काठी' ही माझी पहिलीवहिली कादंबरी. वयाच्या चाळीशीत लिहिलेली त्या आधी थोड्या फार कथा, विशेषतः हिंदीत लिहिलेल्या. छापून आलेल्या पण मी बऱ्यापैकी लिहू शकते याची जाण आणून दिली ती या कादंबरीनं. देवाशपथ खरं सांगेन खोटं बोलणार नाही, ही कादंबरी लिहित असताना किंवा ती 'तरुण भारत'च्या दिवाळी अंकात छापून आल्यानंतरही मला माझ्या लेखनगुणांचं भान नव्हतं. प्रभाकर पाध्ये, निशिकान्त मिरजकर, हरिभाऊ मोटे, शंकर सारडा, बाळ गाडगीळ, श्री के. क्षी. अशा जाणकारांनी या कादंबरीचं कौतुक केलं, छान आहे म्हटलं. भाषेचं, शैलीचं विशेष गुणगान केलं तेव्हा चोरूनच मी माझ्याच पाठीवर शाबासकी दिली होती. पुस्तक झालं. पॉप्युलरसारख्या महत्त्वाच्या प्रकाशनानं छापलं, महाराष्ट्र सरकारचं हरिभाऊ आपटे पारितोषिक मिळालं आणि पहिल्याच कादंबरीनं मी प्रकाशात आले गंमत म्हणजे इतकं सगळं झाल्यावर मीच माझी कादंबरी परत वाचली तेव्हा वाटलं, खरंच आपण छान लिहिलंय. अगदी सहजपणे, अभावितपणे, कुठलाही आराखडा, चर्चा, मांडणीचा विचार नकरता मी ती कादंबरी लिहिली. कुंवार भूमीत पहिलंवहिलं पीक रसरसून यावं बहरावं, फळाफुलांनी डहरावं असं

घरगंगेच्या बाबतीत झालं. माझ्या लेखणीची ताकत माझ्या भाषेचा बाज, माझ्या शैलीची लय या कादंबरीनं मला जाणवून दिली. हिच्या यशानं मला आत्मविश्वास आला. जाणकारांच्या स्तुतीनं, कौतुकानं, वाचकांच्या वाहवानं मला लिहितं ठेवलं.

सोळाव्या वर्षी जोधपूर सोडलं तेव्हापासून चाळीशी गाठेतो बरेच बरेवाईट अनुभव घेतले होते. रेडिओसारख्या कलात्मक वातावरणात येऊन पाच वर्षं झाली होती. तिथे मराठीमय झाले होते. खूप काही वाचल होत. काही चांगली कलावंत माणसं भेटली होती. त्यापेक्षाही मनात असलेल्या हौशीला, धडपडीला लेखनवाचनाला, विविध कलांवावत असलेल्या आवडीला माझी मी नाना मार्गानं खतपाणी घालत होते. असह्य दु.ख असं काहीही नव्हतं तरीही मन सारखं होरपळत होतं, हुळहुळत होतं, तळमळत होतं. जिव्हारी लागल्यासारखं दुखावत होतं करुणेचा सागर मनात उचंबळत होता. असमाधानाचा श्वास छातीत कोंडून धरला होता. भोवतालच्या जगात आपण नगण्य आहोत, सामान्य आहोत ही भावना चैन पडू देत नव्हती. महत्त्वाकांक्षा तन–मन घेरून होती. कष्ट करण्याची तयारी होती. कंटाळा नव्हता. फक्त आपण काय करावं कसं करावं, काय नेमकं आपल्याला हवंय हेच कळत नव्हतं. विचारायला, सांगायला, सल्ला घ्यायला दुर्दैवानं तमं माणूस भोवताली नव्हतं. सगळं मनानंच. जमेल तसं, साधेल तसं.

घरगंगेच्या काठी लिहताना आपण आता कादंबरी लिहणार आहोत, अमुक प्रकरण, अमुक पात्र, तमुक घटना, अशी सुरुवात, असा शेवट अशी, अशा पद्धतीनं वाढ गुंफण वगैरे वगैरे काहीही डोक्यात नव्हतं. कादंबरी म्हणजे काय, कशी असावी हे परीक्षेपुरतं माहीत करून विसरून गेलेलं. प्रतिभासाधन वगैरे न वाचलेलं पण तिचा जन्म व्हायचा होता झाला.

माझ्या आईच्या एका वाक्यानं कादंबरीच वीज मनात रुजलं

त्याचं असं झालं. एका संध्याकाळी मी आईकडे प्रभात रोडला गेले. आई शेगडीतले निखारे वहीच्या पुठ्ठयानं फुलवत पाटावर बसली होती. वातावरणात गोवरीचा जळका वास, रॉकेलचा वास भरून होता. काका–माझे वडील बाहेर व्हरांड्यात आरामखुर्चीवर बसले होते. आईजवळ मी पाट घेऊन बसले. आईच्या वाफेकळी नाकाचा शेंडा लाल झाला होता. मला आलेली पाहताच काका आत आले आईनं त्यांच्या पुढ्यात तत्परतेनं पाट सारला खाली बसत काका म्हणाले,

'हे बघ कुसुम, तुझ्या आईला जरा समजव, आता मी सत्तरी गाठली. मृत्यु-पत्र करतोय तर ही डोळे गाळतेय'

'आई, मृत्युपत्र करायला हवं. त्यात वावगं काही नाही.' मी म्हणाले.

आई गप्प. तुम्हा शहाण्यांपुढे मी काय बोलणार. बोलले तरी तुम्हाला काय समजणार असा भाव तिच्या चेहऱ्यावर होता. तरीपण काका आणि मी तिला समजावत होतो. यात हळवं होण्यासारखं अपशकुन वाटण्यासारखं काही नाही हे सांगत होतो. शेवटी वैतागून आई म्हणाली,

'करा काय करायचे ते. पण त्या शब्दाचा माझ्या पुढयात परत उच्चार नको. मला मेलीला काय कळतंय त्यातलं ! माझ्याजवळ पैसा अडका, इस्टेट काहीच नाही. मी स्वतःपण माझी नाही. मी काय मृत्युपत्र करणार? माझ्यासकट तुम्हीच करा मृत्युपत्र.'

एवढंच घडलं पण प्रभातरोडपासून कॉमर्स कॉलेजजवळ असलेल्या माझ्या घरापर्यंत येत असताना माझ्या मनात ही कादंबरी एकदम आकाररूप-गुणासह उभी राहिली. नावसुद्धा ठरलं 'मृत्युपत्र.' बी. ए. ला जैनेन्द्रकुमार जैन यांची फक्त चौसष्ठ पानांची 'त्यागपत्र' ही कादंबरी होती. केवळ अप्रतिम. त्या चालीवर मृत्युपत्र हे नाव पक्कं झालं ती कादंबरी शिकत असतानाच फार-फार वाटत होतं, असं छान छान लिहिता आलं पाहिजे.

या कादंबरीतली पात्रं आपआपला तोंडावळा घेऊन समोर उभी ठाकली. त्यांची भाषा ते बोलू लागले. बायका सूत्रमय, म्हणीसारखी भाषा बोलत होत्या पुरुष समर्थ, रागीट हुशार पण हेकट, कर्तव्यदक्ष पण अरेरावी असे वावरत होते. त्यांचे तेच झाले, बोलत राहिले, वागत राहिले, घटना घडवत राहिले. कादंबरी पुढे पुढे सरकत राहिली

आज पंचविशीतली ही कादंबरी आपल्या चार आवृत्त्यांसह, नावारुपासह मला हेच सांगतेय, आम्ही घडलो, आम्ही बोललो तू लिहिलेस या कादंबरीतली नायिका जानकी अजून माझ्यावर रुसून आहे इतका सगळा भोगवटा माझ्या पदरी का टाकलास म्हणून मला विचारते आहे. जानकीची थोरली जाऊ त्या घरची वहिनी आपल्या उदास डोळयांनी, मुक्या ओठानी माझ्याकडे पाहते तेव्हा ती न बोलता मला कळतं, तिच्या सुखदुःखाची वीण मला उमजते, अण्णांचा रागीट चेहरा, जानकीच्या नवऱ्याचा सोशिक चेहरा. त्या वाडयाच्या भिंती, तिथले उंबरे, तिथला जिना, ते देवघर, तो झोपाळा सगळं सगळं माझ्या ओळखीचं आहे.सासरी माहेरी एकत्र कुटुंबात, नात्यागोत्याच्या गर्दीत ही सगळी माणसं मला दिसतात कुणाकुणाच्या स्वभावांचं रसायन होऊन एक निराळंच व्यक्तिमत्त्व



अनुक्रमणिका

तयार होत गेलं. बायकांचं अबोल सोशिकपण, अखंड सेवावृत्ती, संसारासाठी सपून, विरून, विरघळून जाण्याची खोड मी लहानपणापासून पाहते, अनुभवते आहे. वडलांचा दरारा, थोरल्या दिराचा धाक अजूनही रस, गंध, रूप, स्पर्शासह आठवतो. आई, काकू, मावशी, आत्या, जाऊ या सगळ्या मला अजूनही अस्वस्थ करतात कुठल्या मातीनं या घडल्या असं वाटतं. या घरच्या बायकांत हळूच माझ्याही नकळत प्रेमचंदांच्या नायिका, शरदबाबूंच्या मानसकन्या येतात. मिसळतात. परत दोन चार रूपं, दोन चार स्वभाव एकत्र रांधले जातात. नवे कुणीतरी समोर उभे राहतं.

प्रभाकर पाध्ये यांनी केसरीमध्ये माझ्या 'घरगंगेच्या काठी' आणि 'कल्याणी' वर एक समीक्षात्मक लेख लिहिला. पाध्ये यांचा तो प्रदीर्घ लेख वाचून माझी मलाच मी खूप कळले. लेखिका म्हणून माझी मला ओळख झाली. त्यांनी माझ्या शैलीवर खूष होऊन ' यांची भाषा चित्रमयी आहे. तिला रस, रूप, गंध स्पर्श आहे ' असं लिहिलं (थोड्याफार फरकाने) तेव्हा मला कळलं, आपण अमुक प्रसंग, अमुक उद्‌गार, व्यक्ती चित्रमयी शैलीत रेखाटली आहे. लेखिका म्हणून हे माझे गुण पाध्यांनी दाखवून दिले. त्यांनी माझ्या लहान लहान वाक्यांचं अर्थवाही भाषेचं मनःपूर्वक कौतुक केलं.

माझ्या अल्पाक्षरी, अर्थबहुल भाषेसंबंधी विचार करता, हिंदीचे संस्कार, मराठी वातावरण आणि उर्दूची आवड, ओढ या रसायनातून ती वाढली असावी असं वाटतं. हिंदीचा हळुवारपणा, उर्दूची नजाकत आणि मराठीचे थोरपण माझ्या भाषेला लाभलं असं वाटतं, शरदबाबूंच्या वाङ्‌मयातील समर्पणशीलतेतही अस्मिता, सोशिकपणातही स्वत्व, तत्त्वनिष्ठा; जैनेन्द्र यांच्या साहित्यातील ओढ लावणारी शैली, चकित करणारी पात्रयोजना अकल्पित वळण घेणारं कथानक. यांचाही परिणाम माझ्या लेखनावर झाला असावा. अभिव्यक्तीच्या सहजतेतून येणारी कलात्मकता साधली गेली.

थोडक्यात खूप काही सांगायचं वळण रेडियोच्या नोकरीत, गृहिणी कार्यक्रमाच्या सादरीकरणात मिळालं. सोपी, साधी भाषा, बोली भाषा, श्रोत्यांपर्यंत केवळ ध्वनिमाध्यमातून संवाद साधण्याच्या आवश्यकतेतून निर्माण झाली. बोजड अलंकृत, संयुक्त वाक्य देऊन चालतच नाही. एक प्रकारे तुम्हाला तुमचा कार्यक्रम चटपटीत, थेट, आकर्षक भाषेत, श्रोत्यांच्या भाषेत त्यांच्यापर्यंत पोहचवायचा असतो. विक्रेता आपला माल आकर्षक पद्धतीनं मांडतो तशी ओढ निवेदनातून निर्माण करायची असते. तर हा संवाद साधण्याचा बाज, थोडक्यात खूप सांगण्याची हातोटी, सोपे, साधे, नेमके शब्द. ही सगळी माझ्या कामाची मागणीच होती.

घरगंगेच्या जन्माला, तिच्या आकृतीवेधाला या सगळ्या गोष्टी खूप कारणी-भूत झाल्या. ललामभूत झाल्या असं वाटतं.

मला यश, नाव, लौकिक देणारे हे सगळे घटक मी माळी लावते. त्यांना वंदन करते.

काय नाही दिलं यांनी मला! सृजन धुंदी दिली . लेखन - भान दिलं, मंत्रचळेपणा दिला, खूप वाचक दिले. माझी मी कशी दिसते हे पहायला डोळे दिले. आत्मविश्वासाचा आश्वासक आशीर्वाद दिला. स्वत्वाची जाण दिली. यशाची खुशी दिली. महत्त्वाकांक्षेला खतपाणी दिलं. पावलांना ठोस आधार दिला. मान वर करून पाहण्याचं धैर्य दिलं ललाट रेषेवर नाव गोंदलं. 'लेखिका' म्हणून मरण्याची भाग्यरेषा रेखाटली.

ज्योत्स्ना देवधर

कौस्तुभ, १२०५/१-९ शिवाजीनगर, पुणे ४

# साहित्यातील आत्मभानाचे दिवस

– रमेश मंत्री

लेखक काय. राजकीय नेता काय किंवा अन्य कोणी काय, सहसा कोणताही दोष पत्करायला तयार नसतो. याला एकच अपवाद आहे. तो असा, की आत्मश्लाघेचा दोष मात्र सर्वजण मोठ्या हौसेने पत्करतात. 'आत्मश्लाघेचा दोष पत्करूनही मला असे म्हणावेसे वाटते' हे पालुपद लावले की लेखक स्वतःची वाटेल तेवढी प्रशंसा करायला मोकळा असतो. हा लेख लिहिताना मलाही हा दोष पत्करावा लागत आहे. कारण हा विषयच तसा आहे.

लेखक व्हावे असे मला लहानपणापासून म्हणजे मी दहावारा वर्षांचा होतो तेव्हापासूनच वाटत असे, पण तसे वाटण्याला स्वप्नरंजनापेक्षा फारसा काही अर्थ नसतो. मराठी चौथीत असतानाच मी गोष्टी लिहू लागलो. पण ते लिखाण अक्षरशः बालिश होते. मी कॉलेजच्या पहिल्या वर्षात असतानाच माझ्या कविता आणि कथा प्रसिद्ध होऊ लागल्या होत्या. अर्थात त्यांचे प्रमाण वर्षाला तीनचार एवढेच होते. तरी ज्या नियतकालिकांत ते प्रसिद्ध होत ती 'अभिरुची' 'सह्याद्री' आणि 'किर्लोस्कर' सारखी दर्जेदार मासिके होती. तरीपण माझे हे लिखाण प्राथमिक आणि प्रायोगिक अवस्थेतच होते. १९४९ साली माझे पहिले पुस्तक प्रसिद्ध झाले. म्हणजे माझ्याच खर्चाने ते मी प्रसिद्ध केले. मात्र माझ्या लेखनकर्तृत्वाबद्दलचा आत्मविश्वास निर्माण होण्याला १९६४ साल उजाडावे लागले.

१९५५ साली मी इंग्लंडला वृत्तपत्र व्यवसायाच्या शिक्षणासाठी गेलो. तेथील बौद्धिक वातावरणाचा माझ्या मनावर खोल परिणाम

झाला. 'ब्रिटिश म्युझियम ग्रंथालय' या जगातील सर्वश्रेष्ठ ग्रंथालयाचा लाभ, शिक्षणसंस्थेत आणि बाहेर नामवंत तज्ज्ञांची ऐकलेली भाषणे, लॉरेन्स ऑलिव्हिए, रिचर्ड बर्टन, व्हिव्हिअन ले, यांच्यासारख्या श्रेष्ठ अभिनेत्यांच्या भूमिका असलेली नाटके, इटालियन व फ्रेंच दर्जेदार चित्रपट यांचा एकत्रित परिणाम माझ्या जडणघडणीत झाला. इंग्लंडहून परत आल्यावर आपण आपले लेखन अधिक नियमितपणे व अधिक गांभीर्याने केले पाहिजे असे वाटू लागले. होय, विनोदी लेखनाकडे अधिक गांभीर्याने पाहिले पाहिजे हे मला पटले. १९५८ साली मी मुंबईच्या 'युसिस' या अमेरिकन सरकारच्या माहिती खात्यात कामाला लागलो आणि मला माझ्या लेखनाला योग्य असे वातावरण मिळाले. १९६१ पासून दोन वर्षे 'सचिवालयात हत्ती' 'आमच्या घरी सिंह येतो' अशा फॅन्टसीच्या प्रकारातील माझ्या कथा 'वीणा' मासिकात प्रसिकात प्रसिद्ध झाल्या आणि त्यांना उत्तम प्रतिसाद मिळाला. या प्रकारचे लेखन आपल्याला जमेल असा विश्वास वाटू लागला.

सुदैवाने 'वीणा'चे संपादक श्री. उमाकांत ठोमरे हे चोखंदळ संपादक आणि प्रोत्साहन देणारे स्नेही असल्यामुळे मला या कामी अधिक उत्साह आला. 'मोहिनी' चे अनंत अंतरकर यांनीही त्या-पूर्वीच माझ्यातील विनोदी लेखनाची चमक ओळखून मी या क्षेत्राकडे अधिक लक्ष पुरवावे असे सांगून माझ्या विनोदी कथा सातत्याने प्रसिद्ध केल्या होत्या. वसंत सरवटे यांच्यासारखा जाणकार रसिक स्नेही असल्याने त्यांच्याही अनुकूल प्रतिक्रिया उपकारक ठरल्या. अशा या आशावाद वाढविणाऱ्या वातावरणातच १९६४ साली 'सह्याद्रीची चोरी' ही माझी कथा 'वीणा' च्या वर्षारंभ अंकात प्रसिद्ध झाली आणि माझ्या लेखनात, प्रेरणेत ते महत्त्वाचे वळण (टर्निंग पॉइंट) ठरले. ही कथा म्हणजे मराठी विनोदी साहित्यातील एक मैलाचा दगड किंवा महत्त्वाचा टप्पा आहे असे अनेक रसिक तज्ज्ञांनी त्यावेळी

मत व्यक्त केले. त्यामुळे मला माझे स्वत्व गवसले असे मी म्हणणार नाही. कारण ते आधीच माझ्यात होते. मात्र आपले अशा तऱ्हेचे लेखन प्रभावी होते याचा वाढता साक्षात्कार मला यावेळी झाला. कारण १९५३ मध्येच माझा पहिला विनोदी लेख ' मोहिनी ' मासिकात प्रसिद्ध झाला होता. तरी माझ्या विनोदी लेखनात सातत्य नसल्याने ते फुटकळ लेख वाऱ्यावर विरून जात.

माझा आत्मविश्वास दुणावणारी माझी आणखी एक विनोदी कथा म्हणजे 'तुम्ही मांजर व्हा' हो ! दैनंदिन कटकटींना कंटाळून एक तरुण मांजर होतो आणि त्या जीवनातील गंमतीजमती अनुभवतो अशी या कथेची मध्यवर्ती कल्पना आहे. ही कथा ' किर्लोस्कर 'मध्ये छापून आल्याने तिला भरपूर प्रसिद्धी मिळाली. 'किर्लोस्कर 'च्या आजच्या स्वरुपावर जाऊ नका. पण १९६०–६५ चे किर्लोस्कर मासिक आत्ताच्यापेक्षा वेगळे आणि वाचनीय होते. ' तुम्ही मांजर व्हा ' या कथेचो कानडी, गुजराथी, हिंदी अशी अनेक भाषांतरे झाली. सध्या ही कथा बारावीच्या क्रमिक पुस्तकातही समाविष्ट करण्यात आली आहे. ' फॅन्टसी ' या प्रकारातील माझ्या नंतरच्या कथा म्हणजे ' सूर्याची पिले ' ' नामदेवाचा अणुबाँब,' ' दैनिक जंगल समाचार ' 'चोरीचे राष्ट्रीयीकरण' अशा अनेक होत्या. त्यातील चमत्कृती आणि ताजेपणा यानी मला खूपच लोकप्रियता दिली. फॅन्टसीचे कार्य दोन थरांवर असते. सर्वसामान्य वाचकाला कथानकातील चमत्कृतिपूर्ण व्यक्ती आणि प्रसंग यांचे अप्रूप असते, तर अधिक जाणकाराला त्यामागील गंभीर दृष्टिकोन आणि सामाजिक जाणीव यांचा साक्षात्कार होत असतो. ' सह्याद्रीची चोरी ' या कथेतील एक कवी आणि फौजदार हे कल्पकतेच्या दृष्टीने अगदी उलट गुण अथवा अवगुण अंगी असलेले समाजातील घटक त्यांच्यातील संघर्षाने विनोद निर्माण करतात तो सर्वांनाच भावतो. पण अधिक जाणकार वाचकाला त्यामागील सरकारी मख्खपणा आणि कवींच्या राज्याला वास्तवात स्थान नसल्याने त्याची होणारी ससेहोलपट यांचेही भान येते.

'सह्याद्रीची चोरी' हा माझा कथासंग्रह प्रसिद्ध झाल्यावर त्यावर उत्कृष्ट प्रतिक्रिया आल्या. त्यामुळे मला अधिक लिहिण्यास हुरुप आला. 'एका हाती टाळी' हा माझा विनोदी कथासग्रंह त्या पूर्वी प्रसिद्ध झाला होता, पण समीक्षकांचे लक्ष 'सह्याद्रीच्या चोरी'ने अधिक प्रकर्षाने वेधून घेतले. दिवाळी अंकांच्या संपादकांच्या मागणीत आता 'उत्तम विनोदी कथा पाठवा' असे स्पष्टपणे लिहिलेले असे. म्हणजे कोणत्या लेखकाकडून काय अपेक्षित असावे हे आता ठरून गले होते. त्या काळी मी बारा ते चौदा दिवाळी अंकांना विनोदी कथा देत असे. एका वर्षी तर 'हंस' आणि 'मोहिनी' या दोन्ही दिवाळी अंकात माझी कथा सर्वप्रथम छापली होती. हळू-हळू माझ्या विनोदी कथासंग्रहांनाही प्रकाशकांची मोठी मागणी येऊ लागली. मी मराठीत जास्तीतजास्त विनोदी कथा लिहिल्या आहेत असे मला वाटते. मी लिहिलेल्या विनोदी कथांची संख्या तीनशवर होईल. माझ्या सात विनोदी कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या असून हा प्रकारही मराठीत फारसा हाताळला गेलेला नाही.

माझ्या आत्मविश्वासात फार मोठी भर टाकण्याचे काम 'जनू बांडे'ने केले. १९६७ मोहिनीच्या दिवाळी अंकात मी ०००५ जनू बांडे ही कथा लिहिली. जेम्स बाँड या विख्यात गुप्तहेराचे हे विडंबन होते. त्या कथेचा इतका बोलबाला झाला की संपादक आणि वाचक यांनी मी अशाच आणखी जनू बांडे कथा लिहाव्यात असा आग्रह धरला. मग मी 'मोहिनी'तून जनू बांडे ही मालिकाच सुरू केली. ही मालिकाही अत्यंत लोकप्रिय होऊन गुजराथी आणि हिंदीतून ती प्रसिद्ध झाली. हिंदीतील 'धर्मयुग' या प्रचंड खपाच्या व दर्जेदार नियतकालिकातून ती प्रसिद्ध झाल्याने महाराष्ट्राबाहेरही ती वाचकप्रिय झाली. या मालिकेचे पुस्तकही निघाले आणि त्याला १९७२ चे महाराष्ट्र शासनाचे उत्कृष्ट साहित्याचे पारितोषिक मिळाले. नंतर 'जपानमध्ये जनू बांडे आणि 'पॅरिसमध्ये जनू बांडे' ही याच धर्तीची आणखी दोन पुस्तके मी लिहिली. 'जनूबांडे'च्या

यशानंतर आपण विनोदी लेखक झालो ही मला निःशंक जाणीव झाली. १९७९ साली नामवंत समीक्षक प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी तर मला असा ताम्रपटच दिला.

'रमेश मंत्री यांच्या कथांचा अवतार वाचकांची केवळ करमणूक करावी यासाठी नाही; तर करमणुकीबरोबर आणखी बरेच त्या साधून जात आहेत.

मंत्री यांच्या विनोदी लेखनात दोन परपरांची अनेकदा उत्तम प्रकारे सांधेजोड झाली आहे. 'सह्याद्रीची चोरी, 'सचिवालयात हत्ती.' 'आमच्या घरी सिंह येतो,' 'तुम्ही मांजर व्हा' यासारख्या त्यांच्या लेखनाने घेतलेले कथारूप जसे आकर्षक आहे तसेच तद्वारा समाजाच्या हाडीमासी खिळलेल्या काही आचारविचारांचे केलेले विडंबनही मोठे लक्षणीय आहे त्याला कथामूल्य आहे तसेच विडंबन मूल्यही आहे. खरे म्हणजे ते लेखन मूलतः विडंबनाच्या उद्देशाने झालेले आहे. तीच त्याची खरी प्रकृती आहे; ते मूलतः उपहासप्रधान आहे. परंतु उपहासप्रधान लेखनाला जी कळतनकळत बोचक धार असते ती मंत्री यांच्या लेखनाला कोठेच आलेली नाही ते अत्यंत दिलखुलासपणे, प्रसन्नपणे आणि खेळकरपणे झाले आहे.

मंत्री यांच्या उपहास विषयांची व्याप्ती फार मोठी आहे. तीत आजच्या मराठी नाटयसृष्टीला आणि हिन्दी चित्रपटसृष्टीला जसे स्थान आहे तसे यंत्रयुगातील मानवाच्या नशिबी येऊ घातलेल्या जीवनालाही स्थान आहे. मंत्री यांचा विनोद कोटित्वावर आधारलेला नाही. त्यांच्या विनोदात अतिशयोक्ती हीच वक्रोक्ती बनते आणि वक्रोक्तीचे कार्य करते मंत्री यांनी फॅन्टसीचा विनोद–निर्मितीसाठी केलेला उपयोग मराठीतील विनोद लेखनात अपूर्व आहे 'सचिवालयात हत्ती', 'तुम्ही मांजर व्हा,' 'आमच्या घरी सिंह येतो,' यासारख्या त्यांच्या अनेक लेखात त्यांच्या नवनिर्मितिक्षम कल्पकतेने मारलेली भरारी पहाण्याजोगी आहे या सर्व लेखनाचे विनोदमूल्य आणि कथामूल्य शतगुणित करण्याचे श्रेय त्यांच्या या अचाट कल्पकतेला आहे इतर ललित लेखनाप्रमाणे विनोदी लेखन हेही सर्जनच असते. आणि ते नवनिर्मितिक्षम कल्पकतेशिवाय अशक्य असते माणूस व त्याचे अनेक-विध व्यवहार यात आढळणाऱ्या विविध हास्यास्पद व्यंगांवर आणि विसंगतींवर प्रकाश टाकण्यासाठी ज्या प्रकारचे सर्जन आवश्यक असते त्या प्रकारचे सर्जन रमेश मंत्री यांची कल्पकता साधू शकते.

इतके झाल्यावरही मला आत्मभान आले नसते तर मी साहित्यात कोरडा शंखच राहिलो असतो !

(श्रीधर, हनुमान रस्ता, विलेपार्ले पूर्व, मुंबई ५७)

# लाटेमागून लाट येतच असते

— रवींद्र पिंगे

वयाची पंचविशी उलटेपर्यंत मी काही ठळक लेखन केल्याचं मला आठवतच नाही. पंचविशीनंतर लेखनाकडे डोळसपणे पाहायला प्रारंभ केला असंही नाही. मी माझं कनिष्ठ मध्यमवर्गीय आयुष्य जगण्यात तेव्हा दंग होतो. हाती लागतील त्या सरकारी नोकऱ्या पकडायच्या, त्या करता करताच शिकायचं, पैसे मिळवायचे, घरी द्यायचे, नि उरलेच तर मौजमजा करायची. असा धोपटमार्गी आयुष्यक्रम होता ह्या 'मौजमजा' प्रकरणात लेखनवाचना-चाही समावेश होता. चांगलं, सकस, साहित्य वाचण्याची तहान मुळातच होती. लिहिण्याचीही उर्मी यायची. आई वडील दोघेही प्राथमिक शिक्षक होते. त्यामुळे घरात विद्येचं वातावरण होतंच. शिवाय, थोडासा अनुवंशाचाही भाग असेल. माझे पणजोबा, ज्यांचं नाव दाजिबा होतं, ते गावठी कवनं लिहित असत. ते शेतकरी होते. नांगर धरत. होडी वल्हवत. गवत कापत. आणि शिवाय महारांना तमाशात गाण्यासाठी लावण्या लिहून देत. खेळयांना पदं लिहून देत. निसर्गाशी तद्रूप होऊन ते प्राणीमित्र शेतकऱ्याचं ओढगस्तीचं पण बाळबोध आयुष्य दक्षिण कोकणातल्या खाडीच्या काठावर उपळे ह्या गावी जगले. कवनं लिहिण्याची त्यांना लाभलेली ती देणगी कदाचित माझ्यापर्यंत झिरपत झिरपत आलेली असण्याची शक्यता आहे. अनुवंश सपशेल नाकारता येत नाही.

पंचविशीनंतरच्या काळात माझ्या आयुष्यात अनुकरणपर्व उजाडलं. इतरांची उदाहरणं पाहून, वाचून, मी किरकोळ स्फुटं लिहायला प्रारंभ केला. लिहायलाच कां लागलो त्याचं कारण मला उचंबळून आलं असं नसून लेखन मला त्यातल्या त्यात हाताजवळच नि सोपं वाटलं, हे आहे. लेखनामुळे चारचौघात आपलं नाव होईल अशी आशाही वाटली. लेखक असण्यात इज्जत आहे असंही वाटे. खेरीज, लेखन करणं निरुपद्रवीही होतं ! त्या काळातले माझे आदर्श म्हणजे आचार्य काका कालेलकर, कवि बोरकर, आणि मो. ग रांगणेकर ! आणि मित्र म्हणजे

गोपाळकृष्ण भोबे नि मंगेश पाडगावकर हे सगळे पट्टीचे लेखक नि एकजात सारस्वत. मीही सारस्वतच. बरं, त्या काळातले पहिल्या रांगेतले पु. शि रेगे, पु ल देशपांडे, विजय तेंडुलकर, सदानंद रेगे, ज्ञानेश्वर नाडकर्णी, वगैरे लेखनवहाद्दरही योगायोगाने सारस्वतच निघाले. त्यामुळे वाटलं, अरे वा, आपला जन्म अनायासेच लेखकांच्या जातीत झालेला आहे; आपण लिहिलं पाहिजे. आणि त्याप्रमाणे मी लिहायलाही लागलो. सारस्वतच असलेल्या चित्रकार दलालांनी मला पहिली जिदादील दाद दिली, हाही एक मधुर योगायोग.

लिहायला लागल्यामुळे मी धीट झालो नि सरसकट सर्वांच्या बैठकीत बसू लागलो. एकदा प्रा. न. र. फाटकांकडे गप्पा मारत बसलो असताना मी सहज विचारलं, 'काका, आम्हां सारस्वतांना ह्या पुढच्या काळात काही भवितव्य आहे काय हो ? मराठी समाजात आम्ही मूठभरसुद्धा नाही.' तर काका एकदम चमकून उद्गारले,

'अरे, काय बोलतोस ? तुमचा वंश हा सरस्वतीभक्तांचा वंश आहे. जस्टिस तेलंग कोण होते ? सारस्वतच न ? राष्ट्र उभारणीचा पाया खरं तर त्यांनी घातला. आपण रावसाहेब रानडयांना गंगोत्री मानतो. पण रानडेच म्हणत, 'आय ॲम तेलंग्ज मॅन !' म्हणजे तेलंगांच्या महात्म्याची कल्पना कर. सर रामकृष्णपंत भांडारकर आणि तेलग ह्यांनी सरस्वतीची सेवा निरपेक्षपणे केली. त्यांनी लिहिलं नसतं तर गीतेचा नि आद्यशंकराचार्यांचा काळ कोण ठरवणार होतं ? तेलंगांचं ते गणित चुकलं ते सोडा, पण त्यांनी हातात लेखणी धरून कालनिर्णय मांडण्याचं मूलभूत काम केलं. पुण्याच्या साहित्य परिषदेला पत्र लिहून कळवलं की तुम्ही विष्णुशास्त्र्यांची जन्मशताब्दी साजरी करता ते ठीक आहे पण तेलंगांना विसरू नका तो खरा ज्ञानी पुरुष होता. तसेच धर्मानंद कोसंबी. तुम्हा सारस्वतांची ती परंपराच आहे. तुम्ही मंडळी जन्मभर सेवा करणार. रावसाहेब मोरमकर घे, काशीनाथ रघुनाथ मित्र घे, अगदी रामभाऊ तटणीस नि अलिकडले रांगणेकरही घे, त्यांनी साहित्यात मोठंच काम केलं. आणि तुमच्या पु. ल. देशपांड्यांबद्दल तर काय विचारता? त्याने तर झेंडाच लावलाय ! पिंगे तू काही काळजी करू नकोस. तुम्हा सारस्वतांना मरण नाही !'

हा दणका ऐकल्यानंतर तर माझी बालंबाल खात्री झाली की वाङ्मयीन पुण्याई गाठीशी असलेल्या सदभिरुचिसंपन्न सारस्वत ज्ञातीत जन्म घेतलला मीसुद्धा एक नशीबवान लेखकच आहे नि यापुढे मी लेखन एके लेखनच



अनुक्रमणिका

केलं पाहिजे किंबहुना, अन्य काहीही करता कामा नये, फक्त लेखन केलं पाहिजे नि शक्य तर रांगणेकर कालेलकर, तेंडुलकर, वगैरेसारखं लेखन करता करता बेमालूमपणे नाटकाच्या फडातही उतरलं पाहिजे! अर्थात काका फाटकांचा डोस पोटात जाण्याच्या अगोदरही मी लेखनमग्न होतोच.

मागोमाग उमगलं की, माणसाने नुसतं लेखक असणं आणि त्याने चांगलं लेखक असणं, ह्यात पुन्हा अंतर आहेच! मी लेखन करतो हे ठीक आहे, पण अधिक चांगलं, सकस लेखन कसं करायचं? ती विद्या कुठे प्राप्त होईल?

इथे उपासनेच्या दृष्टीचा प्रश्न आला मी लेखनविद्येकडे उपासनेच्या भावनेने नि निष्ठेने पाहू लागलो. एकानेभरू लेखक म्हणजे दर्यामे खसखस. शेतात झाडावर बगळे बसलेले असतात तसे हरएक मासिकाच्या नि दैनिकाच्या फांद्यां-वर त्यांचे त्यांचे लेखक लटकलेले दिसतातच. त्यांना खास असा अर्थ नाही. आपण चांगलं, वेगळ्या घाटाचं, सकस आशयाचं, स्वतंत्र बाजाचं, आणि दुसऱ्यांच्या लेखनासारखं अजिबात नसणारं, असं, आपलाच संजीवक स्पर्श असलेलं गुणमंडित लेखन केलं पाहिजे, हे भान माझ्या चित्तात आपोआपच उमललं. अनुवंश आणि जात इथे लटके पडतील हेही लक्षात आलं. तो अभिमान गळून पडला. मी एकाकी झालो. आपल्या लेखनाला स्वतंत्र मुद्रा प्राप्त करून घेतल्याशिवाय लेखक म्हणून आपलं कल्याण मुळी संभवत नाही, हे भान मला आलं

त्याबाबतीत काही गोष्टी माझ्या फार पथ्यावर पडल्या. एक म्हणजे, कॉले-जच्या वर्गात बसून प्रोफेसरांच्या तोंडून मी मराठी साहित्य बिलकूल शिकलो नाही ही एक कृपाच झाली. नाहीतर रटाळ' टिपणांचा धनी झालो असतो. अर्थशास्त्र हा माझ्या पदवीचा विषय होता. ते शास्त्र मी धनंजयराव गाड-गीळांच्या नि मिनू मसानींच्या लेखनातून शिकलो आणि ललित साहित्य माझं मीच वाचू लागलो उत्तमोत्तम पुस्तकं, मासिकं माझ्या हाती लागली. लंडनचा बी बी.सी लिसनर, अमेरिकेचं 'सॅटर्डे रिव्ह्यू ऑफ लिटरेचर', लंडनचं 'टाइम्स लिटररी सप्लिमेन्ट', ऑब्झर्वर, स्पेक्टेटर, लंडन मॅगेझिन, एनकाऊंटरचे अंक, पॅरीशिअन रिव्ह्यू, असं रत्नखचित भांडार माझ्या हाती लागलं. ते वाचताना मी तहानभूक हरपून गेलो. खरं तर माझे ते कसोटीचेच दिवस होते. कमाल ओढाताण होई. मात्र साहित्यप्रेम अढळ राहिलं.

सकस तेवढं निवडून वाचायचं नि सदैव आनंदात राहायचं हे अंगवळणी पडलं. प्रभाकर पाध्ये, माधव मनोहर, सदानंद रेगे, उमाकांत ठोमरे, ही उत्तम वाचन करणारी मंडळी मला आयुष्यात योग्य वेळी भेटली. दिव्याने

दिवा लागतो हा अनुभव आला. दिशा उजळ झाल्या. हे सगळे पंडिती थाटाचे दिलखुलास लेखक सदैव नव्या नव्या पुस्तकांबद्दल उत्साहाने बोलत. सांगत. मी जीवाचा आटापीटा करून ती पुस्तकं मिळवे. वाचून तृप्त होई. खरोखर, पाध्ये, माधवराव, ठोमरे आणि पाडगावकर वगैरे भेटले हे सोन्याहून पिवळं झालं. सातत्याने केलेल्या दर्जेदार ग्रंथांच्या वाचनामुळे मी ताजा राहिलो; खुरटेपण माझ्या बाजूला फिरकलं नाही, आणि संपन्न आशय समर्थ लेखन-वीरांना कमी शब्दात कसा कलदार घाटात ओतता येतो तेही कळलं चेकॉव्ह, मॉम, विल्यम सारोयान, स्टाईनबेक, प्रिस्टले, वामनराव जोशी, काका कालेलकर, अशा कितीतरी लेखकांचं नि माझं जीवाभावाचं मैत्र जुळून गेलं त्यांच्यासारखं सदासुंदर असं मी फारसं लिहू शकलो नाही; मात्र तसं आपण लिहलं पाहिजे, फक्त सुंदर नि कसदार लिहिण्यालाच अर्थ आहे हे नवं मौलिक भान माझ्यात उदित झालं.

हे भान जागृत होताहोताच 'नियती' नावाच्या अजब शक्तीचंही मला आपोआप भान झालं. शिक्षक असलेल्या माझ्या वडिलांना त्यांच्या उतारवयात आकस्मिकपणे कर्करोगाने गांठलं नि आयुष्यातला अवघा आनंदच कोळमला. कशातच गोडी वाटेना. म्हाताऱ्या वडिलांचा हताश चेहेरा बघवेना नि डॉक्टर-मंडळीसकट आम्हा सगळ्यांचा पूर्ण निरुपाय! उत्तम ते औषधपाणी आम्ही केलं, पण ही लढाई आपण हरणार हे कळून चुकलं होतं. कशामुळे बाबांचं उरलं-सुरलं आयुष्य सुखाचं होईल ते मी माझ्यापरीने चाचपू लागलो. त्यापैकी एक उत्तर मिळालं:'चांगलं लिही, बाबांना संतोष होईल.' हे एकदा लख्खकन उमगलं नि लेखनाचं एक साहित्यबाह्य असं नवंच भान माझ्यात जागृत झालं. मग कोरा कागद घेऊन बसलं की, पहिला विचार नजरेसमोर यायचा, हे मी जे आता लिहिणार आहे ते वाचून बाबांना समाधान वाटेल नं? पुढे कालांतराने जरा-जर्जर बाबा जायचे तेव्हा गेलेच, पण मला एक निःशब्द समाधान देऊन, की मी लिहिलं त्याचा त्यांना नेहमीच परम संतोष झाला. 'कुमार गंधर्वांचं शांत-तृप्त जग', 'जगद्गुरूंचा सोवळा मठ', वगैरे माझे लेख वाचून त्यांना खूप खूप आनंद झाला होता. माझं लेखन हा त्यांचा, त्यांच्या अस्तसमयी आनंदाचा विषय होता.

मौज अशी की ज्यांच्या समाधानासाठीच मी इतकं धावूनधावून लिहिलं ते बाबा गेल्यानंतर तर मी दुप्पट, तिप्पट वेगाने, थोडं अधिकच कसदार नि फार सुंदर लिहिलं! कुठलं नवं भान जागृत झाल्यामुळे ही किमया घडली?

मला वाटतं, आपल्याकडून जास्तीत जास्त आशयसंपन्न असं लिहून नंतर त्यातून मोकळ होण्याचं आणखी एक नवं भान माझ्या अंतरी उदित झालं असावं. माणसांच्या तोंडदेखलेपणाचा कंटाळा आला. आपमतलवी व्यवहारांचा वीट आला वय वाढत चाललं. काळ सपत चालल्याची जाणीव झाली तसतसा उदड निसर्ग हृदयाला भिडायला लागला. मी देशभर अहोरात्र भटकलो. निसर्गाची अफाट रूपं बघितली. पक्षी, प्राणी निरखले. कोकणातल्या गावी देवदर्शनाला परतलो, त्याने अधिक शांत वाटलं. उत्तमोत्तम ते एकटक वाचलं. श्री. के क्षीरसागरांनी, गो. नी दांडेकरांनी आणि दि. बा. मोकाशींनी स्वेच्छेने आपले जन्म वाङ्मयानंदासाठी, लेखनकार्यासाठी वहाल केले, ते त्यांचं दान माझ्या चित्तात खोलवर रुजलं. जगाची मतं खुंटीला टांगून आपल्या पद्धतीने लेखकीय तोऱ्यात जीवन जगणारे प्रतिभावंत व्यकटेश माडगूळकर जवळून समजले. कुणालाही हिशोबात न धरणारे मिजाशी मंगेश पाडगावकर नि विनधास्त विजय तेंडुलकर, हे यशाचा टप्पा ओलांडून लौकिकाकडे कसे झेपावले तेही अगदी जवळून पाहिलं. दुसऱ्यांची उदाहरणं गिरवायचं हे माझं वय नव्हे. तरीसुद्धा ह्या साऱ्यांपासून उल्हास मिळतोच.

अखंड वाचनानेच खरं तर माझ्यातल्या लेखकीय भानाला टवटवीत ठेवलेलं आहे. असच वाचता वाचता एकदा मार्मिक प्रसंग वाचायला मिळाला. नोबेल पारितोषिकविजेता कादंबरीकार स्टाईनबेक लेखनातली उमेदवारी करणाऱ्या जॉन ओ'हाराला उपदेश करता झाला.

'मित्रा, लिहून अजरामर होण्याचं स्वप्न कधीही पाहू नकोस. लेखन किंवा लेखक अजरामर होतात हा भ्रम आहे. ज्याचा त्याचा काळ असतो. तेव्हा, तुझ्या हातात असलेल्या लेखनातूनच तू जास्तीत जास्त आनंद शोधून घे. त्यात गुंत. त्यासारखं सुख नाही.'

ह्या उपदेशानेही मला क्षणात एका नव्याच भानावर आणलं. लेखकाचा कायम टिकणारा लौकिक हे एक मृगजळ आहे. शिळेपणाचा वास न मारणारा एखादा चेकॉव्ह, एखादा घरंदाज हरिभाऊ, किंवा एखादा भेदक मर्ढेकर हे उदाहरणापुरते ठीक आहेत. तो नियम बिलकूल नव्हे. साहित्यात तरी सर्वसाधारणपणे कालचा आज बासा होतो नि आजचा उद्या गैरलागू ठरणार आहे त्याला मी तरी कसा अपवाद असेन ? हे एकदा लक्षात आलं की कसलाही आव न आणता लेखक झुकलेल्या फुलासारखा नम्र होतो.

आता मी माझ्या आनंदासाठी, हातात असलेल्या चालू लेखनात जीव गुंतवून लिहितो मला कसलाही विषय पुरतो, फक्त शक्यतर तो आतून

कुठून तरी सुचावा लागतो. बारीकसारीक अनुभवसुद्धा मी शब्दात बांधून ठेवतो. कुठे काही चांगलं वाचलं, पाहिलं, अनुभवलं तर ते टिपून ठेवतो मी लिहिलेले माझ्या प्रियजनांनाही आवडलं तर माझा आनंद द्विगुणित होतो. समजा आवडलं नाही तर तेवढ्यामुळे खंतावत नाही. उपेक्षा करून पुढच्या लेखनाकडे वळतो. लिहून पैसेही सुटतात, परंतु पैशासाठी लिहिलं आणि त्याचा आनंद झाला, असा अनुभव नाही. हातून एकात्म, निरागस, सकस, अल्पाक्षरी नि ऐटदार लिहून होणं हा दैवी प्रसाद असतो. तो लाभावा लागतो. तो मागून मिळत नाही नि मिळायचाच असेल तर तो टळत नाही, हे स्वानुभवातून फुललेलं एक नवं भान माझ्या सध्याच्या लेखकीय जीवनात उजाडलं आहे. त्यामुळे वखवख संपली.

(रवींद्र पिंगे जयविजय सोसायटी, हनुमान रोड, विलेपार्ले ,पूर्व मुंबई ५७.)

# दिवस 'रानातल्या कवितां'चे

**—ना. धों महानोर**

रानातल्या कवितांचे दिवस म्हणजे अंदाजे असं मी धरून चालतो की पुस्तकरुपाने त्या येण्याच्या आधीची दोनपाच वर्षे आणि त्यानंतरची दोनपाच वर्षे.

खरं म्हणजे त्या कविता पळसखेडला शेतात घरी लिहून झाल्यावर किंवा लिहित असताना ह्यांचं काही होईल असं मुळीच डोक्यात नव्हतं इतका मी साहित्यजगापासून दूर अनोळखी होतो.

थोडंबहुत संबंध दोनपाच लोकांशी यायचे त्यानिमित्ताने बाहेर जायचो. विशेषत: 'प्रतिष्ठान' मधून चार कविता : रानातल्या अशा नावानं १९६२–६३ च्या दरम्यान आल्या रसिकांचे लक्ष एकाएकी महानोरकडे गेले. ओळख नसताना समकालीन चांगल्या कवींची, लेखकांची पत्रं आली आणि मला हुरूप आला. १९६२ च्या सुमारास परभणी येथे मराठवाडा साहित्य संमेलन होते. तिथे करंदीकर, बापट, पाडगावकर, कान्त यांच्या सोबत मराठवाड्यातील बऱ्याच कवींनी कविता वाचल्या खूप प्रयत्न करूनही मला कोणी व्यासपीठावर कविता वाचू देत नव्हतं. नरहर कुरुंदकरांनी आणि इतर एकदोघांनी सांगितलं की याचा जरी कवितासंग्रह प्रकाशित झालेला नसला तरी अस्सल रानातली ह्याची एकतरी कविता ऐका. शेवटी मी व्यासपीठावर गेलो. एक कविता वाचली. त्याबरोबर सभागृहानं टाळ्यांचा कडकडाट केला. आणखी कविता वाचा अशी श्रोत्यांकडून मागणी झाली. लोकाग्रहास्तव पाचसात कविता वाचाव्या लागल्या. सभागृहानं मला डोक्यावर घेतलं. एक बारका पोरसवदा शेतकरी तरुण महाराष्ट्राचा कवी झाला, असं सर्वांनी लिहिलं

अशीच दोनचार वर्षं गेली.

मौज, पॉप्युलर, देशमुख, लेखनवाचन भांडार वगैरे प्रकाशकांकडून कवितासंग्रह मी त्यांना द्यावा म्हणून पत्रव्यवहार झाला. श्री. पु. भागवत यांनी

आपल्या हस्ताक्षरात माझ्या प्रकाशित सर्व कवितांच्या पहिल्या ओळींचा क्रम देऊन यादी तयार करून पाठवली आणि अप्रकाशित कविता मागवल्या. असेच सर्वांचे. वा ल. कुलकर्णी यांनी माझ्या कवितांचा संग्रह पॉप्युलर प्रकाशनच्या रामदास भटकळ यांना देऊन टाकला.

१९६० ते १९६६ असा रानातल्या कवितांचा सहा वर्षांचा लेखनकाल. कोण ह्या छापणार आणि त्यांने होणार काय असे मनात असतानाच १९६७ साली 'रानातल्या कविता' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. महाराष्ट्रातल्या लोकांनी ते अक्षरशः डोक्यावर घेतले. त्या वर्षाचे केशवसुत पारितोषिकही मला मिळाले. माझ्या कवितेवर खूष झालेल्या अनेक कविलेखकांशी संबंध आला. सुर्वे, आरती प्रभू, दिलीप चित्रे, पुरुषोत्तम पाटील, म. मि. देशपांडे, मधुकर केचे अशा त्या काळातल्या नव्या परंतु खूप चांगलं लिहिणाऱ्या कवींनी स्वतःच्या लेखनासंबंधी लिहावं बोलावं आणि काव्यवाचन करावं अशी एक कल्पना शेतात काम करताना डोक्यात आली. त्याच रात्री मी औरंगाबादला चंद्रकांत पाटील याजकडे गेलो. तो आंबेडकर कॉलेजच्या वनस्पतिशास्त्र प्रयोगशाळेत सापडला. त्याला ही कल्पना सांगितली. तो म्हणाला, नेमकं हेच माझ्याही डोक्यात आहे. म्हणून मी लिहून काढलं. हे करता येईल. पण मासिक, पैसा इ. जमवाजमव करायला हवी.

मग उत्साहात आम्ही वा. ल. कुलकर्णी आणि प्रतिष्ठानचे संपादक सुधीर रसाळ यांना भेटलो अनायासे केशवसुत जन्मशताब्दीचे ते वर्ष होते. प्रतिष्ठानचा कविता विशेषांक काढण्याचे ठरले. दोनतीन महिने त्या नशेत व धावाधावीत गेले. अंक चांगला निघाला

पॉप्युलरतर्फे मुंबईत रामदास भटकळांनी सुर्वे, ग्रेस आणि मी अशा तिघांचं काव्यवाचन ठेवलं त्या कार्यक्रमाला जुन्या नव्या पिढ्यांतले चांगले लेखककवी हजर होते. मला पहायला व खेड्याबद्दल प्रश्न विचारायला आलेले लोकही बरेच होते मी दिलेली उत्तरं लोक लिहून घेत होते हे बघून मला आनंद वाटला. नवलही वाटलं. तो कार्यक्रम छानच रंगला. आमच्या रानानं मुंबईला वेड लावलं. दोनतीन दिवस भेटीगाठी आणि चर्चापरामर्श यात गेले.

'तुमच्या कवितांनी दिवाळीच नव्हे तर आमचं सारं वर्ष साजरं झालं' असं पु ल नी लिहिलं. इतरांचीही पत्रं त्या काळात आली. कुसुमाग्रज बोरकर यांनी पत्रंच नाही पाठवली, माझ्यावर लिहिलं देखील. अगदी मनापासून. त्याची चांगली झिंग मला चढली. हा वाया गेलेला मुलगा काहीतरी गमतीनं

लिहितो असं घरच्यांना वाटायचं पण आता या कौतुकानं, घरातही माझ्या–बद्दलचा आदरभाव वाढला.

शेतीत त्यावेळी मला खूप कष्ट करावे लागत. बारा पंधरा ताससुद्धा अडकून जायचो. बऱ्याचदा शेतात राहायचो. १९६८ ची गोष्ट. शेतात एक नवी विहीर खोदणं चाललं होतं. माणसं घरी गेली. मी विहिरीतलं पाणी काढून घेऊन बारी देऊन छोटं खळं होतं. तिथे घाम पुसत आलो. अंडरपँट बनियनवरच होतो.

गावाकडून दोनजण आले होते. मी त्यांना नमस्कार केला. त्यांनी ओळख सांगितली आणि महानोर यांना भेटायचंय असं म्हटलं मी म्हणालो, मीच महानोर. ते पुन्हा म्हणाले—नाही, आम्हांला मालक पाहिजेत. कवी महानोर. मला काहीच कळेना. मी पुन्हा त्यांना सांगितलं—माझे वडील आताच घराकडे गेले. मी त्यांचा मुलगा. कवी महानोर मीच. ते अविश्वासानं म्हणाले, 'तुम्ही कविता लिहिता ?' मी हो म्हणालो. थोडा वेळ ते काहीच बोलले नाहीत एवढा हडकुळा, अंडरपँट बनियनमधला हा थकलेला पोरगा—हा तिथला मजूर असणार असा त्यांचा ग्रह होणे साहजिक होते. पण नंतर मात्र रात्रभर कविता आणि गप्पा रंगल्या.

असं बऱ्याच वेळा व्हायचं.

खूप लांबून लांबून माणसं यायची माझ्या खेड्यात, घरात, शेतात खूप गैर-सोयी असतानाही अनेक मोठी माणसं येऊन गेली. राहिली. रानातील कविता प्रकाशित झाल्यावर वेड्यासारखी पत्रं येत गेली आणि माझं रान हे साऱ्या महाराष्ट्राचं घर झालं. माघ पौर्णिमेला रात्री अकरा बारा वाजता मोसंबीच्या झाडांमध्ये कवी बोरकर कविता म्हणत नाचले. मीही त्यांनी सांगितलेल्या कविता तिथे वाचून दाखवल्या. पु. ल. देशपांडे, सुनीताबाई हे ह्या रानात आले होते. त्यांनीही अनेक कविता वाचल्या, असा हा अनेक चांगल्या आठवणींचा काळ. पायी फरफटत भर उन्हात करंदीकर—पाडगावकरांना मी रानात नेलं. शेतात कविता ऐकवल्या.

नंतरची आठदहा वर्षं मी महाराष्ट्रात खूपखूप फिरलो. लोकांनी, रसिकांनी जीवापाड प्रेम केलं. त्या काळात सर्वात जास्त काव्यवाचनाचे कार्यक्रम माझेच झाले असतील. एकदा मी साहित्य संमेलनात म्हटलेल्या कविता ऐकल्यावर, अडीचतीन वर्षांच्या राधा या मुलीनं माझी 'हिरव्या पानात' ही कविता तशीच म्हणून दाखवली, आणि सर्वांना थक्क केलं. मिरजेच्या इनामदारांकडची ती

मुलगी होती देशभर मी फिरलो. रानातल्या कविता पाठ असलेली मंडळी पाहिली आणि आयुष्य खरोखरी हिरवं झालं. नंतर सर्वच रसिक माझ्या सुदैवानं रानातले झाले त्यात यशवंतरावांपासून लता मंगेशकरांपर्यंत सारे आले. शेतमजूरापासून कोरड्या कवितेशिवायच्या माणसाचीही कविता माझी झाली. खूप चर्चा झाल्या. परिचय झाले रानातल्या कवितांनीं आयुष्याला नवं वळण दिलं. त्या काळात मी माझी जपणूक केली. सगळं केलं. पण कवितेला जीवापाड जपलं.

त्यावेळी आपली एक गोष्ट फारच त्रासाची होत होती. काहींनी रानावर एवढं प्रेम केलं होतं की माझं लग्न कधीच लहानपणी झालेलं, पुन्हा आता शक्य नाही हे सांगणंही अवघड. दोनपाच वर्षे ते त्रास देऊन गेलं. असं पुष्कळ.

—ती आठदहा वर्ष खूप भ्रमंती झाली. इतरांच्याही कविता मला खूप पाठ असल्यानं त्याही मी म्हणून दाखवत असे. दोनतीन पिढ्यांमधल्या कवींनी एकत्र कविता वाचन करणं. चर्चा करणं, अनियतकालिक ( असो, वाचा, शब्द, अथर्व) आणि सत्यकथा, प्रतिष्ठान इ. वाङ्मयीन मासिकातील वादग्रस्त लेखां-वर चर्चा व व्यासपीठ यांचा तो जमाना होता. १९६८–६९ मध्ये विजया राजाध्यक्ष यांनी सत्यकथेत माझ्या कवितांवर एक प्रदीर्घ लेख लिहिला. त्यावर चर्चाही अनेक ठिकाणी झाली. अनेक ठिकाणी माझ्या मुलाखती घेतल्या गेल्या. कवि–लेखकांत मतभेद जरूर होते, पण निकोप सडेतोड चर्चा करणारी अनेक व्यासपीठं होती. त्यांचा मला फार उपयोग झाला. अलीकडे ही व्यासपीठं कमी झाली आहेत. निर्मळ लिहिणंबोलणं कमी झालं आहे.

पुढं पुढं ग्रामीण भागातूनही आमंत्रणं येऊ लागली. ज्या खेड्यामधल्या शेतीवाडीवर, माणसांच्या भावभावनांवर, सुखदु:खांवर लिहिलं, त्यांनाही ही कविता तेवढीच आपलीशी व सोपी वाटली. पुष्कळदा शेतीच्या माझ्या घरच्या कामांमुळे अशा आमंत्रणांना मी नकार देत असे. पण खेड्यातले लोक रानातल्या कवितांच्या प्रेमात इतके की कार्यक्रम पत्रिकाच छापून आणून ठेवत आणि आता तुम्ही नाही आला तर गांवात तोंड दाखवायला जागा राहणार अशी गळ घालत. नाना तऱ्हांनी आग्रह धरीत. तो मोडणे जीवावर येई

एकदा पाचोऱ्याजवळच्या एका गावी जायचं होतं. त्या गावाची आधी काहीच माहिती नव्हती. पूर्वी गेलेलो नव्हतो. मी आणि माझा मित्र जळगाव–पर्यंत बसनं गेलो. मधेच नदीला पूर म्हणून बस थांबली. कार्यक्रमाला जाणं

तर जरूर. खूप शेतकरी जमणार होते. दोनतीन तासांनी पाणी कमी झालं पण बस जाण्याच्या दृष्टीने ते जास्तच होते. शेवटी कमरेवरच्या पाण्यात आम्ही उतरलो अन् पुढे निघालो. पण पाण्याला ओढ फार होती. गटांगळ्या खात, पूर्ण ओले होऊन कसेवसे पार झालो. अलीकडे एक ट्रक होता. त्यातून कसेवसे त्या गावी पोचलो. लोक आमची वाटच बघत थांबलेले. कंटाळलेले. आम्ही आल्यावर मात्र सर्वांचे चेहरे आनंदले. बैलगाड्या, ट्रॅक्टरमधून आलेले ते लोक. पुरुषांइतक्याच बहुसंख्येनं स्त्रियाही आलेल्या.

दोन तासावर मी कविता वाचत होतो, आणि त्या लोकांकडून अपूर्व दाद मिळत होती. ते त्या कवितांनी भारावून गेले होते तृप्त होत होते

तो हुरूप, ती मस्ती आजही विसरता येत नाही.

आजही त्याच उत्साहानं लोक बोलावतात, पण ती सर येत नाही, त्यांच्यां-तही आणि माझ्यातही, कुठेतरी मरगळ आली आहे. थंडपणा, कंटाळा आला आहे.

ना. धों. महानोर,
(पळसखेड व्हाया–अजिंठा, जिल्हा-औरंगाबाद.)



अनुक्रमणिका

# माझे जीवन–माझ्या साहित्याचा आधार

– शंकरराव खरात

आपल्या देशात शतकानु–शतके दलित–अस्पृश्य समाज गावागावातील गाव-तटाच्या–गाववेशीच्या बाहेर अस्पृश्यतेचं भयानक जीवन जगत होता. तसेच माझ्याही गावी अस्पृश्य–समाज अस्पृश्यतेमुळे हिनतेचं–खालच्या पायरीचं, दुःखी दरिद्री जीवन जगत होता. अस्पृश्य म्हणून तेच जीवन माझ्या घरच्या बरोबर माझ्याही वाटयाला आले. अस्पृश्य म्हणून ते जीवन मी जगलो, भोगले व अनुभवले. त्या जीवनातील व्यथा, वेदना व दुःखातून मी गेलो. तेच अस्पृश्य दलित म्हणून जगलेलो, भोगलेले व अनुभवलेले जिवंत जीवन ललित स्वरुपात कथा–कादंबरीच्या रुपात (फॉर्ममध्ये) लिहून वाचकांपुढे मांडावे–ठेवावे याच अंतरीच्या उर्मीने मी ललित–साहित्याकडे वळलो.

खरंतर मी माझ्या वयाच्या ३५ व्या (पस्तीसाव्या) वर्षी 'सतूची पडीक जमीन' या नावाची पहिली कथा लिहिली. ती कथा १९५६–५७ च्या 'नव-युग'च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली. त्यानंतर 'रामा–महार' ही वलुतेदाराची कथा माझ्याच घरात घडलेल्या प्रसंगातील अनुभवावर लिहिली. त्याकाळी या दोन्हीही कथा गाजल्या.

मला माझ्या जीवनात वेगवेगळया स्तरावर वेगवेगळया जगात विलक्षण अद्‌भूत अनुभव आले, भोगले. तसेच माझ्या गावच्या गावतटाबाहेरील 'महार–वाडयात' दैनंदिन जीवन भोगले आहे. ते मी रोजच जगलो आहे. ते जगत - भोगत मी वाढलो. त्याचबरोबर गावकुसवाच्या आतल्या जीवनाचाही मला पुरेपूर अनुभव आला. त्यातही मी जगलो व वाढलो आहे. माझ्या वडिलांच्या गैरहजरीत मी एक महार - गावकामगार म्हणून गावकीचं काम केलं आहे. गावच्या चावडीत दिवसा वशा' (रखवालदार) म्हणून चावडीच्या पुढं झाडाखाली दिवस उगवल्यापासून दिवस मावळेपर्यंत बसलो आहे. तसेच रात्री 'जागल्या' (रात्रीचा रखवालदार) म्हणून रात्रभर वाचमनचं-रखवालदाराचं

काम केलं, रात्री रामोशी व इतर गावकीच्या महाराबरोबर गावात 'गस्ती'च्या फेऱ्या मारल्या आहेत. गावकीचा महार म्हणून गावातील, शिवारातील, मळ्या-वस्तीवरच्या शेतकऱ्यांना, शेतपट्टी थकदारांना राना-वनात पायपीट करून त्यां थकदारांना चावडीवर आणले आहे. शेतपट्टीच्या वसुलाचे बंदे रुपये वाजवून, कस लावून घेण्यासाठी गावच्या सोनाराला चावडीत आणले आहे. गावात शाळेत असताना मला गावकीच्या कामांमुळे अशा व जागल्याच्या कामामुळे गावच्या घरादारांची ओळख झाली आणि त्याचबरोबर गावातील बलुतेदार व आलुतेदारांचीही चांगली ओळख झाली मी त्यांच्या खूप जवळ गेलो. त्यातील काही बलुतेदारगडी यांची माझ्या शीणेची मुलं, माझ्या सलगीची, माझ्या खेळामेळातली झाली. यातील काही रामोशी, न्हावी, भाट, परीट व लोहार अशा बलुतेदार गडी - मुलांच्या बरोबर गावच्या कुरणात रानावनात शिकारी खेळलो. गावच्या गाव - शिवेवरच्या जत्राउरसात रात्ररात्र उजडत घालविली. गावातल्या या बलुतेदार - आलुतेदार जातीतल्या सोबत्यात मी पूर्ण रमलो होतो. त्यांच्याच पैकी एक झालो होतो. गावकीच काम करताना, बैल्याची कामं करताना, रानात, शिवारात गावकीच्या कामासाठी पायपीट करताना त्यांच्या घरादारांची ओळख झालीच. त्याचबरोबर माणसांची अंतरगही कळाली. गावाच्या खालच्या - वरच्या पांदीतली झाडं-झुडपं, वाटेवरचे खडक-दगड आणि आधी-मधी आडव्या येणाऱ्या ओघळी, ओढे-नाले मनात पक्के रुजले. उन्हाळा-पावसाळयातील त्यांचे बदलते रंगरूप डोळयापुढे सतत राहिले होते.

'रामा महार' या गावच्या बलुतेदाराची—माझ्या वडिलांचीच कथा लिहिताना माझ्या मनःचक्षूपुढे माझा सगळा गांव—शिवार उभा होता, त्यावेळी मी एका वेगळयाच धुंदीत होतो. आणि त्याच धुंदीत मी त्या मंतरलेल्या दिवसातील इतर संगती—सोबतीच्या बलुतेदारांच्या कथा 'नवयुग.'च्या अंकात लिहिल्या. त्यातून माझा 'बारा बलुतेदार' हा पहिलाच कथासंग्रह प्रकाशित झाला.

माझे वडील गावकीचं काम करणारे एक महार गावकामगार. ते गावकीच्या कामालाच डांबले होते. चोवीस घंटे गावकीचे काम. त्यात पूर्वी गावचा महार दोन घरचा चाकर. एक गावच्या रयतेचा व दुसरा सरकारी गावकीचा—सरकारचा.

महाराच्या गावकीच्या-गावगाडयाच्या कामाला वेळ-काळ नव्हता. बारान बारा चोवीस घटे, त्यांच्या दारात—चावडीवर कामाची हाक आली की हजर पाहिजे.

माझ्या वडलानं तर गावकीचं काम रात्रन दिवस केलं. ऊन, पाऊस म्हटला नाही की, थंडीवारा पाहिला नाही. ऊन–पाऊस, थंडी–वारा यात्रावत तक्रार केली नाही. नांगराला जुंपलेल्या बैलागत भर्डीवाऱ्यात, ऊन–पावसात रात्री–बेरात्री गावकीचे काम केली. मग चावडीवर वगा–जगल्याचं काम असो की गावकीचं टपाल परगावला पोचवायचं असो, का गात्री आलेल्या वरच्या अंमलदाराच्या तैनातीला हजर राहायाचं काम असो, अशी गावकीची काम त्यांनी केली.

त्यातच महार गावकामगाराच्या कामाची अशी यादीही नव्हती. त्यानं पाटील–तलाठ्याचे गावची कामं करायची. वरचा अधिकारी गावी आला तर त्याच्या तैनातीला हजर पाहिजे. गावाला डॉक्टर यायचा म्हटला का त्याची दौंडी गावात द्यावी लागे. मग गावकीचं टपाल, तालुक्याच्या खजिन्यात गावच्या वसुलाचा भरणा घेऊन जाणं हे आहेच. म्हणजेच महाराच्या कामाला यादीच नव्हती. सांगेल ते काम व अंगावर पडेल ते काम त्याने केलं पाहिजे.

अशातच हे गावकीचं काम कुणी करावं? असा त्यात काही नियम नव्हता. घरात गडी असेल तर त्याने, तो नसेल त्यांच्या मुला–बायकोनं, तेही नसतील तर त्याच्या सूनेनं. जो घरात असेल त्यानं अंगावर आलेली गावकीची कामं केली पाहिजे. असा गावकीच्या कामाचा दंडक होता. त्यामुळेच माझे वडील घरी नसतील तर आईला गावकीचं काम करावे लागे. माझ्या आईबरोबर असाच मी कवाकवा गावकीचं टपाल घेऊन सात–आठ, सात–आठ मैलावरच्या गावाला गेलो आहे. कवाकवा वडलांच्या बरोबर. रात्री जागल्यांच्या कामाला (सोबतीनं) गेलो आहे. आणि माझ्या आई–वडिलांच्या गैरहजरीत तर मी गावकीची अंगावरची कामंही केली आहेत.

त्यातच गावच्या वाटणीच्या रयतेचं काम हे वेगळंच. त्यांच्या घरी मयत झालं तर मढ्याची लाकडं, गोवऱ्या टाकायच्या व मयताचा सांगावा घेऊन गावोगावच्या त्यांच्या नातेवाईकांना पोहचता करावा लागेल. कधी कधी उपाशी पोटी. विन अन्नपाण्याचंही. मग अशाच रयतेच्या घरी लग्नकार्य, सण-उत्सवाच्या प्रसंगी महारानं हजर राहून लाकडं फोडण्यापासून इतरही कामाची सेवा-चाकरी करावी लागे. वर्षात रयतेची अशी एक का अनेक कामे निघत. त्यात महार गुंतून पडत होता. वडील-आईच्या बरोबरीने मलाही कामाला हातभार लावावा लागे. गावचा महार असा गावकीच्या व रयतेच्या कामात रात्रंनदिवस भरडला जात असे. तोच अनुभव माझ्या आई-वडलांचा होता. गावी शाळेत असताना मलाही त्याच चाकोरीतून कवाकवा जावे लागले.

होते. याच गावकीच्या कामाच्या, गावकीच्या महाराच्या जीवनावर मी १९५७-५८ साली 'माणुसकीची हाक' या नावाची कादंबरी आचार्य अत्रे यांच्या नवयुगच्या दिवाळी अंकात लिहिली होती. माझ्या या कादंबरीला मी माझ्या आई-वडलांबरोबर केलेल्या गावकीच्या कामाच्या अनुभवाचा पक्का आधार होता. त्या कादंबरीच्या संदर्भात (त्यावेळी) नवयुगच्या संपादकीयात माझ्याबद्दल सुरवातीलाच परिचयादाखल असे म्हटले होते की-

'महाराष्ट्राच्या ग्रामीण जीवनाचे हृदयभेदक चित्रण पोटतिडकीने करणाऱ्या लेखकांत श्री. शंकरराव खरात यांचा दर्जा पहिल्या प्रतीचा मानावा लागेल. विशेषतः अस्पृश्यांच्या यातनांचे व हालअपेष्टांचे हृदय पिळवटून टाकील असे वर्णन त्यांच्या इतक्या प्रभावीपणे यापूर्वी क्वचितच लिहिले गेले असेल. त्यांच्या लिखाणाला वास्तवाचा व प्रत्यक्ष अनुभवांचा जिवंत आधार लाभला आहे. साधी, सरळ, कसदार आणि भावनांनी गहिवरलेली अशी त्यांची शैली आहे. 'माणुसकीची हाक' त्यांची ही पहिलीच कादंबरी होय.'

माझी ही कादंबरीही त्या काळात चांगली गाजली. मला माझ्या पहिला कथासंग्रह (बारा बलुतेदार) व पहिली कादंबरी (माणुसकीची हाक) यामुळे मला माझी वाट सापडली आणि साहित्याची वाट ही माझी खरी वाट असा मला विश्वास वाटू लागला. माझा मलाच हा शोध लागला.

असं सांगण्याचे कारण त्याकाळी मी एक सामाजिक कार्यकर्ता होतो. त्याचबरोबर मी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या 'दलित फेडरेशन' या राजकीय पक्षाचा महाराष्ट्र-प्रांतिकचा संघटक सेक्रेटरी होतो. राजकीय पक्षाचे कामासही मी महाराष्ट्रातील जिल्ह्या-जिल्ह्यात, तालुक्या-तालुक्यात आणि प्रसंग पडेल तसा, गावोगावी जात होतो. दलितांच्या सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक प्रश्नांची पहाणी करत होतो. खेडोपाडी दलितांच्यावर होणाऱ्या अत्याचारांचे निवारण करण्यासाठी, त्यांना योग्य ते कायद्याचे पोलीस संरक्षण मिळवून देण्यासाठी सतत झटत होतो. त्यातच मी धंद्याने वकील (अॅडव्होकेट) असल्याने अत्याचारग्रस्त दलितांना कोर्ट-कचेऱ्यात त्यांच्या बाजूने कायद्यांची मदत देत होतो. त्यांचा वकील म्हणून त्यांची कोर्टातली कामेही पहात होतो. अशा रीतीने एक सामाजिक कार्यकर्ता व राजकीय पक्षाचा एक पदाधिकारी म्हणून, दलितांच्या व्यथा-वेदना, त्यांच्या आशा-आकांक्षा जाणून घेत होतो, त्यांच्या प्रश्नांशी एकरूप होत होतो. परंतु राजकीय पक्षात, राजकीय क्षेत्रात प्रामाणिकपणे, निष्ठेने, कर्तव्यभावनेने काम करणाऱ्या कार्यकर्त्यांच्या वाट्याला जी निराशा

येते, तीच माझ्याही वाट्याला आली. तरीही सेवाभावाने मी सामाजिक कार्य करीत राहिलो.

त्यातच मी वर म्हटल्याप्रमाणे मला माझ्या पहिल्या कथासंग्रहाने व पहिल्या कादंबरीने साहित्याच्या प्रांतात एक साहित्यिक म्हणून चांगलाच आधार दिला. साहित्याची वाट मला सापडली. आणि हीच माझी खरी वाट असा विश्वासही वाटू लागला .. त्यामुळेच मी राजकीय पक्षाच्या कामातून निवृत्त झाल्यासारखा झालो. एक साहित्यिक म्हणून मी माझी आयडेंटिटी टिकवावी या दिशेने पुढची वाटचाल करू लागलो.

अर्थात मी साहित्याचा विद्यार्थी नव्हतो. समाजशास्त्र, राज्यशास्त्र व इतिहास अशाच विषयाचा विद्यार्थी, अभ्यासक होतो. त्यामुळे मी मराठी ललित साहित्य विशेष असे वाचलेले नव्हते. साहित्यिकाच्या दृष्टिकोनातून त्यांचा अभ्यासही केलेला नव्हता. त्यातच इंग्रजी ललित साहित्याचा तर माझा संबंधही नव्हता. ते मी वाचलेले नव्हते.

अशा अवस्थेत मी मराठी ललित साहित्यात एक कथा–कादंबरीच्या आधारावर प्रवेश केला. ही खरी परिस्थिती. साहित्यिक होण्याची माझी तशी महत्त्वाकांक्षा नव्हती. आणि साहित्यिक होण्याच्या पूर्ततेसाठी इतरांप्रमाणे मी तसे परिश्रमही केलेले नाहीत. हे खरेच.

पण एक ललित लेखक म्हणून मला माझ्या पहिल्या कथासंग्रह व कादंबरी–नंतर सत्त्व गवसले. माझ्यात तशी जाणीव निर्माण झाली व आत्मविश्वासही वाढला. याचे कारण मी माझ्या जीवनात वेगवेगळ्या जगातले अद्‌भुत अनुभव वाट्यास आले ते ते जीवन मी भोगले, दलित, आदिवासी, भटक्या–विमुक्त जमाती, भूमिहीन मजूर, झोपडपट्टीवाले, फुटपाथवाले गुन्हेगारी जग, अशा वेगवेगळ्या जगात मी वावरलो. वागलो आहे. माझ्या ललितकृती–कथा–कादंबरीही माझ्या जीवनातील एक आत्मकथाच आहे. बारा बलुतेदारांप्रमाणेच माझ्या इतर कथासंग्रहातील पात्रे ही माझ्या जीवनात जवळकीने आलेली माणसे आहेत. ती वेगवेगळी माणसे माझ्याशी बोलली आहेत. मीही त्यांच्याशी पुन्हा पुन्हा बोललो आहे. ती माझ्या घरी आलेली आहेत. मीही त्यांच्या घरी–दारी गेलेलो आहे. ती माझ्या घरी येऊन राहिलेली आहेत. मीही त्यांच्या घरी, वस्तीवर, पालावर जाऊन राहिलो आहे. मुक्काम केला आहे. तेव्हा तेव्हा मला त्यांच्या जीवनातील अस्पृश्यता, दारिद्र्य, अज्ञान हे दिसले आणि त्याचबरोबर त्यांनी सांगितलेल्या, भोगलेल्या व्यथा, वेदना माझ्या काळजाला भिडल्या आहेत. त्या एकदाच नाही तर पुन्हा पुन्हा. खरं तर ते आणि मी जिवाभावानं एकच

झालेले होतो. त्यांच्या जीवातील वेदनांना, आशा आकांक्षांना, त्याच्या जीवनातील संघर्षाला मी माझ्या कथा—कादंबरीतून वाट काढून दिली. आपल्या कथा—वेदना मोकळ्या मनानं सांगताना मलाच ते शेवटचा प्रश्न टाकतात—'आता तूच सांग आम्ही कसं जगावं ?' त्यांची ती अंतरीची वेदना, जगण्यासाठी चाललेला जीवन—संघर्ष, ऐकून मीच अस्वस्थ होतो. त्यातूनच. माझी कथा—कादंबरी जन्माला येते. आणि त्यातूनच अदृश्य अशा माणसांचे दर्शन घडते.

हाच खरा-जिवंत अस्सल अनुभव-अनुभूतीचा मी भोगलेला, जगलेल्या वास्तव अनुभवाचा माझ्या कथा-कादंबरीचा मूळ आधार आहे. त्यामुळे माझ्या ललितकृतीच्या जन्मासाठी मला इतर काही परिश्रम घेण्याची गरजच वाटली नाही. माझ्या कथा-कादंबरीला मला मिळालेल्या अनुभव-अनुभूतींनंच आकार, रूप दिलेलं. माझ्या अनुभवानेच त्याला फॉर्म (रूप) व नॉर्म (आदर्श) दिलेला आहे.

माझे प्रसिद्ध झालेले ललित वाङ्मय-कथा, कादंबऱ्या व ललित लेख माझ्याच जीवन अनुभूतीतून साकारलेले आहे. अनुभवाचे ढग भरून यायचे व त्यातून पाणी बरसायचे...

मी जीवनात भोगलेल्या, जगलेल्या अनुभवाची नदी पाऊस काळात भरून वहाते, तशी वाहात होती पण मला ते सगळे पाणी अडवून अजून तरी माझ्या वाङ्मयीन लेखनात वळवता आले नाही. त्यासाठी माझी सतत धडपड चालू असते. त्यात मी मग्न असतो..

शंकरराव खरात,
१२, विजय सोसायटी, गणेशखिंड रस्ता, पुणे १६

# पहिल्या वाटेवरचा प्रवास

—व दि. कुलकर्णी

'केशवसुत आणि स्वर्गसमक्षता' हा माझा पहिला समीक्षा-लेख प्रसिद्ध झाला: फेब्रुवारी १९५६ मध्ये 'नवभारत' मासिकात. या आधी मी ललितलेखनच करीत असे. समीक्षालेखन करावं असं मनात क्वचितच येत असे. विज्ञानविषयक काही लेखन मात्र मी आवडीनं करी पण खरं प्रेम होतं ते सर्जनशील लेखनावर. मात्र हे सारं लेखन स्वतःसाठीच असे. त्याचं प्रकाशन तर जाऊच द्या, पण खाजगी मित्रमंडळीत वाचनही झाले नव्हते. १९५६ नंतर मात्र चित्रं पार पालटलं. मी समीक्षालेखनच करीत राहिलो आणि अपवादानंच ललितलेखन प्रसंगोपात माझ्या हातून झाले. १९५६ ला म्हणजे वयाच्या तेहत्तिशीत मी प्राध्यापक झालो आणि समीक्षात्मक बोलणलिहिणं हे नित्याचंच होऊन बसलं. आता सेवानिवृत्तीनंतर ललितलेखनानं पुन्हा उचल घेतली आहे, ते वेगळं. माझ्या विशीतिशीतल्या ललितलेखनाची आता थोडीफार ओळख करून द्यायला रकत नसावी.

वार्शीच्या सुलाखे हायस्कूलमधून मी १९४० साली मॅट्रिक झालो. मॅट्रिक-नंतर मी पुण्यात फर्ग्युसन कॉलेजमध्ये आलो. आलो ते पुण्याच्या साहित्यिक-सांस्कृतिक मोहानं, विद्याप्रेमानं आणि विशाल जीवनाच्या ओढीनं. दुसऱ्या महायुद्धाचा तो काळ होता. जर्मनीनं फ्रान्सची मॅजिनो तटबंदी एका दिवसात पार उद्ध्वस्त केली होती. जर्मनी युद्ध जिंकणार असं सर्वांना वाटू लागलं होतं. कॉलेजमध्ये मुलांनी भराभर जर्मन भाषा ऐच्छिक म्हणून घ्यायला सुरुवात केली. मीही घेतली. पण माझा उद्देश वेगळा होता. मला शास्त्रज्ञ व्हायचं होतं, संशोधक व्हायचं होतं व त्यासाठी जर्मन भाषा यायला हवी होती.

मी शास्त्रशाखेत नाव घातलं. पहिलं वर्ष छान गेलं. मी सर्व तुकड्यात दुसरा आलो.

पुढं युद्धाचे वारे वादळी झाले. दुसऱ्या वर्षी इकडं १९४२ च्या भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाला तुफान वेग आला. 'छोडो भारत'ची गर्जना देशभर

घुमत राहिली. कॉलेज जीवन विस्कळीत झालं. ते विस्कटलं. ते पार उध्वस्त झालं. आंदोलन सपलं मुलं परत कॉलेजमध्ये येऊ लागली. बुडलेला अभ्यास भरून काढू लागली. खाजगी शिकवण्या लावून, स्पेशल कोचिंग क्लासला जाऊन अतंच काहीतरी करून–करवून. मला ते शक्य नव्हतं. ग्रंथालयातील पुस्तकांवर माझी गुजराण चाले. जेवण एका दानशूर व्यक्तीच्या घरी मोफत मिळे. कसब्यातून पायी फर्ग्युसनला आयच व परतायचं. हाती पैसा नाही. अशा अव–स्थेत मा 'इन्टर सायन्स' कट्टाकट्टी शेकडा ३५ गुण मिळवून उत्तीर्ण झालो.

पुढं बी. एस्सी. ला पदार्थविज्ञान आणि गणित हे विषय घेतले. सुटीत अभ्यास भरून काढायचा आणि मग उत्तम गुण मिळवून प्रथम श्रेणी व पारि-तोषिकं पटकावयाची ही ईर्षा ! पण इन्टरला प्रयोगशाळेस अंतरलो होतो. त्याचा परिणाम पुढं भोगावा लागला. प्रयोगशाळेत पदोपदी अडखळू लागलो. तशात डोळ्यांनी दगा द्यायला सुरुवात केली सरकत्या सूक्ष्मदर्शकाखाली अंकांचं मापनही करता येईना कसातरी सबसिडियरी गणिताला बसलो आणि पुढ काय करायचं, याची चिंता करीत राहिलो.

तशात माझे मिळवते थोरले बंधू वारले. त्या धक्क्यानं वडीलही आम्हांस सोडून गेले. मृत्यूनं जीवनाचा मार्ग 'असा' मोकळा करून दाखविला. इकडं युद्ध पेटलेलच होतं देहू रोड, खडकी, वानवडी इथं लष्करी, निमलष्करी गुदामं, ऑफिस उघडलेली होती. अर्ज घेऊन जायचं आणि रोजंदारीवर कामाला लागायचं, असा जमाना होता. आज इथं, तर उद्या तिथं, परवा आणखी कुणी-कडं, असं करीत 'खूप खूप पाह्यलं, अनुभवलं, माणूस पाहिली, माणूस पाहिला, माणुसकी पाहिली, अमानुषताही अनुभवली' Everything is fair in Love & War चा प्रत्यय पदोपदी येत होता पोटाला विश्रांती नव्हती, ते थांबत नव्हतं, घर चालू ठेवायचं होतं.

पण हे चालू असताना माझं वाचनही चालूच होतं. देहूरोडला ऑफिसमध्ये फारसं काम नसे. मालगाडी यायची, यार्डमध्ये जायचं, वॅगनचे नंबर्स टिपायचे, त्यातल्या मालांची यादी पाह्यची व माल उतरवून घ्यायचा, रिपोर्ट द्यायचा. हे दीड–दोन तासांत संपायचं. मग सारा वेळ मोकळाच असायचा. शेलारवाडीला सी. पी. डी. त (सेंट्रल प्रोव्हिजन डेपोत) असताना मी चक्क जवळच्या टेकडीवरील शिवगुंफेत जाऊन गणित आणि पदार्थविज्ञान यांचा अभ्यास करीत असे. बी. एस्सी. चा नाद अजून सुटलेला नव्हता. (पुढं सारंच सोडावं लागलं.) आपलं शिक्षण आता कायमचं संपलं, असं ठामपणे वाटलं. पण विद्येचं प्रेम, अध्ययन–अध्यापन–संशोधनाचं प्रेम मनात होतं. ते जळून जात नव्हतं. ते



अनुक्रमणिका

मरायला तयार नव्हतं. मी पुढं शाळेत नोकरी धरली इन्टर सायन्सच्या जोरावर त्यावेळी सायन्स ग्रॅज्युएट मिळत नसत. मिलिटरीत ते व्ही. सी. ओ. (व्हाइसरॉय कमिशन) घेऊन जात.

पाच वर्षात माझ्या सात शाळा झाल्या. पुण्यात शिकवलं, खेड्यांत गेलो, महाराष्ट्राबाहेर कराचीलाही गेलो. मध्येच आम्ही काही मित्रमंडळींनी पुण्यात स्वतंत्र शाळाही चालवून पाहिली. एकूण शाळेचं तंत्र आणि वातावरण ध्यानी आलं तिथंही काही खरं वाटेना. शिकलं पाहिजे खूप शिकलं पाहिजे नोकरी केली पाहिजे, हे खरं; पण शिकलं पाहिजे, हें त्याहून अधिक खरं आहे, तेच तेवढं खरं आहे, एवढंच पटलं. पटत राह्यलं. पुन्हा शिकायला सुरुवात केली. शास्त्रशाखा सोडली, कलाशाखेकडं आलो. इन्टर आर्टपासून पुन्हा प्रारंभ झाला. १९४९ मध्ये वयाच्या पंचविशी–सव्विशीमध्ये !

ही मधली पाचसात वर्षं वाया गेली, पण ती तशी वाया गेली नाहीत. जगण्याच्या विविधरूपी, विविध स्तरावरचा भरपूर अनुभव मिळाला. आपण कोण ते कळलं. आपला खरा आनंद कशात आहे, ते पक्केपणी समजलं. विद्यार्जन आणि विद्यादान यात आपलं अंतिम सुख आहे, याची खूणगाठ मनात बांधली गेली, आणि त्या मार्गानं मग मी झपाझप निघालो या मधल्या काळात कुठल्याही परीक्षेचा काच माझ्यामागं नव्हता. मी हवं ते वाचू शकत होतो. तसा मी मुक्त होतो. अभ्यासक्रमाची सक्तीची ठरीव चाकोरी नव्हती, की काही बंधन नव्हतं.

मी खूप खूप वाचलं. टागोर वाचले, फिट्जरेल्ड वाचला, खलिल जिब्रान वाचला. शेक्सपियरची, इब्सेनची बरीच नाटकं वाचली. 'किंग लियर' पेक्षा 'हॅम्लेट'नं मला वेड लावलं. तुकारामाच्या अभंगांतल्या चरणांप्रमाणं हॅम्लेटमधली वचनं ओठावर खेळू लागली. टेनिसनपेक्षा शेलीवर खरं प्रेम जडलं. वर्ड्स्वर्थ आणि ब्राउनिंग दोन शैलीदृष्ट्या दोन टोकाचे कवी पण दोघेही माझे आवडते झाले. हार्डीच्या कादंबऱ्यात मी रमलो; पण शरदबाबूंनी माझ्या काळजाचा कब्जाच घेतला. ते दिवस शरदबाबूंचे होते. पण या काळात मी मराठी फार थोडं वाचलं. कविता तेवढी वाचली नाटकांत गडकऱ्यांची तेवढी नाटकं वाचली. पण ते दिवस माझे कवितेचे होते. पुण्यात यशवंतांची कविता त्यांच्या कंठातून अनेकदा ऐकली. गिरीशही ऐकले. यशवंतांची 'आई' पेक्षा 'दैवते मायतात' ही कविता मी पुनःपुन्हा गुणगुणत असे. माधव जूलियन यांच्या 'विरहतरंगा'चं वाचन – नाट्यपूर्ण वाचन - कितींदा केलं असेल, ते सांगता येणार नाही. कथा – काव्य आणि

माटच एक रुपानं तिथं प्रत्ययास येतं. तांबे यांची कविता पहिल्यापेक्षा अधिक आनंद देऊ लागली. टागोरांच्या गार्डनर मधील कितीतरी कवितांचा मी गद्यानुवाद केला. मीही तसं काहीसं स्वतंत्रपणे लिहू लागलो. अशी छंदोबद्ध गद्यकाव्यं त्या काळात खूप लिहिली. 'कमलपत्रे' या नावानं ती मी एकत्र संगृहीत केली माझ्याच साठी. आजही अशा १००–१२५ कमलपत्रांचं हस्त-लिखित मधूनमधून मी चाळतो, वाचतो, आणि चाळीस वर्षांनी तरुण होतो. खांडेकरांच्या, काणेकरांच्या रूपककथांचा मोह त्या वेळेच्या नवोदित तरुण लेखक-कवींना जबरदस्त होता. मीही तसलं काहीसं लिहिलं होतं. वानगीदाखल एकदोन लिखितं इथ देतो–

मूर्तिकार<br>
मी मूर्तिकार !<br>
दगडाचा देव करण्याचं सामर्थ्य माझं !<br>
मग असं का ?<br>
साधं फूल—ना त्याला रंग, ना रूप, ना सुगंध–<br>
देव मात्र त्याला आपल्या मस्तकावर धारण करतो–<br>
नी मला ?<br>
मला उंबरठा ओलांडून आत येण्याची ही बंदी ?<br>
सारी फूलसृष्टी नामशेष करायला तो उठला.<br>
गवतातलं एक साधंच फूल त्याला म्हणालं–<br>
'तू मूर्तिकार !<br>
दगडात तुला मूर्ती दिसते, पण मूर्तीत तुला देव दिसत नाही<br>
तुझ्याजवळ 'कला' आहे–<br>
माझ्याजवळ 'भाव-भक्ती आहे !<br>
मी मूर्ती करणारा<br>
नी फुलं मूर्ती भजणारी !

२ मे १९४२ ची ही रूपक-कथा. भांबुर्डा स्टेशनवर (शिवाजीनगर) लोकलची वाट पहात फलाटावर उभा होतो, तेव्हा झालेली. ही कथा पुढे 'गुंजन' नावाच्या हस्तलिखितात सन्मित्र भालचंद्र खांडेकर यांनी घेतली. (ते त्यावेळी फर्ग्युसनच्या वाडिया ग्रंथालयात नोकरीस होते.) प्रा. रा. श्री. जोगांना ही रूपक कथा आवडली. पण 'आता आलंकारिक चमत्कृतीपेक्षा वास्तवाधिष्ठित कथांकडे वळणे बरे–' असे त्यांनी हसून समजावले. तरीपण हा नाद लवकर सुटला नाही. टागोरांच्या 'गीतांजली' पेक्षा 'गार्डनर'चा मोह अनावर होता.

'जे बोलण्यासाठी म्हणून'

त्यातील एक 'कमल–पुष्प' आपल्या हाती असू द्या–

'जे बोलण्यासाठी म्हणून तू आलीस तेवढंच मात्र तू गाळलस. जे जाणण्यासाठी म्हणून तू आलीस ते न जाणताच तू परत चाललीस.

माझ्याशी तुला इतकी बोलायचं असतं की तू मूक राहतेस, तुला इतकं हसायचं असतं की तू गंभीर बनतेस. मला भेटायला म्हणून तू येतेस आणि क्षणातच 'मी जाते' म्हणून तू निघतेस, पण उंबरठा ओलांडताना मागं वळून 'मी जाते' असं जेव्हा तू पुन्हा म्हणतेस, तेव्हा तू 'जातेस की येतेस' हे जाणताना मला मोठी मौज वाटते.

आज तू पुन्हा आलीस. साधीच आलीस. माझ्याशी काहीतरी गूढ बोलण्याचा धीर धरून आलीस. पण शब्दाशब्दाला तू किती अडखळलीस! तू जे बोललीस ते मला काहीच समजल नाही; तू जे बोलली नाहीस, ते मात्र सर्व काही उमजलं. तू बोलून दाखवलं होतंस. पण....

तुझी नजर ओळखूनही मला भावपूर्ण नेत्रांनी तुझ्याकडं पाहता येणार नाही. तुझ्या स्वभावसौंदर्याच्या अनिर्वचनीय माधुर्यानं मी आकृष्ट झालो असलो तरी... तरीही माझी दृष्टी तटस्थ रसिकाचीच असेल. मी व्रतस्थ आहे...

हे तुला कसं समजलं ? हे तुला समजणं आवश्यक आहे. फार फार आवश्यक आहे !

२७ मे, १९४६ चं हे कमलपुष्प आहे. अशा कमलपुष्पांना १९४६ च्या वसंतऋतूत खूपच बहर आल्याचं आता ध्यानात येतं.

ह्या काळातच रवीन्द्रनाथांच्या स्ट्रे बर्डसचेही मला विलक्षण आकर्षण होतं, मराठीत इकडं खांडेकर सुभाषितं आणि उपमा–रूपकं यांचा आपल्या कथाकादंबऱ्यांतून खच पाडीत होते. टागोरांच्या 'स्ट्रेबर्डस्'मध्ये सुभाषितांचा खजिनाच हाती लागला. मी असे खूप 'स्ट्रे–बर्डस्' माझ्या लेखनवाटिकेत मुक्तपणे विहरले.

'प्रत्यक्ष प्रेमापेक्षा प्रेमाच्या कल्पनेनंच
मनाला जास्त वेड लागतं !'

हा ४ आक्टोबर १९४६ चा माझा एक स्ट्रे–बर्ड ! माझ्या कमलपत्रांचं रहस्य व्यक्त करणारा !

Love is an idea.
It is this idea that we love !'



अनुक्रमणिका

'हा त्यानंतरचा एका वर्षानं पुन्हा भेटलेला तोच स्ट्रे-बर्ड. जरा इंग्रजीतला ! अशा चातक–चकोर पक्ष्यांनी माझ्या वहीची कितीतरी पानं भरून गेली आहेत ' लव्ह विदाउट एक्स्पेक्टेशन इज डिव्होशन हे माझं सूत्र होतं निरपेक्ष प्रेमाची प्लेटॉनिक आत्मिक प्रेमाची मातब्बरी वाटावी, असा तो काळ होता. आणि प्लेटॉनिक लव्ह ही जीवघेणी अवस्था असावी, यांची जाणही असणारा तो काळ होता. प्रीती आणि भक्ती यांचे मोह कमी अधिक होत जात–आंदोल घेत राहत त्यासाठी चातक–चकोरांची आणखी काही गीत पाहू–

- प्रेमानं जखडविण्यापेक्षा मायेनं माणसं जोडावीत,
  असंच माझं मन मला नेहमी सांगतं.
- तिच्याकडं पाहण्याची माझी सरळ दृष्टी
  निमिषमात्र जरी चोरटी बनली, तरी
  हे जग मला चोराच्याच मोलानं वागवील.
- 'प्रेम हे निरपेक्ष असू शकेल काय ?' –हा प्रश्न कोणीच कोणाला विचारू नये त्याचं खरं उत्तर ज्याचं त्यालाच माहीत असतं.
- 'प्रिया, काव्य म्हणजे रे काय ?'
  'वेडे, प्रिया म्हणजे काय, ते सांगशील का प्रथम ?'

हे चातक–चकोर केवळ प्रेमकल्पनेनंच वेडे झाले होते, असं नाही. जीवनाचा गंभीर अर्थही ते अधूनमधून सांगत होते.

- देह नटविण्यापेक्षा तो राबविण्यात अधिक सौंदर्य आणि अधिक सुख आहे.
- बुद्धीनं समाजाला सुखसमृद्धी देता येते; पण हृदयानं व्यक्तिव्यक्तीला सुखी–समाधानी करता येतं.
- वर्तमानाचा पाणउतारा भूतानं करू नये आणि भविष्याची बेफिकिरी वर्तमानानं दाखवू नये; कारण ती एकाच अनंत काळाची अपत्यं असतात.

मी माझ्या पत्रांना 'कमलपत्रं' असं म्हटलं आहे, तर माझ्या या त्रुटित पर्णांना 'चातक–चकोर' असं नाव दिलं आहे. अजूनही मधूनच केव्हा तरी नवनवे चातक–चकोर थव्यानं माझ्या मनोमंडलात घिरट्या मारून जातात.

या माझ्या जुन्या–पुराण्या लेखनवहीच्या शेवटच्या पानावर पुढील नोंद आढळते. ती खूप काही सांगून जाते. माझ्यासंबंधी, तसंच माझ्या काळातल्या तरुण–तरुणींच्या प्रेमसंकल्पनेसंबंधी, मानसिकतेसंबंधी.

न पाठवलेली पत्रे... माझी मानसपत्रे...

अनसीन् अँड अनरेक्गनाइज्ड बाय एनडीयरिंग आइज
अँड लव्ह रेडिएटिंग फेस.

या कमलपत्रांच्या, त्यावेळच्या प्रत्येक लेखनकृतीच्या शेवटी 'आनंदार्पणमस्तु' असं मी लिहीत असे. गडकऱ्यांच्या 'ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ'चं ते अनुकरण असावं. 'वैजा' या टोपण नावानंही त्यातलं काही लेखन केलेलं आहे. हे नाव कसं पडलं ते काही केल्या आता मला स्मरत नाही.

ह्या काळात मी अनेक इंग्रजो कवितांचे मराठी पद्यानुवाद केले. इंग्रजी कथांची भाषांतरं केली. इंग्रजी कविता केल्या. त्यातलं दुर्दैवानं, (खरंतर सुदैवानं) आता क्वचितच काही सापडतं. इंग्रजीतही बरीच 'स्ट्रे–वर्ड्स्' आहेत. एक नमुना–

लाइफ इज ए ग्रेव्ह बॅटल
व्हाय ?
अवर हेड फाइटस वुइथ अवर अदर हार्ट

रवींद्रनाथ टागोरांच्या दि सुप्रीम नाइट या भावकथेचं मी समरसून भाषांतर केलं. ते दिवस आणि त्या रात्री अजून आठवतात. टागोर आणि शरदबाबू जणू एकजीव होऊन ही कथा जन्मली त्या काळातलं आमचं झपाटलेपण या कथेत सापडावं. हे भाषांतर अजूनही वहीत सुखरूप आहे. पण अशी भाषांतरे थोडीच.

माझं मन स्वभावतःच रमलं ते मराठी आणि इंग्रजी गद्य भावकाव्यांत किंवा भावात्मक गद्यात. टागोरांच्या 'गार्डनर,' 'गीतांजली'. 'क्रिसेंट मून'मध्ये. स्वामी रामदासांचं (आनंदाश्रम, रामनगर) 'इन क्वेस्ट ऑफ गॉड' हे पुस्तक तर माझं मुखोद्गत झालं होतं.

हा काळ १९४४–४८ चा. या ४–५ वर्षांत ज्या माध्यमिक शाळेतून मी शिकवलं त्या शाळा काही बेताच्या, तर काही उच्च प्रतीच्या अशा होत्या. शाळा कधीही असो, मला कधी इंग्रजी चवथी–पाचवीपेक्षा वरच्या वर्गावर शिकवण्यास मिळालं नाही. माझे अध्यापनाचे विषयही विज्ञान, गणित आणि भूगोल असे होते. मला विज्ञानाची आवड होती (अजूनही आहे.) त्यामुळं मी अवांतर पुस्तकं आणि साहित्य खूप वाचत असे. दि अॅप्रोच ऑफ लाइफ, एव्हरी-बडीज् बुक ऑफ फॅक्टस व्ही टाइम्स ऑफ इंडियाने प्रकाशित केलेली पुस्तके

माझ्या हाताशी नित्य संदर्भासाठी असत. लिव्हिंग बॉयोग्राफीज् ह्या सेरीजमधील शास्त्रज्ञाच्या चरित्रावरील पुस्तकानं माझ्या मनाची पकड घेतली. त्याच वेळी गॅलिलिओचं एक चरित्रही वाचनात आलं आणि गॅलिलिओमधील शास्त्रज्ञ आणि अगतिक मानव यानं मनात कुठतरी घर केलं. मी त्यावर खूप विचार करू लागलो. यातूनच माझी 'गॅलिलिओ' ही पुस्तिका निर्माण झाली. पुणे अनाथ विद्यार्थिगृहानं आपल्या स्वाध्यायमालेत ती प्रकाशित केली. माझं हे पहिलं वाङ्मयअपत्य; जगाचा प्रकाश पाहिलेलं. १९४८ मधलं. यातील कथनपद्धतीचं आणि भाषाशैलीचं त्या वेळी बरंच कौतुक झालं. त्यातील एक उताराही एका अभिप्राय–लेखात उदधृत केला गेला. दुर्बिणीचा शोध लावल्यानंतरची मनःस्थिती वर्णन करणारा तो परिच्छेद असा –

'चंद्रावर पर्वतांच्या रांगाच रांगा नि खोल दऱ्याखोऱ्या पाहाताच गॅलिलिओला अवर्णनीय आंनद झाला. हर्षातिरेकानं तो वेडाच झाला. विश्वनियंत्यानं दूर ठेवलेली ही माणिकमोत्ये आज त्याने मिळविली. मानव पापी आहे. त्याच्या हाती ही विश्वाची मोहक दौलत पडू नये म्हणून तिला ईश्वरानं अंतराळी टांगून ठेवली, पण ही अप्राप्य दौलत 'आज मी जिंकली' म्हणून गॅलिलिओला केवढा आनंद झाला असेल याची कल्पना करणंच अशक्य! अमेरिकेचा किनारा पाहताक्षणी कोलंबसाला तरी इतका आनंद झाला असेल की नाही, याची शंका आहे! जीवनात एखादी क्षुल्लक गोष्ट जिंकताच आपली मुद्रा किती आनंदून जाते. साधे पत्ते खेळताना आपण डाव जिंकला तर 'दे टाळी' म्हणून ओरडतो. मग येथे तर ईश्वराशी खेळत असलेल्या ह्या अज्ञेय डावात जिंकताक्षणीच कोणत्या मानवाचे हृदय हर्षाने भरून येणार नाही?"

माझं मन सुखावलं होतं. सूर्यमालेतील ग्रहांवर अशाच पुस्तिका लिहायचं मी ठरवलं. स्वाध्याय–माला ती प्रकाशित करणार, हेही निश्चित झालं. डार्विनच्या उत्क्रांतिवादावर एक पुस्तिका मी तयार केली. पण गांधी वधाच्या जाळपोळीत अ. वि. गृहाचा 'लोकसंग्रह छापखाना' जळून खाक झाला पुढं मलाही विज्ञानशाखेकडं जाणं अशक्य झालं. मी कला शाखेकडं आलो, आणि माझे हे सारे लेखनसंकल्प विरून गेले. कायमचे. त्यातील कसलंच हस्तलिखित मिळत नाही; सापडत नाही. मन अजूनही विज्ञानाकडं कधी कधी अनावरतेनं

खेचलं जातं. आता मी स्वत:ला विज्ञान–साहित्यात रमवतो त्यावरील चर्चासत्रं, परिसंवाद आयोजित करतो, भाग घेतो. पण ही आता फावल्या वेळची ऐच्छिक वाट ठरली आहे. माझ्या पहिल्या प्रकाशित समीक्षा–लेखाआधीचं एकुलतं एक प्रकाशित लेखन म्हणजे माझं 'गॅलिलिओ' हे पुस्तक; त्याचा मला आजही अभिमान वाटतो, अजूनही ते खूप सुख देतं.

पुढं महाराष्ट्र साहित्य परिषदेशी माझं नातं जडलं. परिषदेनं मला माझा मार्ग दाखविला, आणि तोच कायमचा झाला. याचा अर्थ त्यां आधीचा मी कुणी वाट चुकलेला प्रवासी नव्हतो. वाट खुंटल्यामुळं रस्ता बदलून दुसरीकडं मी वळलो इतकंच ! दुसरी वाट पहिलीशी कधी समांतर तर कधी भेटती–मिळती असते !

(डॉ व. दि. कुलकर्णी
सुहासिनी, बी ब्लॉक, तुळशीवागवाले कॉलनी पर्वती पुणे ९)

---

साभार स्वीकार : काव्यसंग्रह

१ चरित - केशव मेश्राम आंबेडकर प्रबोधिनी, ५ हाजीकासम चाळ, अमरशेख मार्ग, मुंबई ११. १–१९८९. पृष्ठे ५१, ३५ रुपये

२ जीवन चिंतन - डॉ. म. गो देशपांडे, मृत्युंजय प्रकाशन, ९७८ शिवाजी नगर, पुणे १६ १–१९८९ वीस रुपये

३ सोविएत भावकविता – निरंजन उजगरे, शलाका प्रकाशन, अंधेरी, मुंबई ५८ १ – १९८९ चाळीस रुपये

४ चित्कळा – इंदिरा. मौज प्रकाशन, मुंबई ४ १ – १९८९ पृष्ठे १०० छत्तीस रुपये

५ हुंदका – बाबुराव गायकवाड स्वयंदीप प्रकाशन, १९९/७८८८ कन्नमवार नगर, विक्रोळी पूर्व, मुंबई ८३. १–१९८८ पृष्ठे ५९ पंधरा रुपये

६ प्रवासी पक्षी – कुसुमाग्रजांच्या कविता संपादक शंकर वैद्य, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४, पृष्ठे १०६, २५ रुपये

७ सलामी–एम एम भरणे, अनिता प्रकाशन १०४ अजिंठा नगर परभणी ४३१४०१ पृष्ठे ४६ दहा रुपये

---

# मी लेखक कसा झालो ?

— म. श्री दीक्षित

पुण्यापासून जवळ असलेल्या भीमेकाठच्या खेड येथील गरीब ब्राह्मण कुटुंबात माझा जन्म. बारातेरा वर्षापर्यंतचं रम्य ते बालपण तिथेच गेलं. माझा स्वभाव लहानपणापासून भावनाप्रधान, चौकस आणि चळवळ्या. लेखक व्हायला एवढं अल्प भांडवल पुरेसं होतं तथापि लेखक होण्याची वयाच्या विशीपर्यंत मला इच्छा नव्हती, तशी आकांक्षाही नव्हती. १९३८ साली शिकायला म्हणून मी भावाकडे नागपूरला राहू लागलो आणि माझ्या खेळकर - खोडकर जीवनाचा प्रवाह एकदम बदलला. १९३८ ते ४४ मार्च अशी जवळजवळ सहा वर्षे शिक्षणाच्या निमित्ताने मी नागपुरात होतो. हिस्लॉपसारख्या मिशनरी शाळेतून मी मॅट्रिक झालो आणि पुढली दोन इंटरआर्टस्पर्यंतची वर्षे हिस्लॉप कॉलेजमध्येच होतो.

डॉ शं दा पेंडसे आणि प्रा कवी भ. श्री. पंडित हे आमचे मराठीचे प्राध्यापक. दोघांचं शिकवणं अतिशय प्रभावी अभ्यासक्रमात उत्तमोत्तम पुस्तकं होती ( ती लावण्यात पेंडश्यांचाच हात होता ) आमच्या देशाची स्थिती (चिपळूणकर), यशवंतराव खरे (आपटे), गुंजगोष्टी (फडके), साहित्याचे मूलधन (कालेलकर — चोरघडे), मधुकर (विनोबा), आर्याकेकावली, सामराजाचं रुक्मिणीहरण, विदर्भवीणा, यशोगंध आणि अनिलांचं भग्नमूर्ती ही पुस्तकं पेंडसे—पंडित इतक्या तन्मयतेने, बारकाव्याने शिकवीत की, काय बिशाद आहे विद्यार्थ्याला मराठीची गोडी लागणार नाही ! त्यात भरीला हिस्लॉपच समृद्ध ग्रंथालय. माझ्या मुळातच भावनाप्रधान, चौकस नि रसिक वृत्तीला. हे वातावरण पोषक ठरलं या काळात मला वाचनाचा विलक्षण छंद जडला हाती येईल ते कुठल्याही वाङ्मय प्रकारातलं जुनंनवं पुस्तक मी अधाशासारखा वाचून परत करत असे. याशिवाय म्युनिसिपालटीच्या आवारात असणाऱ्या नगर वाचनालयातील वृत्तपत्रं,मासिक साप्ताहिकं वाचंत असे ती वेगळीच.



अनुक्रमणिका

## साभार स्वीकार

श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३० यांची प्रकाशने

- कुसुमाग्रज गौरव—माधव गडकरी पृष्ठे ४८ पंचवीस रुपये
- अलीबाबाची हीच गुहा (नाटक) दिलीप वि. चित्रे पंचवीस रुपये
- संक्रमण (कथा) राज काझी पृष्ठे ११४. १८ रु. ४५ पैसे
- विसाव्या शतकातील महाराष्ट्र खंड २. डॉ. य. दि. फडके पृष्ठे ३४४, ९० रुपये.
- चारित्र (कादंबरी)—ज्ञानेश्वर नाडकर्णी. पृष्ठे २७५ शंभर रुपये
- कॉलम (कवितासंग्रह) विलास शेळके. पृष्ठे ५२ आठ रुपये
- माध्यम (लेख)—प्रकाश कुलकर्णी, पृष्ठे १९४ साठ रुपये
- रॅट रेस— पंकज कुरुलकर, पृष्ठे १५५. साठ रुपये

विविध

- कथा कॉंग्रेसची गाथा स्वातंत्र्याची—गो. सि. शनवारे, स्वतंत्र भारत प्रकाशन, वल्लभभाई पटेल रोड, विलेपार्ले (प) मुंबई ५६, तीस रुपये
- आनंद संप्रदाय आणि परंपरा — डॉ. भीमाशंकर देशपांडे, विश्राम धाम, आळंदी, गुलबर्गा ५८२३०२. चाळीस रुपये.
- मस्तानी मस्तानी — द. ग. गोडसे पॉप्युलर प्रकाशन मुंबई ३४ पृष्ठे १४० शंभर रुपये
- भूक-नारायण- शिरसाळे, पानफूल प्रकाशन ८० नवी पेठ जळगाव पृष्ठे ९६ तीस रुपये
- लंगडा सूर्य बेघर आकाश—नीळकंठ महाजन, पानफूल प्रकाशन जळगाव पृष्ठे ९६ तीस रुपये.
- राबणारे कोवळे हात— ज्ञानेश मोरे, पानफूल प्रकाशन जळगाव पृष्ठे ९५, तीस रुपये

एका सहामाही परीक्षेतील माझी गद्य विषयाची उत्तरपत्रिका डॉ. पेंडसे यांना इतकी आवडली की त्यांनी भर वर्गात माझी तारीफ केली, ' या मुलाने पत्रिका इतकी उत्कृष्ट लिहिली आहे की एखाद्या सराईत लेखकालाही तशी लिहिता येईल की नाही, मला शंका आहे.' आयुष्यात अंगावर प्रथम मूठभर मांस चढलं ते यावेळी !

हिस्लॉपमध्ये मराठी भाषा संवर्धक मंडळ होतं. मंडळाच्या कार्यात मी रस घेत असे व नियतकालिकात लिहित असे. एकदा 'आजचे मराठी वाङ्मय प्रगतिपर आहे काय' या विषयावर आंतरमहाविद्यालयीन वक्तृत्व स्पर्धा होती. तिच्यात मला एक पारितोषिक पुस्तकरूपाने मिळाल्याचं आठवतं. मंडळाच्या वार्षिकोत्सवांना मा. दा. आळतेकर आणि द. के. केळकर यांना बोलावण्यात मुख्यतः माझाच हात होता. या दोघांची कालिदासाची सृष्टी नि काव्यालोचन ही पुस्तकं मला फार आवडली होती. इतिहास, राष्ट्रीय स्वरूपाचं वाङमय आणि काव्य या तीन विषयांची गोडी मला लागली तर हिस्लॉपमधील वातावरणामुळे, कॉलेजच्या मिशनरी वातावरणाचा मजवर कसलाही परिणाम झाला नाही.

३८ ते ४४ या काळातलं नागपूर शहरातलं राजकीय नि सांस्कृतिक वातावरणही माझ्यातील या नव्या वाङमयीन अभिरुचीला आणखी पालवत गेलं. रा. स्व. संघात नकळत मी ओढला गेलो होतो. संघामुळे राष्ट्रप्रेमाचे, हिंदुत्वाचे आणि विशेष करून स्निग्ध सामूहिक सहजीवनाचे संस्कार घडत होते. डॉ. हेडगेवार, डॉ. मुंजे, डॉ. ना. भा. खरे, ॲड. विश्वनाथराव केळकर, डॉ. ल. वा. परांजपे, बाळशास्त्री हरदास, वि. घ. देशपांडे, सावधान–आदेशचे मावकर, पु. भा. भावे इत्यादींची भाषणं ऐकायला मिळत. त्यांना जवळून पाहण्याचा योग येई. बाळशास्त्र्यांशी पुढे माझा निकट परिचय घडला. माडखोलकर त्या काळात महाराष्ट्र या द्विसाप्ताहिकाचे उपसंपादक होते. तळयाच्या पाळीवर 'शांता–निवासामध्ये ते राहत. अधूनमधून रस्त्यात भेटत. मी पुण्याकडचा म्हणून माझी चौकशी करीत. त्यांच्या आणि फडक्यांच्या कादंबऱ्यांची मनावर भूल पडली होती. गोविंदाग्रज आणि तांबे हे दोन कवी तर मला विशेष आवडत. कॉलेज जीवनात उत्तमोत्तम कविता मी एका वहीत उतरून ठेवत असे. पुण्याच्या पान–

शेत पुरात अर्धवट भिजलेली ती वही मी अद्याप जपून ठेवली आहे. अत्तराच्या कुपीप्रमाणे

स्वातंत्र्यवीर सावरकर ही माझी वाङ्मयक्षेत्रात प्रेरणा देणारी आणखी एक व्यक्ती. त्यांचं प्रथम दर्शन झालं (१९३८), स्फूर्तिप्रद भाषण ऐकली, तीही नागपुरात. त्यांच्या भव्य मिरवणुकीवर विमानातून पुष्पवृष्टी हे दृश्य मी आजन्म विसरणार नाही. माझी जन्मठेप, सावरकरांची कविता, मॅझिनीची प्रस्तावना, अंदमानच्या अंधारातून (पत्रे) ही त्यांची पुस्तकं वाचून मी अतिशय प्रभावित झालो होतो. मनात अनेकदा उर्मी उसळून येई नि सावरकरांच्या आक्रमक हिंदुत्ववादी राजकारणात उडी घ्यावी असे वाटे. पण मला पोसणारा भाऊ शासकीय नोकर होता. आईवडील वृद्ध होते. त्यांचं मी शेंडेफळ होतो. शारीरिक अवस्था एकूण अशी की प्रत्यक्ष राजकारणाचा धकाधकीचा मामला, तुरुंगवास इ. झेपण्याचा आत्मविश्वास नव्हता. या भेडसावणाऱ्या प्रश्नांनी अखेर मला परावृत्त केलं. पण सावरकरांनी अंदमानला जाण्यापूर्वी डोंगरी कारागृहात पत्नीला गजांआडून जो भव्योदात्त उपदेश केला तो अंतःकरणावर कायमचा कोरला गेला होता-चार काटक्या जमवून संसारच करायचा, पोराबाळांची वीण वाढवायची तर असा संसार कावळेचिमण्याही करतात. पण संसाराचा याहून भव्यतर अर्थ समजून घ्या-इ. सुदैवाने म्हणा की दुर्दैवाने, १९४४ साली इंटर-मध्ये मी नापास झालो. लॉजिकने दगा दिला मराठीचा प्राध्यापक होण्याची आकांक्षा धुळीला मिळाली. या काळात मी एका नव्या भावविश्वात गुरफटून गेलो होतो ते विश्वही नेमकं याच सुमारास उद्ध्वस्त झालं नागपूरला परत जाण्यासाठी माझा पाय निघेना. माझी वाङ्मयीन अभिरुची, वाचनाचा छंद, सार्वजनिक कार्याची हौस या सर्वांना पुणे शहर हे सर्वाधिक अनुकूल क्षेत्र होतं नागपूरला कायमचा रामराम ठोकून मग मी पुण्यातच कालक्रमणा करण्याचं ठरवलं. खेड येथे सहा महिने कोर्टात आणि दोन अडीच वर्षे पुण्याला मिलिटरी अकाऊंटस्‌मध्ये. अशा भुक्कड नोकऱ्या करून अखेर श्री. म. तथा बापूसाहेब माटे यांचं बोट धरून मी साहित्य परिषदेची पायरी चढलो. माटे आणि त्यांचे पश्चात पोतदार ही माझी पुण्यातली दोन आदरस्थानं.

परिषदेत येण्यापूर्वी बापूसाहेबांचा मी एक लेखक होतो. माझ्या झपझप, सुवाच्य. बऱ्याचशा शुद्ध लेखनावर माटे खूष होते. त्यातून दोघांची मते जुळत होती. ' परिषदेत येतोस का ? वेतन मात्र बेताचं मिळेल असं एकदा त्यांनी मला विचारलं आणि मी लगेच होकार दिला. पुण्यातील १९४५ ते १९५० या

पाचसहा वर्षांच्या काळात मी नाना प्रकारचं लेखन करायला आरंभ केला होता व पुढे परिषदेच्या अतूट सान्निध्यामुळे लेखन आणि सार्वजनिक कार्य हेच माझं जीवन बनलं. आदेश, विविधवृत्त, मौज ही साप्ताहिकं; रोहिणी, प्रसाद, महाराष्ट्र ही मासिकं, ज्ञानप्रकाशचं 'काव्यशास्त्रविनोद' हे गुरुवारचं सदर आणि केसरी या प्रसारमाध्यमातून मी जे काही लिहित होतो ते मौलिक मुळीच नव्हतं. कविता तर अगदी बेताच्या. बहुतांश लेखन प्रासंगिकच असे. पण पुढे ५६ पासून ते ८५ पर्यंत मी जी १५-१६ लहानमोठी चरित्रात्मक पुस्तकं लिहिली ती काही एका ध्येयाने लिहिली.

राष्ट्रीय बाण्याची आणि वीरवृत्ती जोपासण्याची माझी जी वृत्ती बनली होती. तिला अनुसरूनच मी मुख्यतः 'जे जे उत्तम, उदात्त, उन्नत महन्मधुर' ते ते इतिहासातलं लिहित गेलो. तारुण्यात राजकारणात पडण्याची ऊर्मी मी राष्ट्रीय स्वरूपाची स्फूर्तिदायक पुस्तकं लिहून शमवीत गेलो. माझ्या सर्व प्रकारच्या मर्यादा ध्यानी घेता मी जे काही लिहिलं त्यावर मी अगदी तृप्त आहे.

( म. श्री. दीक्षित, ८६५, नवा सदाशिव, पुणे - ३० )

---



---

# प्रारंभीचे दिवस

—सुभाष भेण्डे

मी लिहिलेला आणि छापून आलेला पहिलावहिला मजकूर म्हणजे एक समीक्षालेख होता हे आठवलं की मौज वाटते आणि किंचित् दचकायलाही होतं !

या लेखाचा मथळा होता · ' साधुदासांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या मी त्यावेळी सांगलीच्या ' सिटी हायस्कूल ' मध्ये नववीच्या वर्गात होतो. साधुदास हे सांगली संस्थानचे राजकवी; कवी यशवंतांचे गुरू. मूळचं नाव गो. गं. मुजुमदार असलं तरी ' साधुदास ' या टोपण नावानं लेखन करीत. प्राथमिक शाळेत शिकत असताना साधुदासांची सांगलीच्या पटवर्धन घराण्याची स्तुती करणारी काव्य-रचना ' हेरंबा अतिसदया । रक्षी पार्वतीतनया । पटवर्धन वरदसुता । नृपती सांगलीच्या या । ' आम्हाला शाळा सुरू होताना म्हणावी लागे. (आजही ती कविता संपूर्ण पाठ आहे ! ) या कविराजांनी ' मराठेशाहीचा शुक्लपक्ष : पौर्णिमा ' आणि ' मराठेशाहीचा वद्य पक्ष : प्रतिपदा– द्वितीया ' अशा तीन ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या होत्या. माधवराव पेशव्यांचा काळ म्हणजे ' पौर्णिमा ' व त्यानंतर नारायणराव पेशव्यांचा खून होतो तो काळ ' मराठेशाहीचा वद्य पक्ष ' या काळावरील त्यांनी लिहिलेल्या दोन कादंबऱ्यांची शाळेत असताना मी अनेकदा पारायणे केलेली होती. हरी नारायण आपटे यांच्या कादंबऱ्यांइतकंच मला साधुदासांच्या कादंबऱ्यांनी मोहून टाकलं होतं.

या काळात मी कविता नियमितपणे लिहीत होतो. र. कृ. जोशी हा माझा शाळासोबती व जिवलग मित्र. आम्ही दोघं कविता करत असू. प्रत्येक वर्गाचं स्वतंत्र हस्तलिखित काढावं असा हायस्कूलच्या मुख्याध्यापकांचा आग्रह होता. सर्वोत्कृष्ट हस्तलिखिताला प्रथम पारितोषिक. आमच्या वर्गाच्या 'क्रांती' नामक हस्तलिखिताचे आम्ही दोघे संपादक होतो. या हस्तलिखिताच्या प्रकाशनासाठी आम्ही कवी गिरीश यांना बोलावलं होतं. हस्तलिखितात बहुतेक साहित्य आम्हां दोघांचं

कविता लिहायचं वेड कॉलेजमध्ये गेल्यावरही चालू राहिलं. कवी गिरीश आम्हाला मराठी शिकवीत. विश्रामबागला त्यांच्या 'कांचन' बंगल्यात आम्ही 'उदयोन्मुख' कवी नेहमी जमत असू. गिरीश कविता म्हणायला सांगत, सूचना करीत. 'विलिंग्डोनियन'मध्ये प्रकाशित होणाऱ्या सर्वोत्कृष्ट कवितेला त्यांनी 'कवी गिरीश पारितोषिक' ठेवलं होतं. ज्युनियर बी. ए. ला असताना त्या पारितोषिकाचा मी मानकरी होतो. गोविंद जोशी, अशोक देशपांडे, श्याम सोनटक्के हे त्यावेळचे साहित्यात रस घेणारे सहाध्यायी. (र. कृ. जोशी मुंबईला जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये उच्च शिक्षणासाठी रवाना झाला होता!) अधूनमधून एकत्र जमून आम्ही कविता वाचत असू. चर्चा करत असू. सगळ्यांनी चांगल्या ठरविलेल्या कविता मी रविवार सकाळ, लोकसत्ता, स्वराज्य यासारख्या नियतकालिकांकडे पाठवीत असे आणि आश्चर्य म्हणजे त्या छापूनही येत.

परंतु कवितेच्या प्रांतात फार काळ रेंगाळलो नाही. आपल्या हातून वेगळं काही लिहून होईल असा विश्वास वाटेना. त्यावेळी प्रसिद्ध होणारी कविता मी डोळसपणे वाचत होतो. नामवंत कवींच्या प्रतिभेची झेप पाहून स्तंभित होत होतो. यमकं जुळवायच्या कृत्रिम कारागिरीत मन रमेना! मुक्तछंदाची भुसभुशीत जमीन त्यावेळचे अनेक कवी कोपरानं खणत होते. त्यांच्यापासून स्फूर्ती घ्यावी असंही वाटेना. . .

काव्यलेखनाकडून हळूहळू गद्यलेखनाकडे वळत होतो. उदयोन्मुख लेखक जे करतात ते करत होतो. वेगवेगळ्या कथास्पर्धांत भाग घेत होतो आणि भरघोस पारितोषिकं मिळवित होतो. 'स्वराज्य'च्या लघुकथा स्पर्धेत पहिले पारितोषिक मिळाले. मग अनेक नियतकालिकांमधून कथेसाठी मागणी येऊ लागली

अर्थशास्त्रात एम. ए. करण्यासाठी सांगलीहून पुण्याला डेरेदाखल झालो तेव्हा कविता कायमची सुटली. कथा झपाट्यानं लिहित होतो. एम. ए. झालो. पीएच. डी. चा अभ्यास गोखले इन्स्टिटयूटमध्ये करत असताना माझ्या एका मित्राची प्रेमकथा त्याच्या तोंडून ऐकली. आपल्या प्रेमभंगाचं दुःख मोठ्या गंभीरपणे

७

माझ्या मनावर ठसवीत होता पण मला मात्र सारा प्रकार विनोदी वाटत होता त्या प्रसंगावर मी इजा बिजा तिजा ही विनोदी कथा लिहिली आणि पर्वतीकडून गोखले इन्स्टिटयूटकडे जाताना वाटेत लागलेल्या मोहिनी मासिकाच्या कचेरीत जाऊन ती कथा अनंत अंतरकर यांच्या हवाली केली कथेला परतीचं पोस्टेज चिकटवलेलं होतं अंतरकरांनी काहीहि न बोलता हस्तलिखित माझ्याकडून घेतलं आणि टेबलावरच्या अस्ताव्यस्त ढिगावर ठेवून दिलं. मी कृषि आयकरासंबंधी संशोधन करण्यासाठी मार्गस्थ झालो.

दोन दिवसांनी अंतरकरांचं दोन ओळीचं कार्ड आलं. 'मला तुमच्या सवडी-नुसार संध्याकाळी सहा वाजता कचेरीत भेटा.'

त्याप्रमाणं मी त्यांना भेटलो. माझी विनोदी कथा त्यांना फार आवडली होती. मला विनोदी लेखन उत्तम जमेल असं त्यांचं म्हणणं होतं आणि दर महिन्याला मी 'मोहिनी' साठी लिहावं असा त्यांचा आग्रह होता

त्यानंतर मी सातत्यानं विनोदी लेखन केलं 'मोहिनी' साठी नियमितपणे लिहिलं. दिवाळी अंकासाठी अनेक नियतकालिकांची पत्रं येऊ लागली. 'विनोदी साहित्य पाठवा–' मी गंभीर कथा पाठवली की, संपादक फोन करीत–'आमच्या-कडे गंभीर लेखन विपुल प्रमाणात येतं विनोदी लेखनाची वानवा आहे. कृपया विनोदी कथा वा विनोदी लेख पाठवा.' पत्रात आपल्याकडून विनोदी लेखनाची अपेक्षा आहे. हा मजकूर आणि त्याखाली ठळक रेघ !

मला विविध विषय सुचत होते; अनेक कथावस्तू खुणावत होत्या. विनोदी लेखनाच्या चौकटीत न बसणाऱ्या कथावस्तू दरम्यान तीन विनोदी संग्रह प्रसिद्ध झाले. पण मी समाधानी नव्हतो.

'हे लेखक विनोदी लिहितात.'

'अय्या–आमच्यावर विनोदी लिहू नका बरं का!'

'यांच्यापासून जपून राहायला हवं. कधी सरक्यास्टिक लिहितील याचा नेम नाही–'

असं सारखं चालू असायचं

गोव्याला साडेसहा वर्षं होतो. मुंबईला आलो. साहित्य संघात रमेश मंत्री साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम दर पंधरवडयाला घडवून आणायचे. मी मुद्दाम जायचो. नव्या ओळखी व्हाव्यात ही अपेक्षा.

एकदा एका कथालेखकानं मला विचारलं, 'काय हो, पु ल देशपांडे विनोदी लिहितात. ते इतकं दर्जेदार विनोदी लिहित असताना तुम्हा लेखकांना विनोदी लिहावंसं वाटतं तरी कसं ?'

मी पटदिशी उत्तर दिलं, 'जी. ए कुलकर्णी कथा लिहिताहेत तरी तुम्ही मंडळी कथा लिहिण्याचं धाडस करताच की नाही?'

पुन्हा असा भावडा प्रश्न त्या लेखकानं कधी मला विचारला नाही.

मुंबईला आल्यावर अनेक संपादकांशी नव्यानं परिचय आला. परिणामी पुढल्या वर्षीच्या दिवाळी अंकांसाठी पंचवीस तीस पत्रं आली. सगळ्यांची एक मागणी : विनोदी साहित्य पाठवा. या काळात 'वीणा' चे संपादक उमाकांत ठोमरे भेटले म्हणाले : या वर्षीच्या 'वीणा' दिवाळी अंकासाठी मला तुमच्याकडून कादंबरी हवी- सिरियस.

कादंबरी ? माझ्याकडून ? तो पर्यंत मी कादंबरी लिहिली नव्हती विनोदी कादंबरी हवी असा त्यांचा आग्रह असता तर मी तात्काळ नकार दिला असता परंतु त्यांना विनोदी कादंबरी नको होती. विनोदी नसलेली गंभीर कथावस्तू असलेली कादंबरी हवी होती त्यांना

मी त्यांना म्हटलं– 'एक थीम अनेक दिवस मनात घोळत्येय प्रयत्न करतो.'

'जरूर करा. पण लक्षात ठेवा मला तुमच्याकडूनच कादंबरी हवीय. आणखी कुणाला मी सांगणार नाही.'

डिसेंबर १९६१ मध्ये गोवा मुक्त झाला आणि सात महिन्यांनी मडगावच्या कॉलेजात अर्थशास्त्राचा प्राध्यापक म्हणून माझी नेमणूक झाली. पोर्तुगीज अंमलाचा 'हँगओव्हर' अनेक मंडळीवर होता. हिंदू–ख्रिश्चन दोन्ही जमाती त्यास अपवाद नव्हत्या. मुक्तिपूर्व काळात खाणधंदा भरभराटीस आला होता आणि भारताने आर्थिक नाकेबंदी केल्यामुळे युरोप–अमेरिकेकडून येणारा माल गोव्यात मुबलक प्रमाणात मिळत होता, स्मगलिंग करून आणि आयात केलेला माल भरमसाट भावानं विकून अनेक गोवेकर श्रीमंत झाले होते. नवश्रीमंतांचा हा नवा वर्ग पोर्तुगीज राज्यकर्त्यांचा स्तुतिपाठक बनला होता. अनेकांना गोवा मुक्त झाल्यानं धक्का बसला. हितसंबंधितांची मिरासदारी संपली. बहुजनसमाज डोकं वर काढू लागला कलावंतिणीची, भाविणीची मुलं शिकू लागली, नव्यानं लाभलेली अस्मिता प्राणपणानं जपू लागली. पोर्तुगीज सैनिकांशी व अधिकाऱ्यांशी लग्नं करून सुखात राहणाऱ्या गोमंतकीय ख्रिश्चन तरुणी पोर्तुगीज पळून गेल्यावर उघड्या पडल्या. त्यांच्या आयुष्याची परवड झाली. अनेकींनी वेश्याव्यवसाय स्वीकारला.

गोव्याचं सामजिक जीवन मुक्तीनंतरच्या पाच सहा वर्षांत आमूलाग्र बदलत गेलं.

या बदलत्या जीवनाचा मी साक्षी होतो. मूळचा मी गोव्याचा असल्यानं तेथील जीवनाचे विविध पैलू मला जवळून न्याहाळता आले. प्राध्यापक म्हणून साडे-सहा वर्षे मी मडगाव-म्हापसा-पणजी या तीन प्रमुख शहरांत राहात असताना तिथल्या साहित्यिक, सामाजिक जीवनात मी भाग घेत होतो. बांदोडकरांचा उदय मी पाहिला. बहुसंख्य गोमंतकीयांनी महाराष्ट्रात विलीनीकरण होण्याविरुद्ध कौल दिला, मात्र त्यानंतर लगेच झालेल्या निवडणुकीत पुन्हा बांदोडकरांना भरघोस मतं दिली हे सगळं मी समजून घेत होतो. गोयकरांच्या स्वभावाची बरीवाईट वैशिष्ट्यं जाणून घेत होतो.

मुंबईला मी आलो तेव्हा गोव्यातील बदलत्या समाजजीवनाचा आलेख शब्दबद्ध करावा असं प्रकर्षानं वाटत होतं. खूप खूप सुचत होतं, पण ते कथांच्या रूपानं चित्रित करणं मनाला पटेना (विनोदी बाज तर अगदी कुचकामी) सहाजिकच ठोमऱ्यांनी कादंबरी मागितली तेव्हा गोव्यातल्या व्यक्ती झरझर दृष्टीपुढून सरकू लागल्या. पाहिलेले प्रसंग पुन्हा आठवू लागले. मुक्तीनंतरच्या सहा वर्षांत गोमंतकाचं ढवळून निघालेलं जीवन मला खुणावू लागलं.

आणि त्यानंतर महिनाभर मी झपाटल्यासारखा लिहीत होतो.

पोर्तुगीज अधिकाऱ्यांच्या कच्छपी लागलेला, एका रात्रीत श्रीमंत झालेला घाणेकर, वडिलांच्या किळसवाण्या वागणुकीनं दुखावलेली त्याची मुलगी प्रिया, मार्वीण, तिच्या पोटी जन्म घेणारा, स्वातंत्र्य चळवळीत भाग घेणारा आणि मुक्तीनंतरच्या निवडणुकीत घाणेकरांना यशस्वी टक्कर देणारा गरम माथ्याचा श्रीपाद, पोर्तुगीज सैनिकाशी लग्न करून त्याला खुशालीत दंग असलेली पण मुक्तीनंतर 'पोटासाठं' शरीरविक्रय करणारी मारिया, अशा अनेक व्यक्ती व व्यक्तीव्यक्तीमधील संबंध चित्रित करणारे प्रसंग मी बऱ्याच प्रमाणात चित्रपट तंत्राचा वापर करून उभे केले हे तंत्र मी जाणीवपूर्वक वापरलेलं नव्हतं. कादंबरी लिहून झाल्यावर माझ्या काही लेखक मित्रांनी ते निदर्शनास आणून दिलं.)

कादंबरी मी एकटाकी लिहिली. फारसे फेरफार केले नाहीत. कुणाला वाचायलाही दिली नाही. हस्तलिखित ठोमऱ्यांच्या स्वाधीन केलं. कादंबरी जमली आहे असं वाटत होतं. आपल्या हातून काहीतरी वेगळं, तोपर्यंत कधीही न लिहिलेलं असं लिहून झालं आहे असा विश्वास वाटत होता.

कादंबरीचं बारसं ठोमऱ्यांनी केलं. 'उजळत्या दिशा.' १९६९ च्या वीणा दिवाळी अंकात ती प्रसिद्ध झाली.

दिवाळीनंतर काही दिवसांनी केशव कोठावळे भेटले. म्हणाले, 'वीणामधील

कादंबरी मला फार आवडली. ती पुस्तकरूपानं काढायची माझी इच्छा आहे.'

नकार द्यायचं कारणच नव्हतं.

केशवरावांनी कादंबरीचे खूप लाड केले. माझ्या इच्छेनुसार दीनानाथ दलाल यांच्याकडून मुखपृष्ठ काढवून घेतले. मौजमध्ये ती छापून घेतली. देवीदास बागूल यांनी मजकुराची मांडणी केली. मी नाव वदललं. 'आमचे गोंय आमकां जाय' आमचा गोवा आम्हाला हवा.

कादंबरीचं अपेक्षेपेक्षा चांगलं स्वागत झालं. प्रल्हाद वडेरनी सत्यकथेत व प्रा. प्र ना. परांजपे यांनी महाराष्ट्र टाइम्समध्ये विस्तृत अभिप्राय लिहिले. प्रा माधव मनोहर यांनी नवशक्तीत पानभर अभिप्राय लिहून खूप कौतुक केलं प्रा. केशव मेश्राम यांनी परीक्षण लिहून कादंबरीची आवर्जून दखल घेतली. वाचकांची असंख्य पत्रं आली. (अजूनहीं अधूनमधून येतात )

मला माझं स्वत्व गवसलं, आत्मभान आलं. मुख्य म्हणजे मनातील अस्वस्थता अनिश्चितता संपुष्टात आली आपल्याला जे काही व्यक्त करायचं आहे त्यासाठी कादंबरी हे परिणामकारक माध्यम आहे. या अवघड माध्यमाची हाताळणी आपल्याला जमण्यासारखी आहे असा आत्मविश्वास आला.

यानंतर वर्षभरात मी हंस मासिकाच्या रौप्यमहोत्सवी दिवाळी अंकासाठी अदेशी लिहिली. ती प्रसिद्ध झाल्यावर जोगीणंची जुळवाजुळव करू लागलो. अंधारवाटा, पैलतोर, उद्ध्वस्त, बॉनसाय या त्यानंतरच्या कादंबऱ्या.

विनोदी लेखन चालूच असतं; मात्र सृजनशील धुंदीचा अनुभव येतो तो कादंबरी लिहिताना. . . .

(सुभाष भेण्डे, ५ ज्ञानदेवी, साहित्य सहवास, वांद्रा पूर्व, मुंबई ५१)

---



---



अनुक्रमणिका

## शुद्धीवर आणणारी ठेच

(पृष्ठ ६३ वरून)

आणि त्यापुढे मात्र त्यांनी खूप खूप जिव्हाळ्याने मार्गदर्शन केले होते. त्याचा मथितार्थ असा-' हा काही तुमचा खरा पिंड नव्हे. तुम्ही कविवर्य पोवळे यांच्या कवितेच्या प्रभावाखाली लिहिताहात. स्वतःचा पिंड, मनोधर्म, प्रवृत्ती यांचा अगोदर खोलवर शोध घ्या. त्यातून उमलेल ती तुमची खरी कविता असेल. सुरुवातीच्या उमेदवारीचा काळ काहीसा अनुकरणाचा, आपल्या आवडत्या कवीच्या प्रभावाखाली वावरण्याचा असतो. पण हा काळ फार थोडा असावा. पुढे आपला स्वतःचा मार्ग शोधला पाहिजे. थोडे अंतर्मुख झालात म्हणजे तुमची वाट तुम्हाला स्वच्छ दिसेल. इ. इ.'

किती खरेखुरे लिहून गेला होता हा माणूस! अगदी मर्मावर बोट ठेवले होते. त्या काळात कविवर्य पोवळे यांच्या कवितेने आमच्या तरुण पिढीला भारून टाकले होते. त्यातले उमरखय्यामी तत्त्वज्ञान फार प्रिय वाटत होते. उष्ण, गरम, कानशिलाच्या नसा तापवणारी धुंदीची कविता. आम्हीही नकळत तसेच लिहू लागलो होतो. मी वर उल्लेखिलेल्या कवितेत म्हटले होते–

> 'मी तर असला छंदीफंदी
> चंचल माझ्या साऱ्या रजनी !
> जागृतीत वा स्वप्नीही मज
> नित्य भुलविते नवी कामिनी !!'

कसली कामिनी नि कसला जागृतीतला किंवा स्वप्नातला अनुभव? कशाला काही पत्ता नव्हता! पण 'डॉन जुआॅन'ची पोझ मोठी आकर्षक वाटत होती. तीत स्वतःला वळेवळे घुसविण्याचा उत्साही अधाशी प्रयत्न होता. शब्दांवर थोडे प्रभुत्व होते त्या जोरावर निर्दोष वृत्तरचना करता येत होती आणि तिलाच मी खरी कविता समजत होतो!

कामतांनी माझे डोळे उघडले. त्यांचा अभिप्राय मनात कितीतरी दिवस खोलवर झिरपत राहिला नंतर बरेच दिवस मी कविता लिहिणेच सोडून दिले. स्वतःलाच शोधत होतो. 'स्व'भाव निरखीत होतो. स्वतःच्या खऱ्याखुऱ्या मानसिक प्रवृत्तीच्या कंदाचा गाभा कोणता ते पाहात होतो. हळूहळू स्वतःला थोडा थोडा सापडू लागलो. जाणवू लागले की, स्त्री-पुरुषातला प्रणय, वासना, स्त्रीच्या मनाची देहाची विलसिते हाच आपल्याही मनाला प्राधान्याने आकर्षून घेणारा विषय असला तरी त्याचे आपल्या मनात उठणाऱ्या रंगतरंगाचे स्वरूप

गळे आहे ते व्यंजकतेने, कमीत कमी शब्दांत व्यक्त व्हायला हवे आहे. तशी ती व्यक्त होऊ लागली आणि निर्मितीचा खराखुरा आनंद अनुभवायला मिळू लागला कामतांच्या पत्रानंतर दीर्घ काळ विश्रांती घेऊन, स्वत्व गवसल्यानंतरच्या ज्या काही कविता त्यावेळी प्रसिद्ध झाल्या त्यापैकी बोभाटा ही एक कविता नमुन्यादाखल वाचली म्हणजे कल्पना येईल.

कसुन रेखला<br>
त्या पदराने<br>
घट्ट लपेटुन<br>
तनुवेलीवा<br>
  कवळा ताठा<br>
खण चोळीचा<br>
रुतुन राहता<br>
लाल वळांची<br>
खूण मिरविली<br>
  जरिच्या काठा<br>
तंग पोपटी<br>
नेसु वाचता<br>
चाप लागुनी<br>
संथ चालिचा<br>
  हो बोभाटा ....

माझ्या 'तळचातल्या साउल्या' या काव्यसंग्रहात अशा सर्व निवडक कविताच फक्त घेतल्या आहेत. आणि कामतांना आवडल्या नसत्या अशा चांगल्या नियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या सुमारे २०/२५ कविता साफ गाळल्या आहेत. त्यामुळे त्या एकुलत्या एक संग्रहाने खूप यश आणि कौतुक मिळवून दिले. कविता लेखनाला सुरुवात केल्यानंतर उण्यापुऱ्या २५ वर्षानंतर हा संग्रह प्रसिद्ध झाला! पण कामतांच्या मार्गदर्शनानंतर कसलीच घाई नकोशी झाली. चांगले लिहून झाले तेवढेच, मोजकेच शिल्लक ठेवायचे याच वृत्तीने कवितालेखनाची वाटचाल चालू आहे.

आताच वरती कौतुकाचा उल्लेख झाला आहे. उमेदवारीच्या काळात जसे परखड परीक्षण, दोषदर्शन आवश्यक असते तसे काही कौतुकही आवश्यक असते. त्याने उभारी मिळते. ते दुर्मिळ भाग्य मला फार मोठ्या प्रमाणात



अनुक्रमणिका

मिळाले. कविवर्य कुसुमाग्रज, पु. शि. रेगे, बोरकर, वा. रा. कांत, इंदिरा संत यांसारख्या ज्येष्ठांनी या अल्पसख्य कवितेचे मन भरून कौतुक केलेच, पण समकालीनांनी आणि नव्या पिढीतील कवींनीही मनापासून दाद दिली. श्री. पु. भागवत, वा. रा. ढवळे, वि. म. बेडेकर, पु शि. रेगे यांच्यासारख्या दर्दी संपादकांनी या कवितेला आपुलकीने जोजविले. पण प्रत्येकाचा तऱ्हा वेगळी. श्री. पु. भागवतांनी अगत्याने कविता मागवून सातत्याने 'सत्यकथे'त प्रसिद्ध केल्या. पण कवितेबद्दल मत विचारायला जावे तेव्हा 'ठीक आहे; बरी आहे!' एवढेच उत्तर! हे ऐकल्यावर मी नाराज व्हायचो.

तीच गोष्ट नवभारतच्या वि. म. बेडेकरांची. पु. शि. रेगे यांच्या लिप्त-अलिप्ततेच्या सीमा ओळखणे मात्र कठीण असे. पण आपली मते कुणाचा मुलाहिजा न ठेवता स्पष्टपणे तोंडावर सांगून टाकत. विपुल काव्यलेखन करणारे माझे एक समवयस्क कविमित्र—पुढे त्यांना साहित्य अकादमीचे पारितोषिकही मिळाले. मला त्या काळात एकदा रेगे यांच्या घरी घेऊन गेले होते. गप्पागोष्टी झाल्या. सरबत झाले. आणि माझ्या कविमित्राने विचारू नये तो प्रश्न रेग्यांना विचारला - 'तुम्हांला कोणाची कविता जास्त आवडते? माझी की पाटलांची?' त्यावेळी तटकन् रेगे उद्गारले - 'पाटलांची.' तो कौतुकाचा शब्द अजूनपर्यंत मनाला उभारी देतो आहे.

ज्यांनी आत्मभान जागृत केले, ज्यांनी आपल्या प्रेमळ कौतुकाने काव्यलेखनाची उर्मी टवटवीत ठेवली. त्यांचे अपार ऋण माझ्यावर आहे. पण ज्यांनी आत्मभान टिकविले, नव्हे त्याच्या कक्षा वाढविल्या त्यांचाही मी तेवढाच ऋणी आहे. त्यांपैकी ज्यांच्याशी माझ्या सतत गाठीभेटी होतात, काव्यचर्चा होतात ते गंगाधर पाटील, म सु पाटील आणि प्रभाकर बागले यांचा उल्लेख माझ्या कवितेच्या वाटचालीच्या संदर्भात मला केलाच पाहिजे. 'काव्यलेखन हा जीवनमार्गच आहे. (ए वे ऑफ लाईफ) असे मला सातत्याने बजावणारे गंगाधर पाटील, माझ्या कवितेच्या पदरातील धागा न् धागा सौंदर्याधायक नजरेने पारखणारे म. सु. पाटील आणि प्रभाकर बागले यांच्याशी माझ्या प्रत्येक कवितेबाबत होणारी चर्चा केवढी उद्बोधक आणि मार्गदर्शक ठरली आहे हे मला शब्दांत नीट सांगता येणार नाही. या कवितेतले सौंदर्य जर टिकलेच असले, वाटलेच असले तर या सुहृदांच्या डोळस, पर्यग्राही समीक्षेने.

जिच्यासाठी मी एवढी उमेदवारी केली, जिच्यासाठी एवढी धडपड केली त्या माझ्या लहानशा कवितेने मला काय दिले असाही प्रश्न मनात येऊन जातो. इतर अनेकांप्रमाणेच माझेही वैयक्तिक जीवन अनेक तऱ्हेच्या संकटांनी, दुःखांनी

ग्रासलेले. पण निराश झालो नाही. माझ्या या कवितेने मला काय दिले ते माझ्या असमर्थ शब्दांत मला सांगता येणार नाही. ते 'गुलजार' या प्रतिभावंत कवीच्या शब्दांतच सांगतो–

कंधे झुक जाते हैं जब बोझ से इस लम्बे सफर के
हाँप जाता हूँ मैं जब चढते हुए तेज चढाने
साँसें हर जाती हैं जब सीने में इक गुच्छा-सा होकर
और लगता है कि दम टूटही जाएगा यहींपर
एक नन्ही-सी मेरी नज्म मेरे सामने आकर
मुझसे कहती है मेरा हाथ पकडकर–' मेरे शायर,
ला, मेरे कन्धोंपे रख दे. मैं तेरा बोझ उठा लूं

या कवितेने माझ्याही जडभार जीवनाचा बोजा उचलला आहे. अलगद.

(पुरुषोत्तम पाटील,
विजय पोलिस वसाहत, भोकर रस्ता, देवपूर धुळे ४२४ ००२)

अनुक्रमणिका

# माझ्या जीवनपटातील काही एपिसोड

(पान ६४ वरून)

हाही कालखंड लवकरच संपला. त्यातून आणखी एक पिल्लू निघालं. बाबू पंडित हे माझे नात्यातले समवयस्क स्नेही देव्हाऱ्यांकडे होते. आमची दोघांची खूपच गट्टी जमली होती. मी जितका अबोल तितकेच ते वाक्चतुर. त्यामुळे या बाबतीत आमचे गुण परस्परस्नेहाला पोषक होते. त्यांच्यामुळे देव्हाऱ्यांचे सहायक दिग्दर्शक गजानन जहागीरदार यांची ओळख झाली. माझ्या डोक्यात जशा कल्पना सतत ओसंडून वहात असत तशीच बाबूजींचीही स्थिती होती: त्यांच्याकडेही कल्पनांचं भांडार होतं. आम्ही दोघे मिळून कथाकल्पना उगाळीत असायचो. यातूनच निष्पन्न झालं 'उर्वशी' चं पौराणिक कथानक. अगदी 'फायनल' पटकथा तयार झाली म्हणाना. आम्ही ती इंग्रजीत लिहिली. टाइप करून घेतली; आणि तिचं वाचन ऐकायला गजानन जहागीरदार टिळक रोडच्या आमच्या घरी आले. त्यांना कथा आवडली अन् मग पुढची काही बोलणी झाली.

नंतर अचानक कुठे ब्रेक लागला आठवत नाही. पण बाबूजींनी देव्हाऱ्यांची नोकरी सोडली; जहागीरदार सिनेसृष्टीत अन्यत्र जाऊन नाव कमावू लागले. आणि विवाहानंतर लवकरच माझी दिल्लीच्या आकाशवाणीवर वृत्तानुवादक निवेदक म्हणून निवड झाल्यामुळे चित्रनिर्मितीचे डोहाळे तिथेच लोप पावले.

दिल्लीचा निवास जेमतेम सोळा महिने टिकला. गांधीजींना अटक झाल्याचं वृत्तपत्रकाराला न शोभणाऱ्या गहिवरल्या आवाजात देऊन अस्मादिकांनी नोकरी सोडली. भूमिगत काळ अन् कारावास एकूण दोन वर्षांचा झाला. सुटल्यावर पुनश्च कामधंद्याच्या शोधार्थ मुंबईत दाखल झालो. त्या काळात जे लेखन केलं अन् 'बालमित्रा' चा जो अद्वितीय कालखंड घालवला त्याबद्दल मी अन्यत्र लिहिलं आहे. इथे मला समाचार घ्यायचा आहे तो फक्त माझ्या 'शो - वर्ल्ड' मधल्या अनुभवांचा.

तर झालं काय, एके दिवशी अचानक राम गबाले आमच्याकडे आले आणि 'राजकमल'साठी मुलांचा चित्रपट काढावयाचा आहे, एखादी कथा द्याल का म्हणून त्यांनी पृच्छा केली. मला अलिकडे चित्रपट्टी कथा (कॉमिक स्ट्रिप) लिहिण्याचा नाद लागला होता. 'बालमित्रा'तून बाल म्हणून लेखन करणारे शंकर सारडा आता महाराष्ट्र टाइम्समध्ये होते. त्यांना एकामागून एक अनेक साहसकथा हव्या होत्या; त्या निमित्ताने बनेश उर्फ फास्टर फेणेने अवतार घेतला.

पुढे जेव्हा 'टाइम्स ऑफ इंडिया'ने देशी चित्रपट्टया देण्याचं ठरवलं तेव्हा लिटल वूमन जाऊन (बिच्चारी! सर्वांचीच ती लाडकी होती. माझी सुद्धा) तिच्या जागी 'रंगरेखा'नं फास्टर फेणेला बसवलं 'सिमला स्पिरिट' अंगात भिनल्यावर फास्टर फेणेचे पाकिस्तानमधले चाळे संपले आणि त्याची जागा विपिन बुकलवारने घेतली. हे सगळं का नमूद करतो आहे? कारण हाही माझ्या दृष्टीने 'शो वर्ल्ड' मधलाच एक अनुभव होता. कारण चित्रपट्टी ही पटकथेचाच एक प्राथमिक अवस्था आहे असं मी मानतो. कॉमिक स्वरूपात कथा लिहिली की तिची पुढे पटकथा करणं सोपं जातं. राम गबाले परत गेले ते फास्टर फेणेला डोक्यात घेऊन गेले. पण नंतर त्यांचा फोन येणार होता तो आला नाही आणि तो प्रस्ताव तिथेच वारगळला त्यांनी काढला माडगूळकरांचा छोटा जवान. दरम्यान मी स्वत: इतर लेखनावरचं लक्ष कमी करून बालसाहित्यावर स्थिरावलो होतो. फास्टर फेणे तर माझ्या मानेवरच बसला होता त्याच्या पंधरावीस गोष्टी मी लिहिल्या आणि कथांची तीन पुस्तकं प्रसिद्ध करतेवेळी रामदास भटकळांनी म्हटलं आपण आणखीही पुस्तकं काढू– अॅज फास्ट अॅज यू कॅन. पण पुढे आम्ही दोघेही लेखन–प्रकाशनाच्या बाबतीत फास्ट राहिलो नाही; रेंगाळलो.

. फास्टर फेणे भटकळांनी 'पॉप्युलर' केला होता; आम्ही पुण्याला स्थायिक झाल्यावर सुधाकर जोशींनी त्याचा आणखी 'उत्कर्ष' घडवून आणला आणि मग एका सुप्रभाती सुरू झाला या चित्रपटातला पाचवा 'एपिसोड'

मुंबईहून शांतारामबापूंची कन्या मधुरी जसराज यांचा तसंच सुलभा देशपांडे यांचा लीलाबाईंना फोन. त्यांना फास्टर फेणेवर दूरदर्शन मालिका काढायची होती. बोलणं झालं आणि तेरा 'एपिसोड' काढण्याचं ठरलं. दरम्यान राम गबालेही पुण्यात स्थायिक झाले होते. तेही एक दिवस आले आणि त्यांनी गप्पा मारता मारता अप्रत्यक्षपणे सूचित केलं की आपल्यालाही दूरदर्शनसाठी मालिका काढायची आहे. रामभाऊंची नि आमची पूर्वी फास्टर फेणेच्या संबंधातच ओळख झाली होती. पण तो परिचय अल्पकालीन होता आता त्यांच्याशी जास्त निकटचा संबंध आला आणि आम्हाला दोघांनाही त्यांच्याबद्दल अकृत्रिम स्नेहभाव वाटू लागला. या स्नेहाला कुठल्याही 'एपिसोड' पेक्षा आम्ही जास्त महत्त्व देतो. फास्टर फेणे आधीच गेला होता; पण तो दुसऱ्या कुणाकडे न जाता मधुराताईंकडे गेला याबद्दल रामभाऊंनी समाधान व्यक्त केलं. कारण त्यांचा 'राजकमल'शी निकट संबंध आलेला होता आणि सौ. जसराज यांना ते 'मधू' म्हणूनच ओळखत होते. पण त्यांनी 'आशिश' नावाची दुसरीही एक मालिका

योजलेली होती ( हल्ली आयोजित केली होती असं म्हणतात, नाही का ? ) त्या 'आशिश' चे चार 'एपिसोड' लीलाने व मी लिहून दिले.

खरं म्हणजे, पटकथा लिहिण्याचा पहिला छंद माझा. तुरुंगवासात देखील सर्कस मधल्या जीवनावर मी एक संपूर्ण पटकथा नि तिचे संवाद लिहून काढले होते. त्या वह्या 'जेल सेन्सॉर' च्या तावडीतून सुटून घरी पोचल्या होत्या. अजून त्या तशाच पडलेल्या आहेत. पण मध्यंतरीच्या काळात लीलाने वनिता मंडळातून ज्या असंख्य श्रुतिका लिहिल्या नि हाताळल्या त्यामुळे तिने संवाद लेखनावर प्रभुत्व मिळवलं होतं. शिवाय तिचं हिंदी उत्तम होतं. आता 'आशिश' साठी अन् 'फास्टर फेणे' साठी पटकथा संवाद लिहिण्याचं कामही माझ्यापेक्षा तिनेच जास्त सफाईने केलं. दूरदर्शनवरची ती हिंदी मालिका अजूनही तशी जुनी झालेली नाही. दृश्यमाध्यमासाठी त्यात करावे लागलेले फरक काहींना आवडले नाहीत. पण फा फे.च्या पूर्वी निघालेल्या दूरदर्शनवरच्या बालमालिका ज्यांनी पाहिल्या होत्या ते मला वाटतं माझ्याशी सहमत होतील की त्या सर्व मालिकांपेक्षा फास्टर फेणे मालिका सरस होती. एकतर पूर्वीच्या मालिकांमध्ये 'हायब्रो' सोसायटीतली मुलं होती. आमचा फास्टर फेणे अन् दूरदर्शनसाठी त्याने सतत जवळ बाळगलेली 'गॅंग' ही साधीसुधी मध्यमवर्गातली मुलं होती. त्यांचे पराक्रमही शाळकरी मुलांचे होते

असा हा माझ्या व्यवसाय जीवनातला छोटासा 'चित्रखंड' मी इथेच पुरा करतो. या साऱ्या प्रकरणामध्ये अकल्पितपणे गोवलं गेलेलं एक सूत्र मला मोठं गमतीचं वाटतं प्रास्ताविक झालं शांतारामबापूंच्या 'प्रभात'मध्ये; निसटता का होईना पण मध्य गाठला तो फा. फे साठी त्यांच्याच राजकमलने; आणि आता उपसंहार होत आहे तो त्यांच्याच कन्येकडून. ही कन्या तर सुरुवातीला उत्साहाने म्हणाली होती की फास्टर फेणेच्या या मालिकेला छोटंसं प्रास्ताविक म्हणून आपण पपांना बोलायला लावू. पण तो योग अखेरीस आलाच नाही. इतकंच काय, त्या चित्रपतींच्या प्रत्यक्ष परिचयाचा लाभही मला आजतागायत झालेला नाही. यालाही कदाचित माझा स्वभावदोष कारण असेल!

(भा. रा भागवत
बालमित्र, आनंदनगर, हिंगणे, सिंहगड रस्ता, पुणे ५१)

# आणि मी लिहू लागलो. . . !

— बा. ह. कल्याणकर

मी जन्माला आलो, मी बोलायला लागलो, चालायला लागलो, हे जितक्या सहजपणानं झालं, तितक्या सहजपणानं मी लिहू लागलो नाही.

माझं कुटुंब हे मध्यम आर्थिक परिस्थिती असलेलं शेतकरी कुटुंब होतं. शेती, मळा, आंबराई, डोंगर, माळरान असा सभोवतीचा परिसर. आणि कुटुंबात शिक्षण नाही. जे कुटुंबात नाही ते माझ्यात येणं शक्यही नव्हतं. त्यामुळे लिहिता, वाचता येण्याचा प्रश्नच नव्हता. शिक्षणविषयक संस्कृतीचा साधा स्पर्शही घराला नव्हता. आमच्या गावात शाळाच नव्हती. त्यामुळं गाव आणि घर यांची याबाबतीत दोस्ती होती. अज्ञानाच्या बेडीनं घट्ट केलेली ही पक्की दोस्ती होती.

देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर एका वर्षानं माझा जन्म झाला. जन्म झाला म्हणजे मानवी शरीराचा प्रारंभ होतो हें खरं असलं तरी त्याच्या मानवी अस्तित्वाचा प्रारंभ होतोच असं नव्हे. कंधार तालुक्यातलं माझं गाव गोगदरी. आणि सारा कंधार तालुका डोंगराळ आणि माळरान बरडांनी व्यापलेला. जी काळी शेती तीच आमची दौलत. पण तशी जमीन थोडीच. माझ्या भोवती डोंगराचा परिसर होता. त्यात मी वाढत होतो. नागरी आणि डोंगरी संस्कृतीचा संस्कार माझ्या मनावर होत होता. माझा मी घडत होतो. मनाला घडविण्यासाठी लागणाऱ्या भौतिक संस्कृतीपासून आम्ही खूप दूर होतो. नागरी सुखवस्तू मुलांना व्यक्तिमत्वविकासाची

विविध साधने सहजी मिळतात. आमच्याकडे नेमका त्याचाच अभाव होता. बाभळी - बोरीची झाडं रानामाळात जशी वाढतात तसाच मी वाढलो. सावली-तलं शोभेचं झाड बनलो नाही. याचा मला आता आनंद वाटतो. ज्ञानाची संस्कृती आमच्याकडे विपुल होती. शेतीसंस्कृती हेच आमचं मुख्य ज्ञान होतं. आणि ते आमच्या भोवती पसरलेल्या पहाडाएवढं भक्कम होतं. जे होतं ते वास्तविक सत्य होतं.

गोगदरीभोवतीचे डोंगरी सुळके म्हणजे माळ हे माझ्या जाणीवेला झालेलं पहिलं ज्ञान होतं त्यावेळी माझ्यासाठी ते कितीतरी महान होतं. अगोदर भेटला मला तो माझ्या गावाभोवतीचा निसर्ग आणि नंतर भेटल्या निसर्गावरच्या पुस्तकातील कविता. मला त्या कधीही भिडल्या नाहीत. माझ्या गावाला भिडलेला निसर्गच इतका महान, साधा आणि जीवंत होता की पुस्तकातली वर्णन मला मंचुळ वाटली. मीठ नसलेल्या आमटीला आम्ही मंचुळ आमटी म्हणतो.

शेतकऱ्यांच्या वस्तीत मी वाढलो. ही फार मोठी शक्ती आहे असं मी मानतो. शेतकऱ्याचा मुलगा हाच माझा खरा परिचय आहे. कारण या शेती संस्कृतीनं मला मनाची, प्रेमाची निढळाच्या घामाची, मनस्वीपणाची, संस्काराची श्रीमंती दिली आहे. माझ्या लेखणीला असलेली धार आणि माझ्या चिंतनाला लाभलेला प्रवाही झरा माझ्या गोगदरी गावाच्या खोपड्यातून मला मिळालेला आहे याचा अभिमान मला वाटतो. डोंगरावर वीस वर्षे अनवाणी पायांनी चालल्या-शिवाय या अभिमानाचे रहस्य कळणार नाही. तीन तीन तास गुरांमागं पावसात भिजल्याशिवाय ते समजणार नाही. हातावर कांदाभाकर आणि हिरव्या मिरच्याचा ठेचा खात माळावर फिरल्याशिवाय आणि खोपड्यातल्या नितळ नव्या झऱ्यांचं पाणी पिल्याशिवाय हे अनुभवता येणार नाही.

मी लिहू लागलो याचं पहिलं कारण मी शाळेत जाऊ लागलो यात आहे. मुख्य म्हणजे माझ्या गावाला. जी होती ती खाजगी शाळा होती. आमच्या-पासून संस्कृती दूर तर होतीच होती; तसं सरकार पण खूपच दूर होतं आजवर जे होतं ते निजाम सरकार होतं. आमच्या तालुक्यावर निजाम संस्कृतीचा प्रचंड प्रभाव होता. निजाम संस्कृती म्हणजे रझाकार संस्कृती, दंडुकेशाही हे तिचं वैशिष्ट्य आणि या लोकशाहीत आमच्या शेतकरी पिढ्या वर्षानुवर्षे वाढत होत्या, धडपडत होत्या काहीचं जमलं नाही की त्या मोडून पडत होत्या. ही परंपरा बनली होती. या माणसांच्या जगण्याचा हा नियम बनला होता. यालाच आमचे मायबाप जगणं समजत होते.

शंभर एक घराची आमची ही वसाहत माळरानात आणि उरलेल्या काळ्या

मातीत घाम गाळणाऱ्या भूमिपुत्रांची वस्ती माळावर. उभं राहिलं की गाव आणि त्या टुमदार चिरेबंद मातीनं बांधलेल्या गावाचा टापू डोळ्यात सहज भरे. गावाभोवती गर्द हिरवे ऊसाचे आणि केळीचे मळे. मोजक्याच विहिरी. पाण्यानं तुडुंब भरलेल्या आमच्या गावाभोवती निसर्गाचं एक कठोर, माळावरचं रूक्ष पण मळ्यातलं सुंदर सौंदर्य भरलेलं होतं मुखदुःखाचा निसर्गानं जणू खेळ मांडलेला होता. गावाभोवती काळीभोर जमीन, नंतर विखुरलेली शेतं नंतर माळरान आणि माळावर विखुरलेले बंजाऱ्यांचे तांडे.

हे इतकं विस्तारानं सांगायचं यासाठी की, मी जे काही आज लिहितो आहे. त्याची पार्श्वभूमी कळायला हवी. कलावंत हा शब्दांचा राजा असतो असे म्हणतात. कलावंत हा मानवी मनाचा राजा असतो असे म्हणतात. तो माणसांचा मित्र असतो असं मी म्हणेन. माझे वडील मळ्यातली आणि माळावरची शेती करणारे शेतकरी होते. ते यासाठी महान होते की त्यांच्या कपाळावर डबडबलेल्या घामात आमच्या साऱ्यांच्या भुकेचा घास दिसत होता. भूक भागविणारा घास ही माणसांची महान संस्कृती नव्हे काय ?

आपण देशमुख आहोत असं आमचं घर आणि आमची सारी भावकी आवर्जून सांगायची. पण देशमुखी संपून कामकी आलेली होती. आणि ती मुळीच वाईट नव्हती. 'ज्याचं शेत त्याचं काम' हे तत्त्व काय वाईट होतं ? देशमुख्या संपल्या. प्रत्येकानं आपल्या शेतावर कामच्या नोंदवायलाच हव्यात हे सूत्र मला तेव्हा नसलं तरी आज पटतं. त्यावेळी मी खूपच लहान होतो. या गोष्टी कळणं शक्यही नव्हतं..

अशाच एकाच दिवशी शेजारच्या गावी गाडगे महाराज येणार आहेत आणि त्यांचं कीर्तन होणार आहे अशी खबर आली. बैलगाडी लावून माझे आईवडील गाडगे बाबांचं कीर्तन ऐकायला गेले.

दुसऱ्या दिवशीच माझ्या आईनं कुची पांघरून मला गावातल्या खाजगी शाळेत घातलं. अज्ञानाचा अंधार असलेल्या घराकडून माझे पाय ज्ञानाचा प्रकाश जिथं मिळतो त्या शाळेकडे गेले. गाडगे महाराजांच्या कीर्तनातील विचारांनी, माझ्या आईचं डोकं प्रकाशानं लख्ख भरलं. माळ आणि मळ्याकडे जाणारे माझे पाय शाळेकडे निघाले. रुमण्याऐवजी माझ्या चिमुकल्या हातात लेखणी आणि पाटी आली. शेतकरी कुटुंबातल्या मुलाच्या हातात काठी जाऊन पाटी येणं याला क्रांती नाही तर काय म्हणायचं ? आमच्यासारख्या शेतकऱ्यांची बरीच मुलं माझ्या वर्गात होती. काय झालं कुणास ठाऊक शक्ती नाहीशी झाल्यासारखी ही मुलं शाळा सोडून दऱ्या-खोऱ्यांचा रस्ता धरून गुरांमागे हिंडत नाहीशी झाली.

अनुक्रमणिका

त्यांचं भवितव्य माळावरच त्यांची वाट पहात थांबलं आणि माझ्यातला लेखक शाळेत घडत राहिला. गाईमागं जाणं यापेक्षा शाळा चांगली हे मला खूप उशीरा कळलं. आमच्यापैकी अनेकांना हे कळण्याअगोदरच ते गायांच्या मागं शेण गोळा करत गेले. परत त्यांना शाळेचा रस्ता दिसलाच नाही. शाळेत जाणं ही दुर्मिळ संधी होती. त्यामुळेच मी लेखक झालो. पदवी भेटली ही गोष्ट खरी असली तरी केवळ पदवी मिळवायची हाव मला कधीच नव्हती. शिकणं म्हणजे विचार करणं आणि विचार करणं म्हणजे पुढे जाणं. इतकाच विचार मनात असे.

या प्रक्रियेतूनच माझ्यातला लेखक घडला. पुस्तकातून तुमचं मस्तक आकाराला येते. तसंच भोवतीच्या निसर्गानं चांदण्याचा सडा पडावा तसं माझ्यात काव्य जागं ठेवलं हेही खरं. शाळेपेक्षा निसर्गानं मला अधिक शिकवलं. पदवी म्हणजे पैसा हे शहरी गणित आम्हांला कळत नव्हतं. माळ आणि मळा, घर आणि शाळा असा संवाद माझ्यात सुरू झाला.

शाळेत मिळत नव्हतं ते आम्हाला भोवतीच्या जीवनात मिळत होतं. डोंगर, माळ, झरे, पक्षी, वेली, फुले, शेती, शेतकरी त्यांचे कष्ट हे आमचं खरं संस्कार-केंद्र होतं. शाळेतून जीवनोपयोगी असं काय मिळालं हा प्रश्न वेगळा असला तरी पुढे येण्यासाठी अक्षरांनी आमची सोबत केली हे कसं नाकारता येईल ? अगोदर माझ्यात अक्षरं आली. आता माझ्यातून अक्षरं तुमच्यापर्यंत पोचतात ती या प्रक्रियेमुळंच.

चौथीपाचवीच्या वर्गात असताना कधीतरी अक्षरं जुळवायचा कंठ मला सापडला मोडक्यातोडक्या ओळी माझ्या जिभेवर अंकुरित होऊ लागल्या. माझ्या शेतातल्या महाकाय आंब्याच्या झाडाच्या फांदीवर झोके घेत त्या ओळी गुणगुणू लागलो. शाळेनं अक्षरांची गाठ घालून दिली. अक्षरांनी भोवतीचं हिरवं स्वप्न बांधायला सुरुवात केली. वसंत आणि कोकिळा यांची गाठभेट व्हावी तसाच हा प्रकार होता

मी शिकत होतो, मी वाचत होतो. या प्राथमिक वर्गांच्या दरम्यानचं कंधारला सुरू असलेल्या संयुक्त महाराष्ट्राच्या मोर्चात मी घुसत होतो. शेतकरी कामगार पक्षानं सुरू केलेल्या प्रत्येक चळवळीचा मी एक बाल सैनिक झालो होतो मोर्चे, भाषणं, जाहीर सभा यांचा मारा माझ्या कोवळ्या मनावर सारखा होत होता माझ्या आत एक शक्ती रुजत होती. विचार भक्कम होत होते भोवती काय चाललं आहे हे जसं कळू लागलं तसा मी अधिकअधिक वाचू लागलो मॅट्रिक झालो. झंझावातासारखा एक तरुण माझ्यात थैमान घालू लागला पुस्तकांनी आणि चळवळीनं मला बदलून टाकलं. पुस्तकामागून पुस्तकं

मी झपाटून वाचू लागलो मळ्यात, माळावर, शेतात, झाडाखाली. कुठंही वाचू लागलो. विचार करू लागलो. आणि हा विचार लिहून इतरांना सांगावा असं आतून वाटू लागलं. सॉल बेलो या अमेरिकन लेखकाने म्हटल्याप्रमाणे 'वाचनातून लेखक होण्याच्या इच्छेला प्रोत्साहन मिळत असते.' आपणाला जाणवलेला विचार इतरांना सांगावा ही ओढ प्रत्येक माणसाला असते. कला– वंताला ती अधिक असते. माझ्यातला लेखक शाळा, मळा आणि माळ, चळवळ आणि अखंड वाचनं यातून घडत गेला.

ग्रंथवाचनासारखा आनंद नाही. निसर्गाची सोबत आणि पुस्तकाची साथ जिथं आहे त्या जीवनातल्या आनंदाला सीमा नाही.

एस. एस सी. झाल्यावर माझा वेगळाच प्रवास सुरू झाला. शाळा सोडून, गाव सोडून मी. शहरात आलो. नव्या संस्कृतीची ओळख झाली. नांगर संस्कृतीत पोसला गेलेला माझा पिंड, त्याला नागरी संस्काराची जोड मिळाली. ही गोष्ट खूप मोलाची आणि महत्त्वाची होती.

नांदेडला आल्यावरही चळवळीचं चाक पायात कोरलेलंच राहिलं. राजकीय चळवळींतून मी तेथील विद्यार्थी आंदोलनात उतरलो. महाविद्यालयाच्या भव्य ग्रंथालयात रमू लागलो. एक पाय ग्रंथालयात आणि एक पाय चळ– वळीत. माझी दमछाक होत होती. कोंडमारा होत होता. पण मी पेटून उठत होतो हे सर्व टिपून ठेवावंसं वाटायचं. म्हणून डायरी लिहू लागलो. कविता लिहू लागलो नांदेडच्या वृत्तपत्रात लेख लिहू लागलो. 'माझिया जातीचा मज भेटो कोणी ' अशी आस लागली. माझं अंतःकरण गुंतलं होतं. या अंतःकरणाचे शब्द होऊ लागले आणि तारकापुंजासारखे कागदावर उतरू लागले.

पुढे एम. ए साठी औरंगाबादेस आलो. मराठवाडा विकास आंदोलन आणि विद्यार्थी आंदोलन तेव्हा जोरात होते. तो संघर्ष आणि अनुभव मला खूप काही शिकवून गेला. बर्ट्रॅन्ड रसेलने म्हटल्याप्रमाणे प्रेम आणि ज्ञान यांचा पाठलाग करण्याचा ध्यास मला लागला. जीवनातला प्रेमाचा भाग नाहीसा झाला तर आपल्या जीवनात उरतेच काय? ज्ञान अधिक प्रेम अधिक कृती बरोबर संस्कृती. यावर माझा विश्वास आहे. हा माणसांवरचा विश्वास आहे. हा कवितेवरचा विश्वास आहे. अशाच विश्वासाने मी माझ्या लेखणीद्वारे मूल्यवधीर जगाशी लढतो आहे. लढणार आहे.

(बा. ह. कल्याणकर, १३ शिवनेरी, सेक्टर एफएन ५,
श्रीनगर, सिडको, औरंगाबाद ३)

# नवी पुस्तके

( ऑगस्ट अखेरच्या पुस्तकांची यादी मागील अंकात दिलेली होती. सप्टेंबर ते दि. १५ ऑक्टोबरपर्यंत बाजारात आलेल्या निवडक पुस्तकांची यादी पुढे देत आहो. –संपादक )

कादंबरी

काळा सैतान – अशोक थोरे
पाठमोरा – सुहास शिरवळकर
७२ मैल – अशोक व्हटकर
निष्पाप – अजित विठ्ठल
अजब नायिका – कुमुदिनी रागणेकर
मनस्वी – अश्विनी धोंगडे
तांबडसांज – द स काकडे
जन्मभूमी – गीता मंगेशकर
नम्रता – व पु वांदोडकर
प्लेबॉय – आशू रावजी काकडे
भैरवी – ना. वा. फडके
अंतरथ – सुरेश वैद्य
गाफील – प्रकाश कदम
मात – जनार्दन ओक
पाताळगुंफा – अशोक थोरे
सखारामबापू– डॉ मुकुंद गद्रे
धिक्कार– शरच्चंद्र वाळिंबे
मोहेर– पद्माकर गोवईकर
उर्वशी– अरुणा ढेरे

किंग मेकर – जयंत रानडे
कंपॅनिअन – बाबा कदम
अभिशाप – सुनेत्रा देशपांडे
द्वंद्व – बी जे टण्णू (निरंजन)
दैवाचा खेळ – सुभाष शहा
पाटलाचा वाडा – मामा साठे
मंजुळा– रजनी शिरोडेकर
अपर्णा – प्रतिभा रायकर
सुरेल रंगली प्रीती – गीता मंगेशकर
नरजन्म – वसंत नरहर फेणे
बंदिनी – सुरेश वैद्य
चरित्र – ज्ञानेश्वर नाडकर्णी
विद्रोही – गुरुनाथ नाईक
प्रतिशोध – एस एम काशीकर
सागरी संघर्ष– हेमन कर्णिक
शिवप्रिया– शुभांगी भडभडे
प्रभंजन– अनिरुद्ध पुनर्वसू

कथा

मृगजळ– प्र. शि. नार्वेकर

पोलिस चातुर्यकथा– व. कृ. जोशी

कलंकमुक्ती– मुनीर शेख

इरसाल गोष्टी (विनोदी)– बाळकृष्ण देव

काव्य

प्रवासी पक्षी– कुसुमाग्रज

अंतरंग– हेमा लेले

स्पंदन– सौ सरला कुलकर्णी

समंध रडतो पिंपळावर– अनीर आठवले

विनोदलहरी– बाबुलनाथ (वि. शा. काळे)

ललित लेखन

परवाची गोष्ट– विश्वास मेहेंदळे

डायग्नोसिस– निशिकांत श्रोत्री

रंगत– रत्नाकर मतकरी

मस्तानी– द. ग. गोडसे

प्रकाशाची खिडकी– रवींद्र पिंगे

सावली, आनंद– प्रमोद नवलकर

व्यक्तिचित्रे चरित्रे

अनोळखी ओळख– गिरिजा कीर

निवडुंगावरील गुलाब– कृ व कुलकर्णी

वि. का राजवाडे– म. श्री. पुराणिक

वडीलधारी माणस– शांता शेळके

नेताजी– वि स. वाळिंबे

मागेपुढे जालो लाटा– श्री. ह. थत्ते

कोयला भई न राव– सुलभा भानगावकर

नाथ हा माझा– कांचन घाणेकर

शिवशाहीर– विनोद वेडेकर

संघर्ष– वसुंधरा पटवर्धन

समीक्षा

बालकवींचे काव्यविश्व– म सु पाटील

कुसुमाग्रज गौरव– माधव गडकरी

डॉ. आंबेडकर व दलित साहित्य– डॉ. भालचंद्र फडके

सार्ता ग्रथ : स्वरूप– कृ. प देशपांडे

विविध

प्राणिमित्रांच्या जगात– विजय देवधर

माध्यम– प्रकाश कुळकर्णी

कागद व मुद्रण– प्र गो. गोसावी

डॉ. आंबेडकरांचे समाजचिंतन– भालचंद्र फडके

प्राचीन भारतातील नाग– एच एल कोसारे

नरकसफाईची गोष्ट– ठाकूर/महामद खडस

धनगरांच्या देवता– बाळासाहेब वळे

नाटक

अलीबाबाची हीच गुहा– दिलीप वि चित्रे

पाषाणमाया– सतीश कळमकर

सुंबरानं मांडियलं– रामदास कांबळे

## नवे आजीव सभासद

(दि. ६-९-८९ पासून दि. १५-१०-८९ पर्यंत)

### पुणे

प्रताप नारायण वेहेरे  अनिल गणेश वसर्गेकर  डॉ नंदकिशोर अवधूत सुभाष नीलकंठ साने  सौ. आशा राजीव नातू  सौ. मृदुला शंकर देवरे सौ. मधुरा संजय खानविलकर  गजानन विश्वनाथ वोंडाळे  सुषमा जोशी विनायक सखाराम कामत  रामदास दत्तात्रय फुटाणे  आनंद शंकर नवाथे सौ. प्रफुल्ला विनायक वैद्य  महादेव विश्वनाथ काणे  शशिकांत रामचंद्र चांदे अनिल रामचंद्र कांबळे  डॉ. शंतनु चिधडे  प्रा इंदु महादेव लिमये

### पुण्याबाहेरील

डॉ. ए. आर. यार्दी (धारवाड)  प्रा. विद्या चौधरी (धारवाड) डॉ. जी.एस. काळसे (धारवाड)  प्रा. यशवंत कळमकर (वाई)  सौ. साधना वसंत जोशी (वाई)  दीपक कृष्णाजी प्रभुणे (सातारा)  स्मिता सु. डोळस (मुंबई) सौ. पुष्पा फणसे (ठाणे)  सीताराम बंडूजी रावळे (धुळे)  प्रा. तु ग. माने (वर्धा)  अनिल तुकाराम कोठावळे  सौ. क्रांती अनफुले (अहमदनगर) श्रीकांत परशुराम नाकाडे, (विसोरा)  अविनाश दामोदर आपटे (श्रीरामपूर) वीणा सोमण (टिळकवाडी)  श. द. कोपर्डेकर (सायन)  वि. गे शिंदे (आसगाव)  शैला सायनाकर (इस्लामपूर)  अनिल नामदेव शेळके (वार्शी), वासुदेव भगवान कुलकर्णी,  जयवंत गणपत वैती (मुंबई)

---